प.कु.दि.२८ अ.बु.७ टीघटीका आ.११.

# अनुक्रमणिका

## श्लोक

प्राणी,आप्त,कनिष्ठ श्रेष्ठ जनजे,त्यांतें सदा सन्मतें,॥
वर्तें,उद्यम,स्वात्मसेवकपणा,स्वातंत्र्य धारिष्टतें,॥
यांतें पोषुन,लक्षपूर्वककरी विस्तीर्ण आलोचना,॥
संपादीं पटुयुक्ति सूचन लता,संकोचता सज्जना॥१॥
घेघे सभ्यपणा,स्वयुक्त अशना,आरोग्य,संवर्द्धना,॥
संतुष्टत्वगुणा,मितव्ययपणा,लोकोपकारी मना,॥
अक्रोधादिक क्षांति हीच रकमनां,भोगींदमासद्मना,॥
सौम्यत्वादिक भूषणा धरिं,रमे यां सद्गुणांच्यायना॥२॥

## आर्या

अंतरसाक्षित्वातें सहन न व्हे कीं अनीति लव एक॥
लक्षुनि तें,व्यापारां नीतीचें येउं दे सदा पीक॥३॥
परधन,लौकिक,सत्ता,निजकर्तव्यें अवश्य जीं प्रास,॥
निजऋण,तूं यां सर्वां विषयीं वर्तन करीं यथाउचित॥४॥
स्वहितांचें संपादन यद्यपि जें साध्य नीच रीतीने॥
त्यातें वर्जी,न्याय्य व्यवहारीं वर्ततूं यथाविधिने॥५॥
पाळीं स्वदत्त वचना,स्वेच्छिक अपकार वर्जुनी सारे॥
परदुःखादिक न करीं,अंतरसाक्षी निषेधितो बारे॥६॥

## श्लोक

जें सत्य तें सेविल नित्य जावें,॥

महात्मता

# अनुक्रमणिका.

पृष्ठ

महात्मना, शौर्य गुणास घ्यावें,॥
स्वदेश प्रीतीस मनीं धरावें,॥
नीतीसरे सौख्य दया भजावें॥७.


जीवजंतूविषयीं वागणूक — १
मुलगे आणि बेडूक . . . . . . . . . . २
खंडू आणि महादू . . . . . . . . . . २
निर्दय मुलगा आणि सूक्ष्म दर्शक यंत्र . . . . . . ४
चंदिवान् आणि उंदीर . . . . . . . . . . ५
आसांविषयीं वागणूक — १०
उंदिर व त्याचें ओरसें . . . . . . . . . . ११
अनापिअस् आणि आम्फिनोमस् . . . . . . . . १२
आलेक्झान्डर् थियेर व त्याची आई . . . . . . . १२
फ्रेडरिक् थियेर् व त्याचा दुर्जन्या . . . . . . . १४
पोर्टुगाल देशचे दोघे बंधु . . . . . . . . . १५
कनिष्ठ व श्रेष्ठ यांविषयीं वागणूक — १९
सिसिली आणि नेपल्स् यांचा आल्फोंसो नामा राजा . . . . २२
एका धन्याच्या आंतले गांठीचें स्वभावाची निंदा . . . . २४
मेरीकारिल . . . . . . . . . . . . २४
प्लान्कस् आणि त्याचे दास . . . . . . . . . २५
एका सेवकाचें औदार्य पूर्वक स्वार्पण . . . . . . . २६
उद्योग — २७

# अनुक्रमणिका

पृष्ठ

शेतकरी आणि त्याचे पुत्र . . . . . . . . . . २९

क्रेसिन् . . . . . . . . . . . . . . ३०

मेहनती रुलार . . . . . . . . . . . . ३१

बेन्जामिन् फ्रांक्लिन् . . . . . . . . . . ३२

फ्रांक्लिनाच्या गरीब रिचार्ड यांचीं वाक्यें . . . . . . ३६

काहींतरी करण्याची आवश्यकता . . . . . . . . ३८

मार्किस् स्पिनोला . . . . . . . . . . . ३९

**स्वसेवा आणि स्वतंत्रता** —— ३९

हरक्युलीस् आणि गाडेकरी . . . . . . . . . ४१

स्कायी पक्षिण आणि धान्याचें शेत . . . . . . . ४१

ओबेर्लेन्च्या सरराबर्ट इन्न्स् . . . . . . . . ४२

जा आणि ये यांचें अंतर . . . . . . . . . ४४

**धारिष्ट** —— ४५

घरास अग्नि लागला असतां दोघी स्त्रियांनी परस्पर विरुद्ध अशी वर्तणूक केली . . . . . . . . . . ४८

जखम झालेला लाणी करणारा . . . . . . . . ४९

किरण्याचा व्यापारी आणि काळ्या बियांचा थैला . . . . ४९

**लक्षपूर्वक अवलोकन आणि समयसूचकता** —— ५१

गासेन्डी म्हणून एक लहानगा ज्योतिषी . . . . . . ५२

इंडियान् व चोरून नेलेलें हरणाचें मांस . . . . . . ५४

उंदीर आणि अंडें . . . . . . . . . . . ५५

## अनुक्रमणिका.

पृष्ठ

एक्या फुटलेल्या तारवावरील खलाशी ........ ५६

नितान्याचा चाकर ........ ५७

फारन गलबतावरील खलाशी मुलगा ........ ५८

संकोचवृत्ति —— ६०

जायांचीं पिसें ल्यालेला डोमकावळा ........ ६१

सर् ऐझाक्न्यूटन् ........ ६२

आत्मश्लाघी विद्यार्थी ........ ६५

सभ्यपणा —— ६७

पारशीकुणबी ........ ६९

टुरिन एथें गेलेला इंग्लिशमान् ह्मणजे इंग्रेज ........ ७०

चौदावा लुइस् ........ ७२

मिताहार —— ७४

दोन मधमाशा ........ ७७

लुइस् कोर्नेरो ........ ७८

जाक् सिप्किन् ........ ७९

साधें खाणें सर्वोत्कृष्ट मिष्टान्न होय ........ ८१

शरीरसंपत्तीचें रक्षण —— ८१

टमसर घर ........ ८५

अजीर्ण झालेल्या रोग्यास बरें करण्याचा प्रथम उपाय ........ ८५

शैत्य झालेला एक अल्पवयी मनुष्य ........ ८८

समाधान —— ९०

# अनुक्रमणिका

पृष्ठ

सोन्याचीं आंडीं घालणारी हंसी ........ ९१
एका मोठ्या राज्याधिकारी पुरुषाचें अस्करव ........ ९२
दरबारींचा उंदीर आणि ग्राम्य उंदिर ........ ९३
भिक्षाग्रहींचें समाधान ........ ९४
बेडकानी राजाची इच्छा केली ........ ९६

**मितव्यय** ———— ९८

मुंगी आणि टोळ ........ ९९
कित्येक थोर मनुष्यांची मितव्ययता ........ १००
परिमितव्ययी कुटूंब ........ १०१
सवारुपयाची किमत ........ १०२

**परोपकारबुद्धि** ———— १०४

जगमित्रहवार्ड ........ १०७
सरफिलिपसिडनी ........ ११०
ड्रमंड मुख्य कोतवाल ........ १११
कोसिअस्कोसेनापति ........ ११२
टैटस् ........ ११३

**मितक्रोध, सहनशीलता आणि क्षमा** ———— ११४

सोक्रेटीस् ........ ११५
सत्स्वभावाचें एक अलौकिक प्रतीक ........ ११९
क्षांतीने एकत्र ठेविलेलें कुटुंब ........ १२०
अपकाऱ्यावर उपकार ........ १२०

# अनुक्रमणिका

समुद्रांतील एक आकस्मिक प्रसंग …… १
युवर्टोची गोष्ट …… १
टोबीकाका व माशी …… १
सौम्यता —— १
वायु, सूर्य, आणि वाटसरू …… १
जोसेफ् होल्व अपराधी ठरलेले कैदी …… १
सिसिलीचा व नेपल्सचा राजा आल्फोन्सो …… १
दुसऱ्याचे मालाविषयीं स्वानुभविकपणा —— १
चोरट्या चिमण्यांची गोष्ट …… १
मिलन् एथील द्वारपाळ …… १
लिओनार्ड …… १
मुसारोथ् शिल्ड …… १
दुसऱ्याचे लौकिकाविषयीं स्वानुभविकपणा
सोक्रेटीस् यास मारण्याविषयी केलेला कट …… १
हीलेनप्रेम् ……
इतरांचे स्वाभाविक सत्तेविषयीं स्वानुभविकपणा
फ्रान्सदेशांतील ज्याकेरी लोकांचें बंड ……
टामस् क्लार्कसन् ……
आपल्यास जें कर्तव्य तें करण्याविषयीं स्वानुभविकपणा ——
एक आंधळा भिकारी व कुत्रा ……

सेनापति वाशिंग्टन् . . . . . . . . . . . . . . १५९
आपल्या सत्यनिष्ठेने निवडून नेमणूक करणारा . . १६१
**कर्जाविषयीं स्वानुभविकपणा** ——— १६४
बारेथूचा माग्वेच . . . . . . . . . . . . . . १६५
उेन्हाम् प्रमाणिक देणेदार . . . . . . . . . . १६६
मार्किस् वेलेस्ली . . . . . . . . . . . . . . १६७
**नीचरीतीने आपलें हितकरून घेऊंनये याविषयीं स्वानुभविकपणा** ——— १६८
ज्यार्जडेंड . . . . . . . . . . . . . . . . १६९
**चोरव्यवहार करण्याविषयीं स्वानुभविकपणा** १७०
दुकानावरला एक प्रमाणिक मुलगा . . . . . . . १७२
बंदुकीचे दारूचें पीक . . . . . . . . . . . . १७३
**आपलें वचन राखण्याविषयीं स्वानुभविकपणा** १७७
मूर आणि स्पानियार्ड . . . . . . . . . . . . १७८
फ्रान्सदेशींचा ज्यान्‌राजा . . . . . . . . . . १७९
**स्वेच्छिकअपकारवर्जण्याविषयीं स्वानुभविकपणा** १८०
मधमाशी आणि गांधिल माशी . . . . . . . . . १८१
हत्ती आणि शिंपी . . . . . . . . . . . . . . १८३
**सत्य** . . . . . . . . . . . . . . . . . . १८२
लांडगा लांडगा असें ओरडणारा एक मेंढक्याचा मुलगा १९०
राघू आणि विरू . . . . . . . . . . . . . . १९१

# अनुक्रमणिका.


आमीलियाबफोर्ड

हीलेन्‌चाकर

**महात्मता**

मासिडोनियाचा फिलिप्‌ व त्याचे अनसूयाकर्ते

विलियमराजा आणि गोडाल्फिन्‌ याचा अर्ल

माडामविलासेर्फ

तिघे अल्पवयी चित्रकार

दांडगे

ह्यावान्ना एथील हाकिम

**शौर्य**

ग्रेस्‌डार्लिंग्‌

एक्या गोंड्याचा मुलगा राम

**स्वदेशप्रीति**

थिमिस्टोक्लीस्‌ व लासिडिमोन्‌चें आरमार

क्यालेस एथील स्वदेशोपकारी पुरुष




# शालोपयोगीनीतिग्रंथ.



## जीवजंतूविषयींवागणूक.

माशा, गोगलगाई, कीटक, बेडूक, असे अपकार न करणारे बहुत लहान जीव आहेत, ते जेव्हांजेव्हां दृष्टीस पडतात तेव्हांतेव्हां कित्येक लोक त्यांस पीडा करितात, आणि मारून टाकितात. असें आपण करूं नये, कां तर कोण्या प्राण्यास निरर्थक दुःख देणें हें खोटें कर्म आहे. आणखी असें आहे, लहान लहान जीवांविषयीं निर्दय झालें असतां त्यापासून आपण आपल्या बरोबरीच्या प्राण्याविषयीं निर्दय व्हावयास प्रवृत्त होतों, असें होतां होतां कदाचित् आपल्या हातून मोठीं दुष्टकर्में घडूं लागतात. कोणी एका अन्या प्राण्यास उपद्रव द्यावा अथवा मारून टाकावें असा आपल्यास जेव्हां मोह प्राप्त होतो, तेव्हां आपण असा विचार करावा कीं असेंच जर आपल्यास, आपल्यापेक्षां एकाद्या मोठ्या जीवानें केलें, तर तें आपल्यास कसें वाटेल.

आपण आपल्या उपयोगाकरितां अथवा मौजेकरितां घोडा किंवा कुत्रा असें एकादें जनावर आपल्याकडेस ठेविलें तर त्यास चांगलें बाळगावें, त्यास पुरतेपणी खाणें घालावें, त्यास रहावयास चांगली जागा करून ठेवावी, आणि त्याच्या सामर्थ्यापेक्षां जाजती काम त्याजपासून घेऊं नये, हें आपल्यास उचित कर्म आहे. घोडा कदाचित् म्हातारा झाला अ

सला अथवा अगदी थकून गेलाअसला अथवा त्यास अगदी कमीरवापें मिळालें असलें याजकरितां तो हळू चालत असला, तर त्यास काहीं लवकर चालवायास कोरडे मारणें हें लाजिरवाणें आहे.

---

## मुलगेआणिबेडूक
### कल्पितगोष्ट.

एका मोठ्या तळ्याचेपाळीं बेडकांचा मोठा समुदाय रहात होता, तेथें असेंघडलेंकीं एक मुलांचा मेळा मिळून त्यानी खेळ मांडिला. तो खेळ असाकीं पाण्यासलागून वरउडून पुनः पाण्यासलागून वरउडून असे रीतीनें उडतजात अस्या ते चिपाआडव्या मारूं लागले. तेव्हां त्या पाण्यांत जो अवघा दगडांचा वर्षावझाला, तेणेंकरून त्यां गरीब भयभीत बेडकांस मोठा उपद्रव व संकट प्राप्त झालें. शेवटीं, जे अत्यंत टणके होते त्यांतून एकाने त्या तळ्याच्या पाण्याचे सपाटीतून वर डोकीं उचलून म्हटलेंकीं, " अहो प्रिय मुलांनो तुह्मी इतके लवकरच कां निर्दय होऊं पाहतां ? मी तुह्मास विनवितों, तुह्मी विचार करावा, तुमचा जरी खेळ असला, तथापिआह्मास हें मरण आहे".

## खंडू आणिमहादू.

खंडू आणि महादू असे भाऊ होते, खंडूचें वय सुमारें सातवर्षांचें होतें आणि महादूचें पांचवर्षांत काहीं उणें होतें. खंडू चांगले बुद्धी

चा व उत्तम स्वभावाचा मुलगा असे. महादूही तसाच चांगला असे; पण लहान म्हणून त्याचें ज्ञान व बुद्धिहीं कमी असत, व तो खंडूपेक्षां वारंवार खोडी करी. एका दिवशीं हे दोघेजण शेतांत फिरायास गेले. वाटेने जातांजातां एका पारवराचें कोटें कुपणांत महादूने पाहिलें. त्यांत जें पारवरूं आई होऊन बसलें होतें तें यां दोघांस येतांना पाहून उडून गेलें. मग हे त्या कोट्यांत पाहतात तों तीन लहान लहान पिलीं आहेत आणि त्यांस त्या आईनें नुकाच चारा घातला आहे, तेव्हां त्या पिलांस बाहेर काढून आपल्या घरीं घेऊन जावें असें महादूस वाटलें, पण खंडूनें त्यास मना करून म्हटलें "मागें बहुत दिवसांवर माझ्या बापानें मला सांगितलें कीं पारवरांच्या कोट्यांतून काहीं हरण करणें हें खोटें कर्म आहे. अरे आपलीं आईबापें जीतकीं आपल्यावर प्रीति करितात, तितकीच पक्षी त्यांच्या त्यां पिल्यांवर प्रीति करितात. जर कोणी दुष्ट मनुष्य आपल्या घरीं येऊन आपल्यास व बाळांस घेऊन गेला, तर आपलीं आईबाप जितका शोक करितील, तितकाच पिलीं घेऊन गेलें असतां ते पक्षी शोक करितील. आणखी असें आहे कीं पिलांस त्यांचे आईची जतन असलीतर च तीं चांगलीं वाढतात, त्यांस मुलांनी धरून नेलें तर बहुधा त्यांचे हाल होऊन तीं मरून जातात. हें लहान कुटुंब स्वतां उडायाजोगें आणि स्वतां आपली जतन करायाजोगें होईतोंपर्यंत कोटें जें याचें घर एथें याचें पालन त्या बापुड्या पक्ष्याकडून होऊं द्यावें हें फार चांगलें." ह्याचा महादूने पूर्वी विचार केला नव्हता, पारवरासही इतके दुःख देणें हें खोटें कर्म आहे असें त्यास त्यावेळीं कळलें. मग आपल्या बंधूच्या उपदेशाप्रमाणें चालावें असा त्यानें निश्चय केला.

त्याकाळीं असें घडून आलेंकीं त्या उभयतांचा बाप त्यां कुंपणाचे पलीकडेस होता, तेथून त्याचीं तीं मुलें जें बोलिलीं तें सर्व त्यानें ऐकिलें. मग त्यानें त्यांच्याजवळ आडवें येऊन त्यांस सांगितलें कीं तुह्मी चांगले मुलगे, तुह्माविषयीं माझ्याठायीं आतां जसी प्रीति उत्पन्न झाली, तसी पूर्वीं कधीं च झाली नव्हती. अरे लहान पाखराचें दुःख तर स्वल्प; परंतु जो लहान मुलगा असल्या अनपकारी जीवास स्वेच्छेने लुटितो, त्याची ती दुष्टाई स्वल्प नव्हे. ज्या मुलांच्यानी असें करवतें त्यांचें अंतःकरण निर्दय, आणि पुढें कदाचित् ते मोठे निर्दय होतील असें दिसून येतें. पाखराचीं कोटीं लुबाडावीं हें खोटें कर्म असें तुह्मी माझे दोघे पुत्र जाणूं लागलां हें पाहून मला आनंद झाला.

## निर्दयमुलगा आणि सूक्ष्मदर्शक यंत्र.

माशांस वेदनाकारक दुःख देणें, व मारून टाकणें ही क्रूरतेची मौज कोणी एका मुलग्यास आवडत असे. तो त्यांचे पांख व पाय उपटून टाकी, मग त्यांचा निसटून जाण्याविषयीं जो व्यर्थ उद्योग तो आनंदानें पाहत असे. कोण्यासमयीं तो माशांचा समुदाय गोळा करी व त्यांचा एकदांच चेंदा करून, त्यांस ठार मारून, आपण केलेले दुष्टाईचा मोठेपणा मानी. असें हें क्रूर आचरण त्याच्याहातून न घडावें ह्मणोन त्याच्या शिक्षकानें त्यास निषेधपूर्वक सांगितलें, पण तें व्यर्थ. आपल्याच प्रमाणेंमा

शांस दुःख होतें, वांचणें, मोकळें असणें, सुख अनुभविणें यांविषयींजसी आपलीसत्ता, तसीच माशांचीसत्ता, असा त्याचा विश्वास पडायास त्याची समजूत त्या शिक्षकाकडून होईना. त्यांनं तळमळकरून आपल्याठायीं अति वेदनेचीं चिन्हें दाखवीत, तें तो क्रूर मुलगा समजेना अथवा त्याकडेस लक्ष देईना असें झालें.

मग सूक्ष्मदर्शकयंत्र ह्मणजे जीणेकरून लहान पदार्थ आपल्यास मोठा दिसतो असी एक कांच त्या शिक्षकाजवळ होती, तीणेंकरून त्याने एका दिवसीं आपल्या त्या शिष्यास एक अत्यंत सुंदर व चमत्कारिकजीव तपासून पहावयास सांगितला, आणि ह्मटलें कीं "खुण धर, अरे, डोक्यापासून शेपटापर्यंत हा काळ्या व रुपेरी रंगाने रचित आहे, आणि याचें अवघें अंग अत्यंत करामतीच्या शुकानी भरलें आहे! याच्या मस्तकीं जो टपटवीत डोळ्यांचा जोड त्यास रुपेरी झाकांचा गरका पडला आहे आणि सोंडेचे जे दोन अवयव ते एकावरएक मिळून राहिले आहेत. हें अवघें अंग पिसानी आणि मुलाम्यानी भूषित आहे त्याची शोभा महान् राजाच्या पोशाकास माजी पाडिती" असें जें त्याने पाहिलें तेणेंकरून त्यास आनंद व चमत्कार वाटला, आणि या अपूर्वप्राण्याचें नाव व गुण जाणायास तो उत्कंठित झाला. मग यास सूक्ष्मदर्शक कांचेवरून काढून त्या मुलग्याच्या नुसत्या नेत्रापुढें करितांच त्याचे स्वेच्छिक क्रूरतेस पात्र झाली होती जी गरीब माशी तीचही असें सिद्ध झालें.

## बंदिवान आणि उंदीर

पारिस नगरांत बास्तिल ह्मणून जो मोठा किल्ला होता त्याचा बंदि

ख्यानाकरून राजाची कोण्याएकावर इतराजी झाली असतां त्याला राजा तेथें नेवघून कैद करवी. कित्येक बंदीवानांस तेथें बहुत वर्षें कैदेंत ठेवून भारी बिड्या घालून बाहेर मोकळ्या हवेंत जाऊं द्यावयास आणि आपल्या कोण्या आप्तांस भेटावयास परवानगी नसे. त्या बास्तिलांत लाटूड म्हणून एक बंदिवान् होता. तो तेहेतीस वर्षांचा असतां कैद झाला, तो तेथें आणि दुसऱ्या बंदिखान्यांत मिळून पचतीस वर्षें होता, म्हणून तो सुटला त्याकाळीं केवळ म्हातारा होऊन गेला. या बापुड्यास ज्या लहानसे कोठडींत बहुत वर्षें ठेविलें होतें तेथें कोणी एक सोबतीस नव्हतें. त्या बंदिखान्याचा चोकसनीस घास खाणें आणीत असे, तोच काय तो याचे दृष्टीस पडे. हें त्यास फारच मोठें दुःख होतें, कां तर आपल्यास सुखार्थ मनुष्यसमागमांपेक्षां अधिक आवश्यक असे दुसरे थोडकेच पदार्थ आहेत.

या लाटूडाच्या कोठडींत उजेड नसे, क्षितिजसमसूत्र असी एक आडवी जंगी भिंतीस होती तिजमधून जो उजेड पडे तितकाच. ती भिंत जाड असे म्हणून ती जंगी मोठी लांब असे. एका दिवसीं हा त्या जंगींतून पहात असतां त्या जंगीचे बाहेरल्या शेवटास एक उंदीर आलेला त्याचे दृष्टीस पडला. उंदीर हे असे जीव आहेत कीं ते आपल्याजवळ असावे असें मनुष्यांस बहुधा आवडत नाहीं; परंतु लाटूड अगदी एकटाच असे म्हणून कोणताही जिता जीव जवळ आला असतां आनंद व्हावा असें यास झालें होतें. मग जोराने उडविल्याने त्या उंदरास भय वाटेल म्हणून त्याने त्याकडे सएक पावाचा लहान तुकडा सांभाळून उडविला. तो त्या उंदराने अमळ पुढें होऊन घेतला, मग तो दुसऱ्याची इच्छा करूं लागलासा दिसूं लागला. लाटूडा

ने दुसरा एक तुकडा पहिल्यापेक्षां कमी अंतरावर टाकिला, तोही त्याजीवाने पुढें येऊन घेतला. मग त्याने तिसरा त्याच्याहीपेक्षां कमी अंतरावर टाकिला त्यावरून अधिकच जवळ जावें असा त्या उंदरास लोभ झाला. याप्रकारें तोजीव त्याच्याठायीं विश्वास ठेवी असें यानें त्यास मनाविलें. मग जोंपर्यंत हा पांवाचे तुकडे उडवीत होता तोंपर्यंत तो राहिला; त्याच्याने खावेना असें होतांच जे तुकडे त्याने खाल्ले नव्हते ते तो आपल्या बिळांत घेऊन गेला.

दुसरे दिवसीं तो उंदीर पुनः आला. मग लाटुडाने काहीं पांव व एक मासाचा तुकडा टाकला, तो तुकडा तर त्याला फारच रुचीकर वाटलासा दिसला. तिसरे दिवसीं, तो पुनः आला, आणि इतका माणसाळला कीं तो लाटुडाचे हातांतून खाऊं लागला. पांचवे दिवसीं तर तो आपलें ठिकाण बदलून त्याजंगीचे आंतले बाजूस एक लहानसें भोंक होतें, तेथें राहिला जसी जाणूं काय आपल्या पालनकर्त्याच्या समीप असायाची त्यास इच्छा झाली. तो दुसरे दिवसीं मोठ्या पहांटेस लाटुडाजवळ न्याहरी करावयास आला. मग अवघा दिवस दिसला नाहीं. दुसऱ्या दिवसीं प्रातःकाळीं पुनः आला, तेव्हां त्याने एक सोबती आणिला, ती उंदरी होती. मग ती स्त्री बिळांतून सावधगिरीने डोकावूं लागली. व त्या बंदिवानाला फारच भ्यालीसी दिसली. मग त्या अनोळखी जिवास आपल्याकडेस लोभ उत्पन्न करायाकरितां तिजकडेस पांव व मास उडविण्याचा लाटूडाने उद्योग केला. परंतु ती बहुत वेळ बाहेर निघण्याविषयीं धैर्य करीना. शेवटीं त्या दुसऱ्या उंदरास मोकळेमनाने खातां पाहून झडकन ती बाहेर निघाली. आणि एक तुकडा घेऊन तसीच मागें परतली. नंतर काहीं वेळा

ने ती अधिक धीट होऊन त्या उंदरापासून काहीं तुकडे घ्यायाकरितां भांडण करूं लागली. त्याच्या दांतांतून एकादा तुकडा तिने काढून घेतला, म्हणजे त्याने लाडूडाजवळ यावें जाणूं जसा काय आपलें दुःख सांगायास व समाधान करून घ्यायास आला आहे. त्याजपासून हरण केलेल्या तुकड्याबद्दल लाडूडाने त्याला दुसरा दिला म्हणजे त्याने त्याच्याजवळ बसावें आणि डोळाने खावें. माकडाप्रमाणे मांड्याखालीं घालून बसावें आणि तो मासाचा तुकडा आपल्या पंज्यांत धरावा. जसा काय तो आपले सखीसीं पण करीत आहे कीं जो मला रक्षूं शकतो त्याच्या मी इतका जवळ आहें, आतां तूं मजसीं भांडायास येऊन हें कसी घेतीस तें पाहूं.

काहींएक दिवस ती उंदरी फार भयभीत असे आणि तो उंदीर नर लाडुडाचेजवळ बसून स्वस्थपणें खाई. शेवटीं आपल्या सोबत्यास पोटभर खायास मिळतें, आणि आपल्यास उपास काढावे लागतात हें पाहून तीस सहन होईना. मग एका दिवसीं लाडूडाने त्या उंदरास पहिला तुकडा टाकितांच तो तिने उडून आपल्या दांतानी धरिला. त्या उंदरानेही तोच तुकडा बळकट धरिला, त्यास ती जोराने ओढूं लागली तेव्हां फारच ओढाओढ होऊं लागली. असे ते दोघे जीव गडबडत आपल्या बिळाकडेस जाऊन, त्या स्त्रीने त्या पुरुषास आंत ओढिलें. या कलहाने लाडूड तर फार रिझला, आणि आपल्या विपत्ति क्षणभर विसरलासा झाला.

मग असतां असतां त्या उंदरासारिखी ती उंदरीही माणसाळली आणि नित्य लाडुडाच्या हातांतून आपलें खाणें खाऊं लागली. नंतर एक तिसरा उंदीर पैदा झाला, तो तीं दोघें पहिल्याने होतीं त्यापेक्षां कमी भितरा

दिसला. दुसरे भेटीसनंतर तो असा झाला कीं जसा काय त्यां दोघांचे कुटुंबांतलाच एक आहे, मग तें स्थळ त्याला केवळ आपल्या घरासारखें वाटून त्याने तेथें आपले सोबत्यांचा प्रवेश करावयाचा बेत केला. मग दुसरे दिवसीं तो दोघे समागमे घेऊन आला. त्यां दोघांजणानी एका आठवड्यांत दुसऱ्या पांचजणास बोलावून आणिलें. या प्रकारे एका पंधरवड्यांत मोठे मोठे दहा उंदीर येऊन लाटुडाच्या भोंवते मिळाले मग याने एक एकास एकएक नाव ठेविलें आणि ज्याचें जें नाव तें तो वोळखूं लागला. याने त्यांस जेव्हांजेव्हां साद घालावा तेव्हांतेव्हां त्यानी येत असावें. काहीं दिवसनंतर हा ज्या तारांतून खाई त्याच तारांतून त्यांस खाऊं देत असे, पण त्यांची स्थीतरीत काहींसी ओंगळ ह्मणून याला त्यांस वेगळ्या तारांत खाणें घालायास बरें वाटलें. याने पावांच्या व मासाच्या तुकड्या करितां त्यांजकडून कुऱ्यासारिख्या उड्या मारवाव्या. त्यांचें जेवण झालें ह्मणजे मग त्यां अवघ्यांला आपल्या भोंवतें नाचवावें. फार काय सांगावें जसें लहान लहान खेळगडी मुलांचें कुटुंब असतें तसेंते उंदीर या लाटुडाला झाले. तेजवळ असले ह्मणजे याला स्वर्ग जाहलेंसें वाटे. मग आपली स्वरकाऱ्हाची हेंही याला नकोसें जाहलें. कां तर जगांत निर्दयता व बलात्कार यांसीच गांठ, एथें काय तीं प्रीति व शांति. परंतु हा जो यास उंदरांपासून आनंद होई तो बहुत दिवस राहिला नाहीं. दोनवर्षांच्या अंतीं याला त्या बंदिशाळेचे एके दुसरे दूरचे कोटडींत नेलें, तेथें याच्या मागून त्यां उंदरांचें जाणें घडूं सकलें नाहीं. तेव्हां त्यां स्नेहाने वागणाऱ्यां जीवांचा असा वियोग झाल्या वरून याला

फाररडूं आलें आणि वंदाचें दुःख याला काहीं दिवस जसें जाचलें, तसें पूर्वी कधीच जाचलें नव्हतें. सारांश केवळ एकांतवास मोठा दुःखकारक आहे, आणि मनुष्य कोणत्याही प्रकारच्या जीवा बरोबर आनंदाने सहवास करील पण तो केवळ एकटा राहणार नाहीं, हें यागोष्टीवरून कळूं येतें. ज्याजीवांचा आपल्यास परम त्रास येतो, ज्यांस आपण तुच्छ मानितों ते ही कितीएकप्रसंगीं, आपल्यास उपयोगी पडतात हेंही या गोष्टीवरून दिसून येतें.

---

## आप्तांविषयीं वागणूक.

आपलीं जीं संबंधी आहेत त्यांवर आपण माया करावी; आई बाप वहिणी, भाऊ, यांवर तर विशेषेंकरून करावी. आपण लहान व लाचार होतों, तेव्हां आपल्यास आईबापानी पोषिलें, लेववीलें व आपला सांभाळ केला; तीं आपली माया न करितीं तर आपण अनुपपत्तीमुळें मरून गेलों असतों. याकरितां आपण आईबापांचे उपकार स्मरावे, त्यांजवर, प्रीति करावी, आपले हातून त्यांचें जितकें बरें होईल तितकें करण्याविषयीं सिद्ध असावें हें उचित होय. त्यांचीं अवघीं यथोचित मागणीं व आज्ञा मान्य करण्याविषयीं आपल्यास विशेषेंकरून आनंद असावा.

एकाठायीं वाढलीं, एकाठायीं जेवलीं, एकच खेळ खेळलीं, एकाच आईबापाचे प्रीतीत वागलीं अशीं जीं बहीण भावंडें तीं एकमेकावर प्रीति करितील असी सर्वदा अपेक्षा असती. त्याप्रमाणें तीं करूं लागलीं असतां त्यांच्या मनोवृत्ति चांगल्या व तीं इतरांस प्रीति करावयास

योग्य असें दिसून येतें. जर त्यां बहीणभावांचें एकमेकाशीं पडेना, आणि भांडण होऊं लागलें तर त्यांची लोक विरुद्ध व दुष्ट वागणूक दिसूं लागती, त्याजवरून इतर सर्व जणास त्यांचा वीट येतो. परस्परें प्रीति करणारीं जीं भावंडें तीं थोर झालीं असतां कदाचित् एकमेकांचें कल्याणही करायास मोठीं उपयोगीं पडतात. याकारणास्तव तीं मुलें असतात तेव्हां परस्परांची प्रीति लागे असा संस्कार त्यानी आपल्या मनास चिंतेनें करावा.

## उंदीर व त्याचें ओझें.

आपण आपल्या आईबापांची ममता करावी असा बोध तुच्छ, व नाशकारक अशाही जीवांपासून होतो. कोण्यासमयीं घरांत, आणि तारवांत, उंदीर पुष्कळ होऊन फार नासाडी करितात, तेव्हां त्यांस धरायास सांपळे मांडणें अथवा मारायास सोमल घालणें अथवा त्यांचा समुदाय कमी करायास काहीं दुसरा उपाय करणें प्राप्त होतें. एकदां न्यूयोर्काहून एक तारूं लिस्बनास द्राक्षामद्य आणायास जात होतें, त्यांत उंदीर लवकरच फार होऊन त्यानी मोठी नासाडी मांडली, जें मिळे तें त्यानी खावें, वस्त्यांचा नाश करावा, त्यावरून खलाशी लोकानी शरीरा गाधून निश्चय केला कीं पहिले संधीसच यांस नाहींसें करून टाकावें. त्याप्रमाणें लिस्बनाचे बंदरांत तारूं सलामत आल्यानंतर मुख्य मालिमाने हुकूम केला कीं बारदानांत गंधक पेटवावा. मग ती धुरी त्या उंदरांस सहन होईनासें होऊन आपआपलीं ठिकाणें सोडून

तेपळूं लागले, तेव्हां त्या खलाशानी बहुतेक मारून टाकिले. शेव
म्हातारपणामुळें ज्यांचे केश केवळ पांढरे झालेले, तस्यांत जो आं
ळा अस्या उंदरास आपल्या पाठीवर घेऊन जाताना एक उंदीर त्
तारवाचे मजल्यावर दृष्टीस पडला: तेव्हां त्या खलाशांस कळवळ
येऊन असें वाटलेंकीं हा म्हातारा उंदीर या लहान उंदिराच्या बाप अस
वा. मग इतकी पुत्रभक्ति करणाऱ्याजीवास मारून टाकावें असें त्य
ऱ्या मनांत येईना. नंतरत्यानी त्याला आपल्या वृद्ध पित्यासहित स्व
लांतरीं निरुपद्रव जाउं दिलें.

## आनापिअस् आणि आम्फिनोमस्.

जे ज्वाळामुखी पर्वत आहेत त्यांच्या मस्तकीं पोंकळी असत
तिजमधून धूर, ज्वाळा, दगड, कढतकढत रस असीं फोणेसमयीं म
ठ्या वेगाने बाहेर पडतात. असेजेपर्वत युरोपखंडांत आहेत त्यां
एटना म्हणून जो सिसिली द्वीपांतला पर्वत तो मुख्य होय. पूर्वी बहु
तवर्षामागें या पर्वतामध्यें अपूर्वप्रकारच्या मोठ्या वेगाने भेद झाला
तेव्हां तो प्रज्वलितरस बाजूनीं खालीं चहूंकडेस उतरून गांवचेगांव
हीसे करीत चालला. आणि निखारे व राख याहीं करून आकाशव्या
न गेलें. तेव्हां जवळजवळ जे गांव होते तेथील लोक आपल्या मालापै
जे चांगले उंच किमतीचे पदार्थ ते समागमे घेऊन जीव वांचवायाकरि
पळूं लागले. असे आपल्या संपत्तीची काळजी वागविणारे जेलोक, त्
मध्यें अनापियस् व आम्फिनोमस् म्हणून दोघे तरणे पुरुष होते, तेआ
पल्या पाठीवर केवळ वेगळ्याच प्रकारचें पोझें घेऊन गेले, म्हणजे त्य

नी आपल्या बयातीत आईबापांस मात्र नेलें. त्यांचें कोणत्याही दुसऱ्याउपायानें रक्षण झालें नसतें.

हें असें त्यां दोघां जणांचें आचरण पाहून लोकांच्या मनांत मोठें सानंदाश्चर्य उत्पन्न झालें. तस्यांत दैवयोगानें असें घडलें कीं ते ज्या मार्गानें गेले तिकडे त्या प्रज्वलित रसानें स्पर्श केला नाहीं. त्याभोंवती अवघी जमीन दग्ध व ओस होऊन तितकाच प्रदेश मागाहून टवटवीत हिरवा राहिला. तेथले लोक अति अज्ञान, परंतु वृत्तीनें चांगले होते, ते असें मानूं लागले कीं ती भूमि बचावली हा चमत्कार, त्यां दोघां जणांच्या पुण्यानें घडला. तेव्हां पासून पुढें त्या भूमीस भक्तिमानाचें क्षेत्र असें नाव पडलें.

## आलेक्झांन्डर् धिग्रेट व त्याची आई.

आईबापें वाईट स्वभावाचीं आणि अविवेकीं असलीं तथापि मुलांनीं त्यांचा सत्कार करावा व त्यांचें तें सहन करून घ्यावें.

आलेक्झांन्डर् धिग्रेट ह्मणजे शिकंदर बादशाहा याची ओलिंपिआस् ह्मणून आई होती. तिला कारभार करण्याची आवड फार असे तेणें करून त्या शिकंदरास मोठी इजा पडे. असें असतांही तो एशिया खंडांतदेश जिंकीत असतां तेथें जी लूट सांपडे तींतील उत्तम पदार्थ तो तिला आपले प्रीतीची निशाणी ह्मणून पाठवून देई. तो तिला इतकें मात्र सूचवी कीं आई आपण कृपा करून राजकारभारांत हात घालूं नये, माझें राज्य चालवायास आंटिपेटर ह्मणून जो मुख्य अधिकारी नेमिला आहे त्याकडून तें राज्य निर्वेधपणें चालूं द्यावें. त्यावर तिनें शिकंदरास एक तीक्ष्ण उत्तर पाठविलें परंतु त्याचें उत्तर तीक्ष्ण शब्द लिहून परत न पाठवितां

कडच्या शेवटास केप आफगुडहोप ह्मणून बंदर आहे त्यास वळ सा घालून तें गलबत ईशानीकडेस नाळ धरून हिंदुस्थानास येतहोतें, इतक्यांत खडकास लागून त्याचा तळ फुटला, आणि पाणी आंत येऊन तें लवकर बुडल्याचाचून रहात नाहींअसा रूमार दिसला. त्यास मधीं त्या गलबतावर एक वाघी नाव होती, ती मुख्य मालिमाने बाहेर लोटून गव्हांच्या वड्या होत्या त्यांचा एक थैला, व शर्करामिश्रितपाकाच्या काहीं पेट्या त्यानावेंत टाकून आपण उडी घातली. त्याजबराबर दुसऱ्या एकुणीस मनुष्यानी उड्या टाकिल्या, आणि ती वाघी बुडूनये ह्मणून तरवारी पुढें करून दुसऱ्या कोणास येऊं दिलें नाहीं. मग ती वाघी चालवायास जवळ होका नाहीं, आकाशांतून देववशांतूजें पडेल तितकें, त्याखेरीज प्यायास गोडें पाणी नाहीं, असे स्थितीने तें लहानतारूं इंदियमहासागरांत लोटून दिलें. इकडे तें गलबत त्याजवरील त्या अवघ्या देवहीन प्राण्यासकट्यां लोकरच बुडून गेलेंसें वाटतें.

मग ती वाघी वल्हींमारून इकडेतिकडे फिरवितांफिरवितांचार दिवस मोठ्या संकटाने लोटले. इतक्यांत ज्याची प्रकृति काहींएक दिवस पूर्वींच जर्जर झाली होती असाजो मुख्य मालीम तोतर मरण पावला. त्यामुळें त्यानौकेतील लोकांस एक नवें संकट येऊन पडलें, कारण आतां अवघा गोंधळ होऊन गेला, सर्वच अमल करणारपण ऐकणार कोणी नाहीं. शेवटीं त्यानी असा ठराव केला कीं आपल्यांतून एक जण निवडून काढून त्यास मुख्य नेमून त्याच्या नियमाप्रमाणें आपण चालावें. मगज्याला मुख्य केलें त्याने त्या मंडळीस असें सांगीतलें

कीं, आपलें खाण्याचें थोडकेंसें साहित्य कांहीं दिवस चालावें याजकरितां आपण असें करावें कीं आपली सर्व मंडळी वांटून चारचारजणांचा एकएक गट करावा, आणि प्रत्येक गटांतून ज्याचें थ्याचें नाव निघेल त्याला नौकेंतून टाकून द्यावें. यासमयीं अवघेजण एकुणीस असामी होते त्यांत एक धर्मोपदेशक व एक सुतार होता ह्मणून सर्वांनी असा ठराव केला कीं यांदोघांस माफी द्यावी, कांतर धर्मोपदेशक अंतकाळीं बोध करून समाधान करायास पाहिजे, तसाच ही चाघीफुटून पाणी येउं लागलें, किंवा कांहीं दुसरें जड जोखीम झालें असतां तें नीट करायास सुतार ही पाहिजे, असा यांचा उपयोग आहे. याचप्रमाणें त्यामुख्याचाही बहुमान केला कीं हा गटाबाहेर एकटाच राहिला आहे, आणि याच्या जीवितापासून मोठें कार्य व्हायाचें. तें ऐकून मजवरही कृपा करूं नये ह्मणून त्या मुख्यानें फारवेळ नाकार केला, पण शेवटीं त्यानीं आपलें बोलणें त्याजकडून कबूल करविलें. तेव्हां बाकीचे जे सोळा असामी राहिले त्यांतून चौघानीं मरावें असें झालें.

मग तिघांजणांनीं तर जो धर्म संस्कार करायाचा तो करून घेउन आपल्या दैवें करून प्राप्त झालेला वांटा उचलिला. चौथा जो पोर्तुगीज गृहस्थ राहिला, त्याचा एक कनिष्ठ बंधु त्याच नौकेंत होता तो आपल्या वडील भावास त्यां तिघां सारिखें नौकेंतून टाकितात असें पाहून अत्यंत प्रीतिपूर्वक आलिंगून नेत्रीं अश्रु आणून बोलिला कीं दादा तुमच्या बारचा मी मरतों. तुह्मास बायको व मुलें आहेत, तीं व तिघी वहिणी यांस तुमचा काय तो आश्रय, माझ्यामागें कोणी नाहीं, ह्मणून तुमचें वांचणें

जसें अगत्याचें आहे तसें माझें नाहीं. असें त्याचें औदार्य पाहून त्या ज्येष्ठ बंधूने विस्मित व सद्गदित कंठ होऊन उत्तर केलें; आपल्याकरितां दुसऱ्या कोणास मरूं देणें हें दुष्ट व अनीतियुक्त कर्म होय, तस्यांत तूं तर माझा भाऊ, तुझा मजवर उपकार आहे त्यास अंत नाहीं. असें वडिलाने सांगितलें, पण तो धाकटा भाऊ आग्रहास पडला, आपल्या अंगीकृताचा त्याग करीना, आणि त्याने गुडघे जमिनीवर टेंकून त्या वडील भावास असें गच्च धरिलें कीं ती मिठी त्या मंडळीस सुटेना. याप्रकारें त्यांचें काहींवेळ झोंबट चाललें, मोठ्याने त्यास सांगितलें कीं अरे आतां माझ्या मुलांस तूंच बाप, त्यांचा व माझे स्त्रीचा सांभाळ कर, आणि माझे मिळकतीचा वारसदार तूंच होऊन आपल्या त्यां वहिणींचा प्रतिपाळ कर, असें तो जितकें बोलिला तितक्यानेही तो धाकटा उगा राहीना. शेवटीं त्याचा तो औदार्ययुक्त हेतु पाहून त्या वडील बंधूने आपला निश्चय सोडिला, मग त्याच्या बद्दल त्या धाकट्या भावास समुद्रांत टाकून दिलें.

तेव्हां तो वयाने तरुण, व पोहणारा चांगला होता, ह्मणून त्याने ती नाव लौकर आटोपून तिचें सुकान एका हाताने धरलें. तें पाहून त्या नौकेंतील एका खलाशाने त्याचा तो हात तरवारीने छाटून टाकिला, तेणें करून तो मागें पाण्यांत पडला. पुनः ह्रिव्या धरून त्याने दुसऱ्या हाताने ती नाव धरली, तोही हात त्या खलाशाने पूर्वोक्तप्रमाणें कापून टाकिला. असें केलें तथापि ज्यांतून रक्त वाहत आहे असीं तीं थोटें वर धरून त्या दोन्ही थोटांनी व पायांनी आपल्यास पाण्यावर तरतें ठेविण्याचा त्याने उद्योग केला. असी त्याची अवस्था पाहून व त्याची बंधूविषयींची प्रीति मनांत

आणून त्या नौकेंतल्या लोकांसही त्याचा मोठा कळवळा आला, आणि ते मोठ्याने ह्मणूं लागले कीं "हा एकटाच मनुष्य राहिला, त्याचाजीव वांचवायाचा उद्योगकरावा." मग त्यांनी त्याला वाचींत घेतलें आणि त्यास्थळीं चप्रसंगीं जसें अनुकूळ पडलें त्याप्रमाणें त्यांच्या त्या कापलेल्या हातांस पट्या बांधिल्या. मग अवघी रात्र ती नांव वल्ह्यांवरचालविली. पहांटेस सूर्योदय होतांच त्यांस दूरून भूमि दिसली ती आफ्रिकेच्या समोर मोसांबिक बेटांतील पर्वत असा निश्चय झाला. तेथून दूर नव्हे असी पोर्तुगीज्‌लोकांची एकवसाहतीची जागा होती. तेथें ते सलामत उतरून राहिले, मग लिस्बनाहून आलेलें एक गलबत त्यासंस्थानावरून जाऊं लागलें त्यांत बसून गोव्यांसगेले.

लिन्स्कोटेन ह्मणून एका चांगल्या प्रमाणिक ग्रंथकर्त्याने लिहिलें आहे कीं म्या त्यां लोकांला गोव्यांस उतरतां पाहिलें आणि त्याचरात्रीं त्यांदोघां भावांबरोबर खाणें खालें. धाकट्या भावाचीतीं थोटें आपल्या दृष्टीने पाहिलीं, वही गोष्ट त्यां दोघांच्या मुखाने व त्यांचे जे दुसरे सोबती त्यांजपासूनही ऐकिली.

---

## कनिष्ठवश्रेष्ठयांविषयींवागणूक

मनुष्यास आपआपले उद्योग करायास जसी विशेष किंवा अल्पबुध्दि अथवा विद्याभ्यास आवश्यक असतो, त्याप्रमाणें लोक त्यांच्याठायीं वेगळाल्या मानाचें महत्व आरोपितात; असें कीं, बहुधा सांगायाजोगी ज्यांची बुद्धि आणि चांगली अध्ययन संपन्नता असती असजे व्यवहार शास्त्रज्ञ आणि वेद्य त्यांस व्यापारी लोकांपेक्षां मोठे असें मानितातः कांसर व्या

पार चालवायास इतकी मोठी बुध्दि अथवा विद्याभ्यास नलगे. व्यापारी, मजूरांपेक्षां मोठे असें लेखितात, कांतर त्यांचें काम करायास शरीर सामर्थ्या शिवाय दुसरी थोडक्यांचीच गरज असती. व्यापारी, शिल्पी अन्यां लोकांतून ज्यांकडेस फार द्रव्य असतें, त्यांस मोठेपणा प्राप्त होतो, कां तर आपल्याकडेस बहुत लोकांला उद्योगास लावावयास आणि मोठमोठे व्यापार करायास त्यांचे ठायीं त्या द्रव्याचें सामर्थ्य असतें. आपल्या जमीनीच्या उत्पन्नावर आपला निर्वाह करणारे असे प्रतीचे जे लोक असतात, ज्यांस जमीनीचे मालक अथवा जमीनदार असें ह्मणतात, त्यांचा मोठेपणा त्यांअवघ्यां द्रव्यवान् व्यापाऱ्यांपेक्षां अधिक असी समजूत आहे. धर्मोपदेशक, कोतवाल, न्यायाधीश अथवा तसीं दुसरीं सर्कारी मोठीं कामें चालविल्यामुळें ज्यांस मोठेपणा प्राप्त होतो असेही दुसरे लोक आहेत.

असी लोकांत पदांची प्रवृत्ति झाली आहे. कोणास इतरांपेक्षा थोर पदाचे लोक असें ह्मणतात, आणि प्रत्येकास आपल्यापेक्षां कोणी थोर असतात, कोणी लहान असतात, कोणी आपल्या बरोबरीचे असतात. जो लहान, त्याने थोरास मान द्यावा हें उचित होय, सामर्थ्य अथवा सद्गुण अथवा सर्कारी मोठें काम यामुळें जर तो थोरपणा प्राप्त झाला आहे तर विशेषेंकरून मान द्यावा. परंतु हें मान देणें चाकरपेशाचें अथवा थोरांची मुखस्तुति करण्याच्या बेताचें नसावें. कसाही दीन असला तथापि त्यास आपलें मान रक्षण हें आपलें ऋण आहे, हा विचार करून इतरांस हांजी हांजी करणें आणि त्यांचें आर्जव करणें याची मनाई असावी.

जे लहान त्यानीं करायास अयोग्य अन्या मानाचा मुजरा त्याक

डून बळानें न करवितां, त्यासीं ममतेनें वागवें हें थोरास उचित आहे. मनुष्यसंबंधानें तीं त्याचीं भावंडें असलींतीं आहेत, आणि प्रत्येकाची आप आपल्या पदवीप्रमाणें काहींतरी भारदारी असती. असें पहातां लहानानें जसा थोरास मान द्यावा तसा थोरानेंही लहानास द्यावा. जोकोणी इतरांस लहान मानितो आणि त्यांजविषयीं तिरस्काराची वागणूक धरितो त्यानें जें पद अवलंबिलें असतें त्यास अगदीं योग्य नव्हे असें मात्र तो दाखवितो. तसेंच, उंच पदवीच्या लोकांनी संताप विल्याशिवाय त्यांस जो चेष्टेचें भाषण नित्य बोलतो त्याचें मन हलकें आणि समत्सर याविषयीं त्याच्या करण्यासारिखें दुसरें काहीं उघडें करणारें नाहीं.

अमुक दरानें रोजमुरा घेऊन अमुक वेळ काम करीन असा करार जो कोणी एका धन्याच्या अथवा धनिनीच्या कामाविषयीं करितो, त्याला चाकर म्हणावें. तें काम करणें आणि आपल्या धन्यासीं अथवा धनिनीसी आदरपूर्वक वर्तणें हा त्या चाकराचा धर्म होय. तसेंच, धनी अथवा धनीन यांसही त्या चाकरासीं सौजन्यानें व ममतेनें वागणें प्राप्त आहे. याप्रमाणें चाकरासीं चागलें म्हणजे तो बहुतकरून विशेष संतोषानें व चांगलें काम करितो, तसें त्याच्या धन्यानी त्यासीं दांडगाईची व दराऱ्याची वागणूक असली तर करीत नाहीं. चाकरांसीं चांगलें वागलें असतां त्यांला ही बहुधा आपल्या धन्याची अथवा धनिनीची फार माया लागती, मग ते केवळ रोजमुऱ्याकरितां आपलें काम करितात असें नाहीं, तर धन्याचे प्रीतिकरितां करितात. आपल्या कृपाळू धन्याकरितां अथवा धनिनीकरितां चाकरानी प्रत्येक प्रसंगीं आपल्या जीवास संकटांत पाडिलें आहे.

बहुत्येक सुशिक्षित देशीं चाकरांचा फकत एका वर्षाचा अथवा

काहीं कमी मुदतीचा आपल्या धन्यासीं करार झाला असतो; आणि मुदत भरली ह्मणजे मग ते आपल्या धन्याप्रमाणें मुखत्यार होतात. परंतु कित्येक देशीं चाकर असतात त्यांस गुलाम असें ह्मणतात, ते बहुधा आफ्रिकाखंडींचे काफ्री असतात अथवा त्यांचीं आईबापें त्या देशींचीं असतात. जसें आपण आपल्या जनावरांस आपला माल असें समजतों तसेंच त्या गुलामांस त्यांचे धनी समजतात. त्यांला एका धन्यानें दुसऱ्या धन्यास विकलें असतां ते विकिले जातात. त्यांस जर मुलें असलीं तर तींही गुलाम होतात. ते जीवंत आहेत तोंपर्यंत, अथवा आपला मोकळेपणा करून घ्यावयाचा तरतुदीचा पैका काहीं एका उपायानें त्यांस मिळे तों पर्यंत त्यांस धनी जें काहीं सांगेल, तें करावें लागतें. नीट विचार करून पाहणारे जे त्यांस असें स्पष्ट दिसतें कीं दुसऱ्या मनुष्यास आपला दास करून ठेवावें ही सत्ता कोणा एकाही कडेस नाहीं; असें असतां जो कोणी स्वाभाविक नीतीस न गणितां मनुष्यांस आपले गुलाम करून ठेवितो त्यानें त्या गुलामांची जितकी माया करवेल तितकी करून त्यांस प्राप्त जाहालेला जो जड बांधतो हलका होई असें करावें. गुलामाचीही आपल्या उदार स्वामीवर प्रीति बसून त्याजबराबर तो विश्वासानें वागूं लागतो.

## सिसिली आणि नेपल्स यांचा आल्फोंसो नामा राजा.

सिसिलीद्वीप आणि नेपल्स देश यांचा आल्फोन्सो राजा आपले प्रजेसीं ममतेनें व विनयानें वागण्याविषयीं विख्यात असे.

याचें सिसिलीद्वीपांत युद्ध कर्म होत असतां असें झालें कीं शत्रु याला नदी उतरूं देईना, तेव्हां त्याच नदीच्या तीरीं याला आपले फौजेस

ह्यां मुकाम करावा लागला. तेथें खाण्याच्या सरंजामावांचून लष्कर अर्धा दिवस अटकून राहिलें. संध्याकाळ व्हायास आला आहे इतक्यांत एका शिपायानें त्या राजाला एक पावाचा तुकडा, कांहीं दुधाच्या खवा, व एक मुळा असीं आणून दिलीं. अशा प्रसंगीं तर बहुतेकांस ते पदार्थ आवडीनें घेयाजोगी भेट असें झालें असतें परंतु राजा त्या भेटीचा अंगीकार न करून, त्या शिपायास बोलिला कीं मी तुझा आभारी झालों. एथें माझ्यासारिखे भले आणि शूर असे बहुत मनुष्य उपोषण काढीत आहेत, तेव्हां माझ्या एकट्याच्यानें मेजवानी घेवत नाहीं.

आणखी एकदां असें झालें कीं क्यापेनीया प्रांतांत एक खेंचर चिखलांत रुतला त्याला काढायास त्याच्या धन्यानें आपल्या बळाची पराकाष्ठा केली, पण तो त्या एकट्यास निघेना. त्यासमयीं तिकडून जे येतजात होते त्यांनीं येऊन साह्य व्हावें ह्मणून त्या गरीबानें त्यांस बोलाविलें पण कोणीच आलें नाहीं. इतक्यांत आल्फान्सो राजा घोड्यावर बसून एकटाच जात होता तो तेथें आला. त्याला न ओळखतां त्या खेंचरवाल्यानें साहाय्यार्थ बोलाविलें. तें ऐकतांच राजा झडकन आपल्या घोड्यावरून खालीं उतरला आणि त्या खेंचरवाल्याला मदत करून त्या खेंचरास तत्क्षणीं बाहेर काढून चांगले जमीनीवर आणून उभें केलें. नंतर आपला खेंचर काढायास लागला होता तो राजा असें त्या खेंचरवाल्यास समजतांच तो गुडघे टेंकून माझा अपराध क्षमा असावा ह्मणून त्यास बोलूं लागला. ते व्हां राजा ह्मणाला "त्वां कांहीं एक अपराध केला नाहीं." आल्फोन्सो राजाची ही असी भलाई पाहून पूर्वीं बहुतेक जे त्यास प्रतिकूल होते ते त्याजबरोबर सरळभावानें वागूं लागले

## एका धन्याच्या आंतलें गांठीचे स्वभावाची निंदा

देशपर्यटन करणारा आन्सन्साहेब पूर्वदेश फिरून आपल्या घरीं आल्या नंतर त्याच्या बरोबर जो चाकर गेला होता तो रजा मागूं लागला. रजा मागण्याचे कारण त्यास पुसलें, तेव्हां तो बोलिला मला तर आपणापासीं कांहीं गिल्ला सांगायाचा आहे असें नाहीं, इतकें मात्र कीं आपल्या बरोबर मी श्रम व संकटें काढीत असतां आपण मजसीं हुकुमतीच्या बोलण्यावांचून दुसरा एक शब्द कधीं बोलिला नाहीं.

## मेरी कारिल.

लेडीएलिनॉर बट्लर व मिस्पोन्सोनबी ह्मणून दोघी ऐरीश देशींच्या प्रतिष्ठित कुलीन स्त्रिया होत्या, त्या वेल्सप्रांतीं एका लहान्या घरांत रहात असत् आणि मेरी कारिल ह्मणून एक चाकर त्यांचे कडे चाकरीस असे. ती त्या आपली जन्मभूमि सोडून आल्या तेव्हां त्यांच्या समागमें आली होती. ही मेरी आपल्या दोघी धनिनी बरोबर मोठ्या विश्वासाने वागे. व त्यांजवर फार प्रीति करी. इने आपल्या बाळपणापासून आपलें अवघें आयुष्य त्यांचे सेवेंत घालविलें. त्यांची इजवर फार माया बसली होती, त्याइला आपली केवळ चाकर असें मानीत नसत, ही आपली सखी असें मानीत. त्या तिघीजणी ह्मातान्या झाल्या तेव्हां त्या दोघी कुलीन स्त्रियानीं एक त्रिकोणी दगड करविला आणि असें सांगीतलें कीं लानूगोलेन् एथील देवळाचे परसांत एक थडें बांधून त्याजवर तो दगड बसवावा आणि योग्यकाळीं त्या दगडाचे एकेएके बाजूवर मुद्रित लेख करावा. नंतर मेरी प्रथम मरण पावली, तिला त्या सांगितल्या ठिकाणीं पुरून

त्यां दोघीं धनिनीची मेरीविषयींजी प्रीति होती ती त्यानी थडग्यावरच्या लेखांत प्रगट करून तो लेख त्या दगडाचे एके बाजूवर कोरविला. काहीं वर्षे गेल्यानं तर त्याही मरण पावल्या; तेव्हां त्यांलाही मेरीचे जवळ तिचे बाजूस पुरून त्या दगडाच्या ज्या दोन बाजू राहिल्याहोत्या त्यांजवर त्या स्त्रियांविषयींचे थड ग्यावरचे लेख कोरविले. याप्रमाणें त्या तिघीजणी भिन्न भिन्न योग्यतेच्या अ सतां प्रीतिपूर्वक परस्परांच्या उपयोगीं पडून परस्परांचा मान रक्षून शेवटीं त्यानी केवळ बरोबरीच्या नात्याने परस्परांजवळ शव गर्तेत देह ठेविले.

तिसरा जार्जराजा याकडेस एक स्त्री चाकरीस असे. ती त्याच्या कुटुं बांत बहूत दिवस राहून मोठ्या विश्वासाने वागून मरण पावली. त्याकाळीं विं डसर एथील सेन्टजार्ज्याच्या देवळाजवळ तिचे शव गर्तेवर राजाने एक धडें बां धविलें, आणि त्याजवर तिचें स्मरण रहावें ह्मणून एक प्रेमसूचक असा ले ख कोरविला.

## प्लान्कस् आणि त्याचे दास.

ओकटेविअस्, लेपिडस व आन्टोनियस् यांस रोम नगरांत जेव्हां अत्यंत थोर अधिकार प्राप्त झाला, तेव्हां प्लान्कस् ह्मणूनजो पूर्वींचा मुख्य राजकारभारी त्याला आपला जीव वांचवायास पळावें लागलें. तेव्हां ते त्या च्या दासांस धरून पीडा करूं लागले परंतु प्लान्कसास दाखवून देण्यावि षयीं त्यानी नकार धरिला. तेव्हां मोठ्या यातनांचीं साधने सिद्ध केलीं. त्या जवरून प्लान्कसास वाटलें कीं यां असल्यां विश्वासू सेवकांस मारवून आ पल्यास वांचवूं नये. मग तोजेथें लपलाहोता तेथून बाहेर पडून आपलाप्रा ण हरण करण्या विषयीं जे पाठविले होते त्यांच्या तरवारींस आपलें शरीर

अर्पण करायास सिद्ध झाला. स्वामी व दास यांची परस्परांविषयीं जी प्रीति तिच्या अस्या थोर निदर्शनावरून त्याझान्कसास अपराध क्षमा झाला आणि सर्वलोक असें बोलूं लागले कीं असल्या उत्तम सेवकांस झान्कस् हाच स्वामी योग्य आणि असल्या उत्तम स्वामीस हेच सेवक योग्य.

## एका सेवकाचें औदार्यपूर्वक स्वार्पण.

इस्वी सन १७७६चे सालीं हिवाळ्यांत कौंटपोडोट्स्की ह्मणून एक मानकरी आपले स्त्रीस घेउन वायना नगराहून क्रांको नगरास जात होता. तो कार्पाथियान् पर्वताचे जवळ येतांच त्या पर्वतावरून लांडग्यांचे कळपांचे कळप उतरूं लागले. हे त्या पर्वतांत पुष्कळ असतात आणि फार थंडी पडूं लागली ह्मणजे मोठे धीट व क्रूर होतात. त्या मानकऱ्याचा रथ ओसविक शहर टाकून झारोर शहरास जात असतां व तेथून थोडक्या कोशांवर क्रांको राहिलें असतां ते लांडगे त्याचे रथाचे पाठीस लागले. तेव्हां त्याने दोन चाकरांतून एकास डाकेच्या घोड्याची तयारी करितां पूर्वीं सूचना करायास पुढें पाठविलें होतें आणि दुसरा त्याच्या जवळ होता. त्याच्या विश्वासूपणामुळें तो मोठा योग्य असें तो मानकरी समजत असे त्याने ते लांडगे जवळ जवळ येत चालले असें पाहून आपल्या धन्यास विनंती केली कीं आपण आज्ञा द्याल तर हा माझा घोडा मी यांजकरितां सोडून देतों, तेणेंकरून यांचा क्षोभ काहीं शांत होईल आणि आपल्यास झारोर आरपायास अवकाश मिळेल. तें त्या मानकऱ्याने कबूल करितांच त्या चाकराने रथाचे मागें चढून घोडा मोकळा सोडून दिला, त्यास त्यां लांडग्यानी धरिलें आणि फाडून त्याचे तुकडे तुकडे करून टाकिले. इकडे तें शहर फार दूर नव्हतें ह्मणून तें आरोपायाचे आशेने ते पांत स्थ

फारच लगबगकरून जाऊं लागले, पणते घोडे थकून गेलेले होते, आणि त्यां लांडग्यांच्या तोंडास रक्त लागून ते फारक्रूर झालेले होते ह्मणोन ते त्या गाडीस आटोपायाचे संधीस आले. तें अत्यंत संकट पाहून तो चाकर ओरडून ह्मणाला, "आतां आपल्यास वांचायाचा एकमात्र उपाय राहिला आहे. मी तुझे स्त्रीचें व मुलांचें पित्याप्रमाणें पालन करीन असें मला आपण वचन द्याल तर मी यां लांडग्यांवर उडी टाकून जातों. माझा तर खचीत नाश होईल परंतु हे मजवर पडतील इतक्यांत आपण सुटून जाल." ही गोष्ट कबूल करायास तो मानकरी कांकूं करूं लागला, पण सुटून जायाची दुसरी आशा राहिली नाहीं ह्मणून त्यानें शपथपूर्वक वचन दिलें कीं आमच्या रक्षणार्थ आपला प्राण देशील तर तुझ्या कुटुंबाचें मी नेहमी पालन करीन. त्याजवरून तो चाकर तत्क्षणींच खालीं उतरून त्यां लांडग्यांचे अंगावर गेला, तो त्यांनी मारून खाल्ला. इतक्यांत तो मानकरी झारोरगांवाचे दरवाजापासीं जाऊन पोंहचला, तेणेंकरून तो वांचला. मग त्यानें तें आपलें वचन अंतःकरणपूर्वक पाळिलें.

---

## उद्योग.

मनुष्याच्या निर्वाहास व सुखास आवश्यक असे बहुत पदार्थ निर्माण होत असी ही पृथ्वी सर्वशक्तिमान् जो जगताचा उत्पन्नकर्ता यानें केली आहे. परंतु मानुषउद्योगावांचून त्यां पदार्थांतून कोणतेही पदार्थ जितके व्हावेत तितके अथवा उपयोगी पडायाजोगे असे विरळा मिळतात. धान्य ह्मटलें ह्मणजे तें पेरून त्याची लाणी केली पाहिजे, धातूंस तर भूमींतून खणून काढून त्यांचीं आउतें केलीं पाहिजेत; तसेंच सण, लोकर, कापूस, यांस कांतून

त्यांची वस्त्रें केलीं पाहिजेत त्याअस्यांआणियांजसारिख्या दुसरे उद्योगांपासून प्रत्येक मनुष्यास आणि देशास संपत्ति प्राप्त होती. याजकरितांजो शरीराने केवळ अशक्त अथवा ज्याचे बुद्धीस विकार झालेला म्हणून ज्याच्याहातून कांहीं उद्योग होत नाहीं अथवा ज्यास आपल्या अथवा दुसऱ्यांच्या मिळकतीनें व्हावें तितकें द्रव्य मिळालें आहे, त्यामुळें अधिकाची गरज राहिली नाहीं अस्याशिवाय ज्या कोणास अन्न अथवा वस्त्र अथवा कांहीं दुसऱ्या उपयोगी पदार्थांची इच्छा आहे. त्यानें सर्वांचे मेहनतीमध्यें आपला अंश द्यावा.

जे लोक उद्योग करीत नाहींत, फळें अथवा रानांतील जीव खाऊन राहतात, त्यांस रानटी लोक असें म्हणतात. अमेरिका खंडांतील लोक, काफ्री, व आस्त्रालियाचे मुळचे राहणार लोक, हे सर्व रानटी जाणावे. यांची उपजीविका करण्याची रीति तर केवळ विपत्तिकारक, त्यांस चांगलें सुखकारक अन्न, अथवा वस्त्र नसतें, त्यांच्याजवळ संग्रह नसतो म्हणून दुकाळ पडला असतां, ते भुकेनें बहुधा पुष्कळ मरतात. ज्या देशीं असे रानटी लोक असतात, तेथें चौरस अर्ध कोश जमिनीपासून एका मनुष्यावांचून, दुसऱ्याचा सांभाळ होणें विरळा.

जे लोक उद्योग करितात, त्यांची उपजीविका करण्याची रीति फार चांगली असती. ते गुरें ढोरें, मेंढरी इत्यादिक वाढवून त्यांचें पालन करितात. धान्य पेरून त्याची लाणी करितात, आपल्यास राहयास घरें बांधितात, दुसऱ्या देशींउत्पन्न झालेले पदार्थ तारवांत घालून आपल्या घरीं घेऊन येतात, याजकरितां रानटी लोकांस ज्यांची रुचीही कधीं ठाऊक नाहीं असीं बहुत सुखें त्यांस प्राप्त होतात. बहुधा असें आहे कीं लोकांचा उद्योग जसा असतो त्याप्रमाणें तंतोतंत वाईट अथवा बरा त्यांचा प्रपंच असतो. जर्मन्, स्विस, फ्रेन्च, डच,

आणि ब्रिटिश, हे लोक इतर सर्व देशींचे लोकांपेक्षां मोठे उद्योगी, ह्मणून त्यांची साधारण प्रपंच स्थिति इतरलोकांपेक्षां फार चांगली आहे, यां लोकांच्या देशीं चौरस अर्धकोश जमीनीवर मनुष्यें एकापासून तीनशें असतात. ज्या देशीं उद्योग फार, त्या देशीं लोकही फार, व तेच लोक फार सुखी, नसें ज्या देशीं उद्योग नाहीं तेथले नाहींत असें आपण पाहतों.

हाच नियम प्रत्येक मनुष्याचे व्यक्तीविषयीं जाणावा. जो कोणी काहीं काम करित नाहीं, अथवा इतर मनुष्यांच्या काहींएक उपयोगास पडत नाहीं, त्यास अनुपपत्ति असती; परंतु जो कोणी काम करितो, त्याला थोड्या अथवा बहुत सुखाने निर्वाह करायास द्रव्य मिळतें. बहुधा असें आहे, मनुष्य जसे उद्योगी, व भले असतात, अथवा जसे तद्विपरीत असतात, तसी त्यांची भरभर होती. ईश्वरा कडला असा नियम आहे कीं, जे काहीं चांगले पदार्थ, ते उद्योगानेच प्राप्त व्हावे व उद्योग मनुष्यास उपयोगी पडावा. व प्रीय वाटावा. याजकरितां आपल्या मनास आणि हातांस काहीं उद्योग असल्यावांचून आपल्यास आरोग्य असत नाहीं, व सुख होतनाहीं. तसेंच, आपण उद्योग अतिकष्टानें अथवा अति व्यासंगाने करूं नये, कां तर असें केलें असतां, आपलें शरीर सामर्थ्य नाहींसें होतें, व आपल्यास विकृति प्राप्त होती, त्याचा परिणाम आळसापेक्षांही वाईट आहे. रविवार सोडून प्रतिदिवसीं दहा तास काम करणें हें आरोग्यास अनुकूळ असायासारिखें असें प्रायः मानिलें आहे.

---

## शेतकरी आणि त्याचे पुत्र. कल्पित गोष्ट.

कोणीएक शेतकरी मरायास टेंकला, तेव्हां त्याचे मनांत असें

आलेंकीं आपण ज्या शेतकींत आपल्या अवघ्या जन्मभर मेहनत केली ती शेतकी आपल्या मुलांनी चालवावी. तिकडे त्यांस लावण्याविषयीं त्यानेही एक असी युक्ति केली. त्याने आपले मुलांस आपल्या खाटेचे बाजूस बोलावून असें सांगितलेंकीं मुलांनो मलाजें काहीं पितृद्रव्य तुह्मास द्यावयाचें,तें माझें शेत आणि द्राक्षेची बाग आहे. त्याचे मी तुह्मास समाईक वारिसदार करितों. पण मी तुह्मास बजाऊन सांगतों कीं हें तुह्मी आपल्या वहिवाटीतून बाहेर जाऊं देऊं नका. कां तर माझ्याजवळ दुसरा काहीं कुणगा असायाचा, तो त्याजमीनींत कोण्या एक्या ठिकाणी तळापासून सुमारें हातभर पुरून ठेविला आहे.

याजवरून त्या पुत्रांनी अनुमान केलेंकीं त्याने तेथें आच्छादून ठेविलेल्या पैक्याविषयीं तो बोलत आहे, ह्मणून बाप मरण पावल्यानंतर त्यानी एकसारख्या आयास व व्यासंग करून त्या शेताची व द्राक्षेचे बागेची अवघी जमीन मोठे काळजीने खोदली, एकतसूही शेष ठेविली नाहीं, तेणेंकरून असें झालें कीं त्यानी ज्या द्रव्याची आशा केली होती तें तर सांपडलें नाहीं, परंतु ती जमीन खालची वर होऊन चांगली मोकळी झाली ह्मणून तींत जें पेरिलें त्या अवघ्याचें पुष्कळ पीक आलें, तेंच वास्तविक व बहुत द्रव्य असें अनुभवास आलें.

## क्रेसिन.

सृष्टपदार्थांविषयींचा प्राचीन ग्रंथकर्ता प्लिनी असें लिहितोंकीं इटाली देशांतील एका प्रांतींचे लोक आपल्यामधील एका क्रेसिन नामक पुरुषाच्या शेताचा पवपवीत देखावा व त्याचा मोठा पिकाऊपणाहीं

पाहून फार आश्चर्य करूं लागले. त्यांच्या जमीनी दरिद्री व नापीक झा-ल्या होत्या ह्मणून त्यांस असें वाटलें कीं क्रेसिन् हा आपली भूमि फार पीक देई असें करायास कांहींतरी जादू करीत असेल. मग त्यांनी त्यास न्यायाधीशाकडेस आणून हा जादूखोर असा त्याजवर आरोप ठेविला.

क्रेसिन् याला जवाब द्यायास सांगितलें, तेव्हां आपली एक थोराड मुलगी, आपलीं शेतकीचीं आउतें व नांगराचे बैल, यांस तो घेऊन आला, आणि बोलूं लागला कीं माझे शेतांत जें पिक निघतें त्या अवघ्याची बेणणी ही मुलगी करिती. जमीनीनें चांगलें पीक द्यावें ह्मणून मोठे काळजीनें जमी-नीस मी खत घालितों. हीं माझीं अवघीं आउतें पाहा कसीं सर्वोत्कृष्ट चांग-ल्या प्रकारचीं ठेविलीं आहेत. माझ्या गुरांढोरांस मी फार जीव लावून पोषि-तों, ह्मणून यां सारिखीं पुष्ट गुरें दुसरी कोणाचीं गावांत नाहींत, पहा ही अ-सीजी माझी शेत करण्याची रुति, हीच कायती माझी जादू. हे असे उपाय कोणी माझ्या शेजाऱ्यांतून केले तर माझ्याप्रमाणें त्यांचें ही पीक चांगलें येईल.

न्यायाधीश ह्मणाले याहून चांगली तकरार तर आह्मी कधीं ऐकिलीच नव्हती. मग त्यांनी क्रेसिन्चे उद्योगाची स्तुति करून त्यास जायास निरोप दिला.

## मेहनतीरुतार

सरजोना बारिंगटन् यानें आपल्या हकीकतीच्या पुस्तकांत असें लिहून ठेविलें आहे की "कीन् सकौंटी या प्रांतीं मिस्तर क्लार्क नामें एक रुतार काम करणारास म्या पाहिलें असें मला स्मरण आहे. तो अदालतींत कोंनचालास बसायाकरितां बांक करीत असतां, त्याची बसक

विशेष मेहनतीने रोखून गुळगुळीत करूं लागल्यावरून त्यास कोणी हांसलें. तेव्हां त्याने किंचित् हांसून असें उत्तर केलें कीं मला स्वस्थानें बसायाकरितां मी हें असें करीत आहे. कांतर याजवर बसायाचा अधिकार मला प्राप्त होईतोंपर्यंत मी मरणार नाहीं असी मी अपेक्षा करितों. ही त्याची अपेक्षा पूर्ण झाली. हा मोठा उद्योगी, प्रमाणिक, हुरमतदार सदयांतःकरण असा मनुष्य असे. त्याने स्वातंत्र्यानें राहायापुरतें द्रव्य मिळविण्याविषयीं यत्न केले ते सर्व सिद्धीस गेले. त्याने तें द्रव्य मिळविलें आणि सचोरीने मिळविलें. त्याची माल मिळकत जसी वाढत गेली, तसी त्याची आब्रूही वाढत गेली. नंतर त्यानें जो बांक साफ करून रोखिला होता त्याच बाकावर तो कोतवाल होऊन बसे तोंपर्यंत वांचला.

## बेन्जामिन्फ्रांक्लिन्

बेन्जामिन् फ्रांक्लिन् हा उत्तर अमेरिकेंत बोष्टन्नगरांतील एका मेणबत्या करणाराचा लेंक. याचा बाप गरीब असे, ह्मणून याला त्याने कागद छापायाचें काम शिकविलें. याला ग्रंथवाचायाची आवड असे. हा जितका ऐवज सांचवी तितका ग्रंथ विकत घेण्यात खर्ची, असें करीत असतां आपलें जें काम करायाचें त्यांत आळस करीत नसे, संचय होई अस्या रीतिने उपजीविका चालवी, आणि कधीही काळ व्यर्थ घालवीत नसे. हा सतरा वर्षांचा असतां, उत्तर अमेरिकांत फेलाडेल्फिआ ह्मणून एक दुसरें शहर आहे तेथें जाऊन तेथल्या केमर नामक छापणाराबरोबर काहीं वेळ काम करूं लागला. त्यासमयीं हा आपले बुधीने व उद्योगाने चांगले, शुध भाषेंत पत्र लिहायास शिकला होता. तेव्हां

दैवयोगें असें झालें कीं, याने एक पत्र लिहिलें होतें तें त्या प्रांताच्या हाकिमाचे दृष्टीस पडलें. तें पाहून त्याला इतकें चांगलें वाटलें कीं त्यानें या अल्पवयस्क छापणाऱ्याच्या शोधार्थ याच्या धन्याच्या कारखान्यांत जाऊन यांजला आपल्याघरीं यावयाचें आमंत्रण केलें. नंतर याने लवकर लंडन शहरास जाऊन तेथील निरनिराळे छापणारांजवळ चाकरी केली. दुसरे कामकरी दर आठवड्यांत सुमारें सहा शिलिंग ह्मणजे तीन रुपये खर्चून बीर मद्यें करून आपले बुद्धीस विकार करून घेत, परंतु हा कोणतें मद्य पीत नसे ह्मणून याची बुद्धि चांगली स्वच्छ राहिली, याचे शरीरीं आरोग्य राहिलें, व गांठीसही थोडा पैका सांचला मग हा विसावे वर्षी चांगला हुशार होऊन फिलाडेल्फीआ एथे परत येऊन तेथें लवकर केमर साहेब या बरोबर भागीने काम करूं लागला. त्यासमयीं हा फारच उद्योगी झाला. लहान पृष्ठांचा एक कागदाचा ताव छापे इतके याने प्रति दिवसीं छाप जुळीत असावे आणि त्याशिवाय दुसरेंही काम करीत असावें. असा याचा उद्योग व प्रमाणिक, व चोखवर्तणुक, व चपलबुद्धि पाहून याचे शेजारी संतुष्ट झाले, आणि त्यांच्याने जितकें काम आणवेल तितकें ते आणून यांस देऊं लागले असें झालें असतां हा नांदल्यावांचून कसा राहील ? मग हा एक वर्तमानपत्र छापूं लागला. तें काम याने मोठ्या शाहाणपणाने आणि बुद्धिबलाने चालविलें ह्मणून त्या पत्राचा फार प्रचार होऊन यास बहुत मिळकत झाली- अशाही यशप्राप्तीने आपली वृत्ति बिघडली नाहीं हें दाखवायास हा केवळ साधा वेश करी, व्यवस्थेने निर्वाह करी, आणि आपल्या छापखान्याकरितां जे कागद विकत घेई ते हात गाड्यांव

र घालून कोण्यासमयीं स्वतां लोटून आणतांना दृष्टीस पडे. मग लिहिण्याचे कागद वगैरे साहित्य हा विकूं लागला, आणि वरगणीने ऐवज घेऊन, वाचायास देण्याकरितां याने एक ग्रंथसंग्रह आरंभिला, आणि ज्यांत बहुत ज्ञानपर व विचारपर बोधाचा समावेश असा एक ग्रंथ हा प्रतिवर्षी छापूं लागला. त्याचें नांव गरीब रिचार्डाचें पंचांग.[याच्या काहीं भागाचा "आळशी आणि दिवाळखोर यांस उपदेश." या नावाने मराठींत तर्जुमा झाला आहे.] अशा यास अनेक काळज्या असतां त्यामध्यें हा आपले बुधीस सुधारणुकेच्या संस्कार करण्यांत बहुत वेळ घालवी. याचे तिसावे वर्षी गांवातील लोकांत यास इतकी प्रतिष्ठा मिळाली कीं त्या प्रांताची राजकारभाराची मंडळी होती. त्या मंडळीचे फडणीसीचे कामावर यास नेमिलें. व दुसऱ्या वर्षी हा डांकेघरचा दुयम अधिकारी झाला. असें झालें असतांही स्वजातीय प्राण्याचें हित आपल्यास प्राप्त झालेल्या बुधिवैभवाने करणें हें उचित हें तो विसरला नाहीं. शास्त्रें व विद्या यांस संस्कार व्हावा ह्मणोन त्याणें एक विद्वान् लोकांची मंडळी मांडली, व अल्पवयी मुलांच्या विद्याभ्यासाकरितां एक उत्तम विद्याशाला घातली, व अग्नीपासून जें नुकसान होई त्याचा विमा उतरण्याकरितां भागीदार जमा करण्यास आपण साधन झाला. फार काय सांगावें कीं त्या प्रांतांतील बहुधा अवघी लोकहिताचीं जीं कामें तीं सर्व याच्या थोड्या अथवा बहु आज्ञेने होऊं लागलीं.

नंतर हा शास्त्रीय शोधात गुंतला, व याने सन १७५२ नांत इलेक्ट्रिसिटी ह्मणून जें तेज तें पतंगाच्या योगाने मेघातून काढून खालीं आणिलें, तेणेंकरून वीज आणि इलेक्ट्रिसिटी हीं दोन्हीं मिळून एकच वस्तु

असें दाखवून दिलें. असें हें याने शोधून काढिलें तेणेंकरून फिलाडेलफिआच्या छापणाराच्या नावाची अवघ्या युरोपखंडांत कीर्ति झाली. हा भोदयपाचा झाला. त्यासमयीं अमेरिकाखंडांतील प्रांतींच्या लोकांची घते जेथून मूळचे आलेले त्यादेशींच्या लोकांची लढाई होउन अमेरिकाखंडांतील लोक स्वतंत्रपणें वागूं लागले. त्यांवादांत याणें अग्रेसरपणा धरिला. नंतर हा आपल्या जन्मदेशच्या लोकांकडून फ्रान्सदेशाच्या राजाच्या एथें कित्येकवर्षें वकिलातचें काम करीत होता. त्याकाळीं यास याचा बाप शास्त्रांतील एक वचन कोण्यासमयीं बोलेत्याचें स्मरण पडत असे; तें असें कीं जो मनुष्य आपल्या कामांत तत्पर तो राजांपुढें उभा राहील. याप्रकारें बेनजामिन फ्रान्कलिन्‌ प्रथमतर अगदीगरीब मुलग्यासारिखा प्रपंच करूं लागला होता, असें असतां बहुत्येक जनापेक्षां अतिविशेष संपत्ति व सन्मान यांत याने आपलें आयुष्य संपविलें.

या जगांत एक मनुष्याचें चांगलें झालें ह्मणजे तो कोणत्या उपायाने नांदला असेल तें जाणून घ्यायाची स्वाभाविक इच्छा इतरांचे ठायीं होती. ही पृच्छा फ्रांक्लिनाविषयीं केली असतां, त्यानेजो लेख आपल्या करितां ठेविला आहे त्यांत समाधानकारक उत्तरें सांपडतील, तीं असीं. "जर तुह्मी संपत्तीची इच्छा करितां तर बाजारचा जसा उघड मार्ग तसाच संपत्तीचा उघडमार्ग आहे. उद्योग आणि मितव्यय यादोन शब्दांच्या अधीन बहुधा संपत्ति असती, ह्मणजे काल आणि द्रव्य यांचा व्यर्थ व्यय करूं नका, तर यां दोहींचा जितका चांगल्या प्रकारें उपयोग करवेल तितका करून घ्या. उद्योग आणि मितव्यय यांवांचून कांहीं होणार नाहीं, आणि हीं जर असलीं तर सर्व कांहीं होईल. उद्योग आणि मितव्यय असून आपल्या अवघ्या व्यवहारां

न सचोरी, व नीति असावी, याहून अल्पयवी मनुष्यास प्रपंच्यांत वाढ ण्यांविषयीं विशेष सहाय दुसरें काहीं करीत नाहीं. मेहनत ही दैवाची माता होय. ईश्वर उद्योगास सर्व काहीं देतो जें करायाचें तें आजच कर, उद्या तूं किती अडसील हें तुला न कळे. जर तूं चाकर असलास आणि तूं आपल्या चांगल्या धन्यास आळस करितां अढळलास तर तुला लाज वाटणार नाहीं काय? आतां तुह्मीतूंच धनी आहेस, याकरितां तूं आळस करितांना आपणासच जरीं अढळलास तरी तुला लाज वाटावी."

## फ्रांक्लिनाचा गरीब रिचार्ड याचीं वाक्यें.

आपल्या काळांतून एक दशांश सरकाच्या चाकरींत लावावा असा कर सरकारानें जर लोकांवर बसविला तर तें कठीण सरकार असें त्यांस वाटूं लागेल, परंतु त्यापेक्षां आपल्यातून बहुत्येकांवर आळसाचा कर फार मोठा आहे. आळसापासून शरीरास विकृति होती, तेणेंकरून आयुष्य ऱ्हास घरतें. कष्टाच्या झिजविण्यापेक्षां आळसाचा जंग लवकर खाऊन टाकितो. जी किल्ली वापरत असती ती नेहमी स्वच्छ राहाती. तुला जर आयुष्य प्रिय आहे तर तूं आपला काळ व्यर्थ घालवूं नको. कांतर काळ म्हणून जी काहीं वस्तु तिचें आयुष्य केलें आहे. आवश्यक काळापेक्षां आपला किती अधिक काळ निजण्याखालीं जातो वरें, निद्रालू कोल्हा कोंबडी धरीत नाहीं, आणि शव गर्तेंत ह्मावी तितकी झोंप सापडेल याचें आपण स्मरण ठेवीत नाहीं.

जर सर्व वस्तूंपेक्षां काळ बहुमूल्य आहे, तर मग काळाच्या व्यर्थव्यय करणें हा अत्यंत उधळेपणा होय, कांतर जी वेळ गेली ती पुनः कदापि

मिळणार नाहीं .आपणम्हणतोंकीं काळ पुष्कळ आहे परंतु बहुधा असें घेडून येतें कीं तोफार अल्पकाल होतो. याकरितां उठून उद्योगास लागावें, आणिजो उद्योग करणें तो कार्योद्देशाने करावा, उद्योगशीलतेने काम अधिकहोतें आणि धांदल कमी होती. आळसास सर्वकाहीं कठिण आहे, पण उद्योगास सर्व सोपें आहे, आणि जो उशिराने उठतो त्यास अवघा दिवस कुदावें लागतें, रात्र पडलीअसतां ही त्याचेंतेंकाम आटपेल न आटपेल असें होतें; आळसाची चाल इतकी हळू असती कीं त्यास दरिद्र लौकर आटोपितें. तूं आपल्याकामास हांक, कामतुला हांकी असें करून घेऊंनको; जो लवकर निजतो आणि लवकर उठतो, तो निरोगी, संपत्तिमान्, व ज्ञानी होतो.

चांगले दिवसयेतील असी इच्छा व आशाधरून फळकाय? आपण धांवांधांच करूं लागलोंतर हेच आपले दिवस चांगले होतील. उद्योगास इच्छा करणें नलगे, जोकोणी आशेवर दिवसकाढूं लागेल, त्यास उपोषणासीं गांठ पडेल. त्यासीवांचून प्राप्ति नाहीं; तर हातांनी मदत द्या, कांतर माझ्याज वळ शेत नाहीं, अथवाजरअसलें तर त्यावर सर्कारचाकर जरब बसलाआहे. ज्यास व्यापार त्यास वतन आणि ज्यास धंदा आहे त्यास प्राप्तीचा आणि प्रतिष्ठेचा अधिकार आहे असें समजावें; परंतु त्या व्यापाराविषयीं उद्योग झाला पाहिजे आणि धंद्याचेपाठीस एकसारिखें असलें पाहिजे, असें जर न घडलें तर त्यावतनाने अथवा अधिकाराने आह्मास सर्कारचे कर देवणार नाहीं. जर आपण उद्योगी आहों तर आपण भुके मरणार नाहींत, कांतर उद्योगीमनुष्याच्या घराकडे क्षुधा डोकावून पाहती, परंतु आंत शिरावयास तिचा हिय्या होत नाहीं; कारण उद्योग कर्ज फेडून टाकितो, परंतु

निराशा तें कर्ज वारवितो. तुला द्रव्य मिळालें नसलें अथवा तुझ्या कोणीमा तबर सोयऱ्याने संपत्तीचा वांटाही काढून ठेवला नसला, तरकाय झालें, मेहनत नशीबाची माता आहे. उद्योगास सर्वकाहीं ईश्वर देतो. याकरितां आळसी निजलेअसतां तूं जमीन चांगली ओढ नांगर, म्हणजे तुला विकायास व बाळगायास पुरे इतकें धान्य मिळेल. जें करायाचें तें आजच कर, उद्यांतूं किती अडसील हें तुला नकळे. जें आज तुझ्याने व्हायासारिखें आहे तें उद्यांवर सोडूं नको. माजर हातमोजे घालून काहीं उंदीर धरीत नाहीं, हें स्मरून तूं आपल्या काम करायाचे हातेरांस हातमोज्यावांचून हात घाल, कामतर पुष्कळ आहे खरें, आणि तूं कदाचित् हाताचा अशक्त असशील; परंतु त्या कामाच्या पाठीस एकसारिखा लागून राहा, म्हणजे पाहा किती मोठीं कार्यें होतील; कांतर पाण्याचा थेंब नित्य पडल्याने दगड झिजून जातो. परिश्रम व धीर यांहीं करून उंदराने मोठा दोर खाऊन त्याचे दोन तुकडे केले. लहान लहान घायाने मोठे वृक्ष पडतात. तुह्मांतील कोणी ह्मणतां तें मी ऐकतों असें मला भासतें कीं, मनुष्याने आपल्यास काहीं फुरसत देऊं नये काय? तर बाबा गरीब रिचार्ड काय बोलतो तें मी तुह्मास सांगतों. फुरसत मिळावी असा तुमच्या मनांतला भाव आहे तर तुह्मी आपल्या काळाची चांगली योजना करा. तुह्मास एका क्षणाचा भरवंसा नाहीं, त्यापेक्षां एक घटका जाऊं देऊं नका.

## काहींतरी करण्याची आवश्यकता.

कोणी एक गृहस्थ बास्तील एथें गडगच्च कैदेंत सात वर्षें होता, तेव्हां तो थोडक्याशा लहान लहान टांचण्या घेऊन आपल्या खोलींत इकडेतिकडे टांकी, मग त्या पुनः गोळा करून त्याच्या एके मोठे खुरचीचे हातावर वेगळ्या ला

आकृती लावून ठेवी, असें आपलें मनोरंजन करीत असे. मागाहून तो आपल्या मित्रांस वारंवार असें सांगत असे कीं याप्रमाणें उद्योग करण्याची त्या युक्ति काढिली नसती तर मला खास वाटतें कीं मी वेडा होऊन गेलों असतों.

## मार्किस स्पिनोला.

हा नामांकित सेनापति सर होरेस वीयास एक दिवस ह्मणाला, अहो तुमचा बंधु कशाने मरण पावला? त्याने उत्तर दिलें त्यास कांहींएक उद्योग न व्हता ह्मणोन तो मेला. त्यावरून स्पिनोला बोलिला. हे महाराज! आपल्या अवघ्यांजणांतील कोणत्याही सेनापतीस मारून टाकायास तें पुरे.

जेजे निवडक पुरुष होऊन गेले त्यांचीं जन्मकर्में वाचिलीं असतां प्रायः सर्वदा असें आढळतें कीं त्यांस श्रम करण्याचें जें सामर्थ्य होतें त्यापेंकरून त्यांची आख्या झाली. डिमोस्थिनीस्, ज्यूलियस् सीजर, हेन्री चौथा फ्रान्स् देशीचा, लार्ड बेकन्, सर ऐसाक न्युटन्, फ्रांकलिन्, वाशिंगटन, नपोलिअन्, बोनापार्ट, यांच्या मनाचे व बुधीचे धर्म भिन्नभिन्न असतांही ते मोठे फष्टाळू असी त्यां अवघ्यांची कीर्ति राहिली आहे. मजलेचे श्रम ते किती दिवस काढीत, ते किती पाहांटेस उठत, ते किती रात्रपर्यंत जागत, समरंगणांत, मसलतीचे कचेरींत, व दरबारांत ते किती किती तास घालवीत, त्यानी किती चिटणीस कामांत ठेविले असत; सारांश ते किती सक्त काम करीत असत हें वाचून समजतें – हा नूपेल ग्रंथांतील सारांश.

---

## स्वसेवा आणि स्वतंत्रता

आपल्या निर्वाहास्तव व संसारांत आपली चढतीकळा कराया–

स्तव प्रत्येक मनुष्याने आपल्या स्वाधीन जे उपाय त्यांस बहुतकरून अवलंबून असावें असा निर्माणकर्त्ता व पालनकर्त्ता जो ईश्वर त्याचा हेतु दिसतो. अन्न, वस्त्र, अथवा ज्यांची आपल्यास इच्छा आहे असे काहीं दुसरे पदार्थ यांविषयीं आपण परस्परांचें अवलंबन करून असावें या हेतूने आपल्यास केलें नाहीं: हे पदार्थ आपल्यासाठीं मिळवावे याकरितां आपल्याला श्रम करायास सांगितलें आहे. याप्रकारें प्रत्येक मनुष्याचा सांभाळ व आराम हीं जरी निश्चयेंकरून होतात तरी दुसऱ्या कोणत्याही बेताने झालीं नसती.

याकरितां आपल्यास जें पाहिजे त्याजविषयीं इतरांचा भरवसा जितका कमी करवेल तितका कमी करायाची सवय मुलांनी बाळपणापासून लावून घ्यावी ही एक मोठी गोष्ट आहे. त्यांनी आपलीं वस्त्रें आपल्या आंगांत घालायास, आपलें तोंड धुवायास, आपल्या हातीं जेवायास शिकावें, आणि आपली आई अथवा चाकर नेहमीही कामें करून देतील अशी वाट पाहात बसूं नये. लवकरच प्रपंचांत पडून त्यांस आपलें पोट भरितां यावें याजकरितां त्यांनी वाचायास लिहायास व हिशोब करायास शिकावें, आणि आपलें अंतःकरण ज्ञानाने पूरित करावें. आवश्यक असल्यास, आपल्या अवशिष्ट आयुष्याचा जेणेंकरून निर्वाह करायाचा असें काहीं कसब, व्यापार, अथवा वृत्ति योग्यकाळीं शिकायाचा आरंभ करायास त्यांनी सिद्ध असावें. त्यांस जसें जसें आपलें काम आपल्या अंगें करितां येईल आणि जसें जसें आपल्या उद्योगाने आपलें उपजीवन करितां येईल तसे तसे ते इतरांस अधिक आवडतील व अधिक मान्य होतील. ज्या कोणास उद्योग करायास हात, व विचार करायास मन असून इतर काम करीत असतां आपण आळस करून उगाच राहातो व आ

पण अल्पउद्योग करून जें आपल्यास मिळायासारिखें तें न मिळवितां श्रम करून स्वस्थ भोगणारे जे त्यांच्या तोंडाकडे पाहतो त्याचें तें असें करणें लज्जेस कारण होय, असें जें मानिलें आहे तें नीट आहे.

आपण स्वतां केल्याने जसें काम चांगलें होतें तसें तें दुसऱ्यावर विश्वासलें असतां विरळा होतें, तें अगदी होत नाहीं असेंही वारंवार घडतें. याकरितां जें कार्य आपल्याहातून घडायासारिखें असेल तें आपण दुसऱ्यावर कधीं सोंपूं नये.

---

## हरक्युलीस् आणि गाडेकरी. कल्पितगोष्ट.

एक गांवढळगडी ओंडचिखलट गहृीतून गाडा हांकून नेत होता, तो चाकें चिखलांत रुतून अडकला, असाकीं बाहेर काढायास घोड्यांचा उपाय चालेना. तेव्हां तो हेलकाढून रडत बसला, आणि पूर्वींच्या ग्रीकलोकांत हरक्युलीस्‌म्हणून एक शक्ति देणारा देव असे, त्याचा त्याने धांवा केला कीं आपण येऊन मला सहाय व्हावें. त्या देवाने अभ्रांतून खालीं पाहून त्यास सांगितलें कीं आळशी सोध्यासारिखा पडून राहिला आहेस तसा राहूं नको, उठून घोड्यांस बळकट फटके मार, चाकांस आपल्या खांद्याचा नेट लावा दे, आणखी तो असें ह्मणाला कीं माझें साह्य प्राप्तीचा उपाय काय तो हाच.

## लावी पक्षिण आणि धान्याचें शेत. कल्पित गोष्ट.

एक्या पिकलेल्या धान्याच्या शेतांत लावी पक्षिणीने पिलीं घातलीं होतीं, त्याकरितां चारा आणायास बाहेर जाते समयीं तिने त्यांस ताकीद केली कीं माझ्यापाठिमागें जें काहीं होईल तें पाहून ठेवा. ती घरीं आल्या

वर त्यानी तीस सांगितलें कीं शेतकऱ्याने एथें येऊन आपल्या शेजाऱ्यांस आपलें शेत कापायास बोलाविलें आहे. तें ऐकून त्याची पक्षिण बोलती, "बरें तर मग अजून कांहीं भय नाहीं." दुसरे दिवसीं तीं पिलीं तिजपासीं बोलूं लागलीं कीं पुनः त्या शेतकऱ्याने येऊन आपल्या मित्रांस पूर्ववत् विनंती केली आहे. त्याजवरून ती उत्तर करती, बरें बरें त्याचेंही कांहीं भय नाहीं. मग ती पूर्ववत् चारा मिळवायास गेली. तिने पुनः तिसऱ्या दिवसीं असें ऐकिलें कीं उद्यां प्रातःकाळीं शेतकरी आणि त्याचा लेंक असे दोघेजण येऊन स्वतां कापणीचें काम करणार. तेव्हां ती ह्मणती असें आहे तर मग आपल्यास सावध झालें पाहिजे. मला त्या शेजाऱ्यांचें, व मित्रांचें भय वाटलें नाहीं; पण मला त्या शेतकऱ्याचें भय वाटतें कांतर तो धनी त्यापेक्षां तो आपलें स्वतांचें काम बोलिल्यासारिखें खचीत करील.

## ओर्टेनचा सररावर्ट इन्नूस.

सन सत्तराशें बाविसांत असें झालें कीं स्काटूलांड देशीं उत्तरेकडेस ओर्टेन ह्मणून एक शहर आहे तेथील सररावर्ट इन्नूसास दुर्दैवेंकरून एकुणिसावे वर्षी उंचपदमात्र प्राप्त झालें, त्याचा सांभाळ करायास द्रव्य कांहीं मिळालें नाहीं. त्याप्रमाणें अवस्था प्राप्त झाली असती तर बहुत्येकजणाचें आपल्या मित्रांस अथवा सरकारास ओझें पडलें असतें; परंतु असें न होऊं देतां त्याने आपल्या स्वतंत्रतेचें रक्षण करण्याविषयीं निर्धार केला. तो कांहींएक उद्योग शिकला नव्हता, ह्मणून त्यास असें वाटलें कीं आपल्यास ग्रहण करायास सर्वोत्कृष्ट उपजीवनाची वृत्ति तर शिपाईगिरी आहे. मग त्याने घोडेस्वारांचे पलटणांत शिपायादाखल आपलें नांव पटावर लिहविलें.

एका दिवसीं हा एका छावणींत पाहऱ्यावर असतां असें घडलें कीं कोणी एक गृहस्थ कांहीं कामाकरितां येऊन कार्नेल कोठें आहे ह्मणून पुसूं लागला; व कार्नेल कोणा दुसऱ्या बराबर गुंतला होता ह्मणून तो गृहस्थ या पाहरेकऱ्यासीं गोष्टी बोलूं लागला. याला त्या गृहस्थानें पूर्वीं पाहिलें होतें, परंतु यानें क्रम धरिला होता तो त्यास ठाऊक नव्हता. शेवटीं हा पाहरेकरी तर सररावर्टइन्‌स असी त्याची खातरी झाली. नंतर त्या गृहस्थास कार्नेलाजवळ बोलाविलें, तेव्हां त्यानें त्यास सांगितलें कीं बहुत्येक मुकुट धाऱ्यांपेक्षां आपणास अधिक मान आहे, कारण नैटबरोनेट पदाचा मानकरी आपल्याकडेस पहारा करीत आहे. हें वर्तमान ऐकून त्या कार्नेल धिनरामास मोठा चमत्कार वाटला. मग त्यानें तत्क्षणीच दुसरे पाहरेकऱ्यास त्या पाहऱ्यावर पाठवून या पहिले पाहरेकऱ्यास आपल्या कडेस हजीर व्हावें ह्मणून हुकूम केला. नंतर हा पहारेकरी कार्नेलाजवळ आला. तेव्हां त्यानें यास पुसलें कीं तुह्मी काय सररावर्टइन्‌स आणि तेच जर तुह्मी तर साधारण शिपायादाखल तुह्मी आपलें नाव पटावर कोणत्या हेतूनें लिहिवावयास प्रवृत्त झालां. त्याजवरून हा पाहरेकरी आपलें पद विनयेंकरून कबूल झाला आणि ह्मणाला कीं जवळ पैसा राहिला नाहीं याकरितां आपलें पद विसरावें आणि भलेपणाच्या धंदा करून आपला सांभाळ करून घ्यावा हेंच चांगलें. आपलें साध्य करायास जे समर्थ अथवा उत्सुक नाहींत, अस्या मित्राच्या तंत्रानें राहवें हें नीट नाहीं. असा म्या विचार केला.

मग कार्नेलास जसा किंचित्‌ पूर्वीं चमत्कार वाटला होता तसाच त्यास आनंद झाला. त्याणें असा विचार केला कीं असें वागण्याची ज्यामध्यें शक्ति त्या पुरुषाची योग्यता साधारण नसावी. नंतर त्यानें त्या दिवसाच्या

पाहून्यावरून यास तत्क्षणींच सोडून आपल्या बरोबर जेवायास बलाविलें, व आपल्या पोशाक खान्यांतला व्हावा तो पोशाक तुम्ही घ्यावा असें सांगितलें. परंतु सरराबर्टनें सांगितलें कीं मला अस्या सोईची गरज नाहीं. मी माझ्या घरस्थितींत जीं वापरीत असें त्यांतलीं काहीं वस्त्रें असून माझ्या जवळ आहेत. नंतर काहीं दिवस या अल्प वयस्क मानकन्या बरोबर सहवास होतांच तो उदार मनाचा कार्नेल विशेष संतुष्ट होऊन यास कारनेटच्या अधिकार मिळवायाकरितां त्यानें जो उद्योग केला तो लवकरच सफळ झाला. नंतर आपली कन्या ज्या शाळेंत विद्याभ्यास परिपूर्ण करायास्तव होती तेथें तिला भेटायास कार्नेल जाऊं लागला तेव्हां त्यानें यास समागमें नेलें. मग तीं परस्परांस आवडूं लागलीं असा त्यांचा तरुण जोडा पाहून त्यांस लग्न करायास त्यानें झडदिशीं सांगितलें आणि असें मनांत आणिलें कीं या कन्येकडली संपत्ति इच्या प्रियाच्या उंचपदास चांगली शोभा देईल व ती संपत्ति याच्या वेतनानें दोघांचा प्रतिष्ठितपणें निर्वाह होण्याविषयीं पुरी पडेल. नंतर त्यांचा जोडा जमून तीं मोठीं स्फरवी झालीं. त्या योग्य मानकन्यांचे एके कन्येनें लार्ड फार्बसाशीं लग्न केलें, तिला कित्येक मुलें झालीं. तींही कितिएक मोठ्या उंचपदाचीं वारिसदार झालीं आणि कितिएकास तें प्राप्त झालें.

## जा आणि येयाचें अंतर.

इंग्लंड देशीं सरीभांनांत एका गृहस्थाकडे सजमीन होती. तिचें दरसाल उत्पन्न दोन हजार रुपये होत असे, त्या जमीनीची लागवड तो स्वतांच करी. असें असतां त्यास कर्ज झालें, तें फेडायाकरितां त्यास आपली अर्धी मिळकत विकणें प्राप्त झालें. मग अर्धी जी राहिली ती एकवीस वर्षांच्या मुदती

ने कोणेएका मक्तेदाराकडेस लावून दिली. ती मुदत सरली नाहीं त्याच्या पूर्वींच एका दिवसीं तो मक्तेदार मक्त्याचा ऐवज आणून त्या जमीनदारास पुसूं लागला कीं आपण आपली जमीन विकतां काय ? जमीनदार बोलिला "तूं ती विकत घेतोस काय". मक्तेकरी उत्तर देतो "होय आपले मर्जीस येईल तर" तो गृहस्थ मोठ्याने बोलतो "अरे असें कसें झालें मला मक्त्याचा ऐवज भरायास लागत नव्हता असें असतां त्यादुप्पट जमिनीवर माझ्याने आपला निर्वाह करवला नाहीं, तूं तर थोडक्यास्याजमिनीवर निर्वाह करितोस, तस्यांत तुला सारा द्यावा लागतो, असें असतां ती जमीन विकत घ्यायापुरता ऐवज कसा मिळविलास." तो मक्तेदार किंचित् हांसून ह्मणतो "महाराज दोन शब्दानी इतकें अंतर पडलें; जा असें आपण ह्मणत असां, ये असें म्यां ह्मटलें." तें ऐकून तो गृहस्थ पुसतो, "याचा अर्थ काय" मक्तेदार सांगतो "आपण बिछान्यांत निजले राहून अथवा ख्याली खुशाली करून आपल्या कामावर दुसऱ्यांस पाठवीत असां: मी तसें न करितां पाहटेस उठून स्वतां जाऊन आपल्या कामाची देखरेख करीत गेलों."

---

## धारिष्ट.

आपण ह्मणून अरिष्ट शोधूं नये, कारण असें करणें हा मूर्खपणा होय; परंतु जर अरिष्ट प्राप्त झालें तर धैर्य धरावें, आणि स्थिर व शांत होऊन त्या सन्मुख व्हावें. आपण किती सावध असलों, तथापि या संसारांत आपल्यास काहींतरी कोण्यासमयीं अरिष्ट प्राप्त झाल्यावाचून आपली गति लागेल ही अपेक्षा धरून उपयोग नाहीं. कदाचित् आपलें वस्त्र अथवा

ज्यांत आपण राहतों तें घर पेटेल; आपण पाण्यांत पडूं किंवा गाडींत बसून जात असतां घोडा बुजून आपल्यास घेऊन पळून जाईल. अस्या प्रसंगीं आपल्या शरीरास मोठी दुखापत होईल, किंवा आपण ठार होऊं, परंतु आपण आपलें रक्षण करायास विचाराने व शांतपणें प्रयत्न केला असतां आपल्यास अपाय प्राप्त होण्याची संभावना कमी होईल.

अरिष्टाच्यावेळीं कित्येकजणांची भयाने इतकी धांदल होऊन जाती कीं यांच्याने आपल्या रक्षणास अथवा दुःख कमी करायास कांहींएक होत नाहीं. याप्रमाणें तें अरिष्ट फार वृद्धिंगत होतें आणि इतरांस निघून जावयासारिखें असतां यांस दुखापत होती किंवा हे ठार होतात. कसेंही अरिष्ट प्राप्त झालें असतां आपण घाबरूं नये हीच कायती अत्यंत मोठी गोष्ट. निश्चळपणें व हुशारीने आपली वृत्ति राही असें करावें ह्मणजे डोईवर टेंकलेल्या विप्रातून सुटून जायास आपल्या हातून जितकें होईल तितकें आपल्यास करितां यावें. यास धारिष्ट धरणें असें ह्मणतात. या गुणाचें सर्वदा आश्चर्य मानिलें आहे.

कोण्या एकाच्या अंगावरील वस्त्र पेटलें असतां त्याने साहाय्यार्थ धावूं नये. उभें राहिलें अथवा धांवलें असतां वस्त्र अधिक लवकर पेटतें आणि शरिरास त्वरित भाजतें. याकरितां सर्वोत्कृष्ट चांगलें कायतें हेंच कीं आपण भूमीवर पडून लोळूं लागावें; तसें केलें असतां तें वस्त्र लवकर जळत नाहीं. जर सत्रंजी किंवा मोठें जाडें बुर्णूस आपण आपलें आंगाभोंवतें घट्ट गुंडाळलें तर त्याज्वाळा तत्क्षणींच विझतील.

घर अग्नि लागून धुराने भरून गेलें असलें तर त्यांतून आपण

उभ्याने चालून जाऊं नये. तसें केलें असतां आपल्यास धुर गुदमरून टाकील. सर्वोत्कृष्ट हेंच कीं ओणवें होऊन रांगत रांगत जावें, कां तर भूमीजवळ वायु फार मोकळा असतो.

जर आपण पाण्यांत पडलों आणि आपल्यास पोंहतां येत नसलें, तर आपण चळवळ करूं नये अथवा पाण्यावर हात मारूं नये, तसें केल्याने आपण लवकर बुडूं. म्हणून अगदी निश्चळ राहवें आणि फुफ्फुस वायूनें भरलें ठेवावें. शरीर पाहिलें असतां पाण्यापेक्षां हलकें आहे, याकरितां जर आपण फार जोरानें हात पाय न हालविले तर तें पाण्याचे वरल्या अंगीं येऊन तरतें राहिल्यावांचून राहणार नाहीं.

घोडा बुजून हलके गाडीसुद्धां पळत सुटला तर आपण तत्क्षणींच गाडींतून उडी टाकूं नये, तर आपल्यास सर्वोत्कृष्ट चांगला उपाय सुचे तोंपर्यंत, साधल्यास त्या गाडींत उगीच बसून राहवें. कदाचित् असेंही घडूं शकेल कीं तो घोडा आपेआप उभा राहील आणि तसा जर उभा राहिला तर काहींएक अपाय घडणार नाहीं. जर गाडी सोडून देणें हेंच कायतें शाहाणपण असें आपल्यास वाटलें तर आपण हळूच युक्तीने गाडीचे माग त्या आंगाने उतरावें. कां तर गाडींत बसून जात असतां त्या गाडीसारिखा आपल्याही अंगी पुढें जाण्याचा झोंक असतो, तो आपल्या इच्छेल्यानें बंद होत नाहीं कळलें. याकरितां गाडी सोडतांना असें करावें कीं गाडीच्या जिकडेस जाण्याचा झोंक असेल तिकडेस तो आपल्यास भूमीवर बळानें न आपटी असी त्याचे उलटे कडेने आपण उडी टाकावी.

---

## घरास अग्नि लागला असतां दोघी स्त्रियांनी परस्पर विरुद्ध असी वर्तणूक केली.

कोणीएक घरधनीण रात्रीस फडताळातून धडक्याने ज्वाळा तिच्या खोलींत आल्यावरून जागी झाली, तेव्हां ती जिन्याच्याकडेस पळत गेली, आणि तिची धांदल होऊन दुसऱ्या मजल्यावर मुलांची निजायाची खोली होती तेथें तिचीं मुलें एकाजवळएक निजलीं होतीं, तीं कदाचित् अवघीं घराच्या छापऱ्यांतून निभावलीं असतीं, परंतु तिने त्यां मुलांस बोलावून आणायाकरितां जिन्यावरून वरजावें तर तसें न करितां ती खाली धांवत उतरली, आणि मोठ्या संकटाने त्या अग्नीतून पार पडून रस्त्यांत आली. तेथवर आल्यानंतर तिला त्यां बापुड्यां मुलांचें स्मरण झालें. पण वेळ निघून गेला, त्या जिन्याने पेट घेतला, त्यांमुळें त्यांच्याजवळ कोणाच्याने जावेनासें झालें, मग तीं आपल्या बिछान्यांतच जळून गेलीं.

दुसरी एक स्त्री रात्रीस अग्नीच्या धडाक्याने जागी होऊन पाहती तों खोलीच्या खालीं अग्नीचा उजेड पडला आहे. तेव्हां तिने आपल्या नवऱ्यास मना केलें, नाहींतर त्याने झडदिशीं दार उघडलें असतें, आणि धूर व ज्वाळा आंत धडकून आल्या असत्या. त्याच खोलीचे आंत यावयास जीचें दार असी एक दुसरी खोली होती, तेथें दाईजवळ मुलें निजलीं होतीं. तेथें त्या स्त्रीने जाऊन त्यांस जागें करून, बिछान्यावरील पलंगपोस व ऊर्णावस्त्रें एकासएक बांधून खिडकीच्या वाटेने पहिल्याने त्या दाईस खालीं उतरविलें. मग त्यां मुलांस एकामागेंएक असें उतर

वून तिच्याहातीं तीं दिलीं. शेवटीं ती खचतां उतरली. मग त्या खोलीची तक्तपोशी लोकरच जळून खालीं पडली, आणि अवघ्या घराने पेट घेतला.

## जखम झालेला लाणी करणारा

एक मनुष्य शेतांत लाणी करीतअसतां त्याच्या बाहूस विळ्याने मोठी जखम पडून धमनीचे दोन विभाग झाले (जलाशयांतलें पाणी जसें नळीच्याद्वारा वाहून येतें, तसें काळिजांतलें रक्त ज्याच्या द्वारें वहात असतें असेजे मार्ग अथवा नळ्या, त्या धमनी होत. यांतून एकादी धमनी कापली तर रक्त फार वाहतें. त्यासमयीं त्याजखमेचे व काळिजाचे मधलें अंग दाबून धरिलें तर त्या जखमेकडेस वाहणाऱ्या रक्तास अवरोध होतो हाच काय तो तें रक्त बंद करण्याचा उपाय) त्या गरीबाचे शरीरांतून रक्त फार वाहूं लागलें, तेव्हां जवळ बायका व पुरुष असेजे लोक होते ते घाबरून त्यांस कांहीं सुचेनासें झालें. कोणी इकडे धावूं लागलीं, कोणी तिकडे धावूं लागलीं, कोणी खुंटासारिखीं उगीच उभीं राहिलीं. इतक्यांत एक चांगली धट्ट चपळ मुलगी तेथें येऊन तिने आपला मोजेबंद काढून झडकन एक पट्टी काढिली, ती जखमेच्या वरत्या आंगास गच्च बांधिली, तेव्हां दुसरा चांगला उपाय होईतोंपर्यंत पट्टी बांधण्याने त्याचें रक्त वाहणें बंद झालें. असेंजर तिने केलें नसतें तर रक्त वाहून तो मरून गेला असता.

## किराण्याचा व्यापारी आणी काळ्या बियांचा थैला.

सुमारें शंभर वर्षांवर इडिन्बर्ग एथें जार्ज डीवर म्हणून एक किराण्याचा व्यापारी होता. तो च्याहा, साकर व किराणे व्यापारीजे जिनस बहुधा विकितात ते विकी. त्याजकडेस बागाईत बियांची ही मोठी विक्री

चालली होती. त्याच्या दुकानास तळघर असे, त्यांत त्याचे मालाचें बहुत्येक
सांठवण केलें असे. एका दिवसीं त्याने आपले मोलकरिणीस सांगितलें कीं तूं खा
लीं तळघरांत मेणबत्ती घेऊन जा आणि तेथें एकेजातीच्या साबू ठेविला आहे, त्यां
तून काहीं घेऊन ये. मग आपल्या धन्याने सांगितलेलें काम करायास ती गेली,
परंतु अज्ञानामुळें तिने मेणबत्ती दान बरोबर घेतलें नव्हतें, ह्मणून साबूचे तु
कडे टोपलींत भरतेवेळीं बाजूस एक थैला उघडा होता तो काळ्या बियाने भ
रला आहे असें समजून तिला त्या थैल्यांत ती मेणबत्ती रोवून ठेवणें अगत्यज्ञा
लें परत जातांना तिचे दोन्ही हात टोपली उचलून नेण्यांत गुंतले, ह्मणून मे
णबत्ती जेथें ठेविली होती तेथेंच राहिली. त्यादासीस मेणबत्ती वाचून आडजि-
न्याहून वर येतांना पाहतांच त्या सावकाराने पूसलें, मेणबत्ती कोठे ठेविलीस.
तिने दुर्लक्ष्याने ह्मटलें तो साबू जथें होता, त्याच्या जवळ काहीं काळें बीं आहे
त्यांत रोवून ठेविली आहे. त्याजवरून त्यास तत्क्षणींच स्मरण झालें कीं हीजें
काळें बीं सांगती तीतर बंदुकीची दारू आणि असें वाटलें कीं मेणबत्तीची एक
थिंगळी त्या दारूंत पडली असतां धडका होऊन हें घर उडून जाईल, तेणेंकरू
न जो नाश होईल त्यांत मी आणि दुसरे बहुतजण गडद होतील. जर मेणबत्ती
आहे तेथेंच राहूं दिली तरती थोडक्यांतच जळतजळत त्या दारूसीं जाईल
तेणेंकरूनही तोतसा संहार होईल. बरें जर पळूनजावें तर घराचा व माला
चा नाश खचीत करावा असें होतें, जर खालीं जाऊन ती मेणबत्ती तेथून का
ढण्याचा उद्योग करावा. तर आपला नाश करून घेण्याचें संकट ओढवावेंअ
सें दिसतें, कांतर नजाणों तेथेंजातांच त्याक्षणीं त्या दारूंत मेणबत्तीची
थिंगळी उडेल असें असतांही तत्क्षणींच मनाचा निश्चय करून त्यातळघ

रात तो उतरला. आणि त्या दारूच्या थैल्याच्या मधोमधली मेणबत्ती भडकून जळत आहे, असें पाहून वायुचलित झाला असतां मेणबत्तीची थिंगळी उडेल ह्मणून तो हळूच त्या मेणबत्तीजवळ गेला, आणि त्या दारूचे थैल्याजवळ मोठ्या विचाराने ओणवा होऊन निजायाचे खोलींतील मेणबत्तीचे बैठकीसारिखी आपल्या हाताची अंजलि करून त्या अंजलींत ती मेणबत्ती त्याने कवटाळली. असें केल्याने जर एखादी थिंगळी पडली असती तरती त्यास अंजलिपुटांत धरितां येती. पण एकही थिंगळी पडली नाहीं, आणि मेणबत्ती निर्विघ्नपणें त्याने काढून घेतली.

अस्या या व्यापाऱ्याने आपल्या व्यापारें करून बहुत द्रव्य मेळविलें आणि त्या शहरच्याजवळ स्थावर मिळकत करून ठेविली यांत आश्चर्य नाहीं. ती मिळकत अजून त्याचे वंशाकडेस आहे.

---

## लक्षपूर्वक अवलोकन आणि समयसूचकता.

जेंजें आपल्या आसपास होत जाईल तेंतें नित्य लक्ष लावून पाहत असावें, हा एक मनुष्यांस आपली स्थिति सुधारून घेण्याचा उपाय होय. मनुष्यास जें काहीं जाणून घेणें आवश्यक आहे तें अवघें तो शाळेंत अथवा ग्रंथ वाचून कोठवर शिकेल. आपले शेजाऱ्यांचीं गुण लक्षणें कसीं, जगाचे साधारण व्यवहारमार्ग कसे, आणि प्रत्येक स्थानीं विशेषें करून असायाचे जे अनेक अनेक प्रकार, ते कोणकोणते हे सर्व ज्ञानाचे प्रकार आपल्यास आवश्यक आहेत. हें सर्व ज्ञान आपल्यास प्राप्त व्हावें याजकरितां हे सर्व प्रकार जसेजसे आपल्यास प्रति दिवसीं आढळतील तसतसे आपण ते लक्ष लावून पहावे, आणि त्यांजविषयीं विचार करावा.

मनुष्यांस जेजे अनेक प्रसंग प्राप्त होतात त्यात्यासमयीं त्यांस कसकसें वाटतें व ते कायकाय करितात, तें सर्व कित्येकजण लक्ष लावून पाहून घेतात, तेणेंकरून त्यांचे अंगीं असी शक्ति येती कीं आह्मी अमुक ह्मटलेंअसतां अथवा अमुक केलेंअसतां आमच्या आसपासच्या लोकांच्या अथवाज्याशीं आमचा कोणेएकाप्रकारें समागम होत असतो त्याच्या मनांत अमुकअमुक येईल, असा त्यांस पूर्वींच अजमास करितां येतो. अमुकास अमुक प्रसंगीं अमुक प्रकारचें वाटूंलागेल असेंजें समजणें याला बहुधा लोकांचें धोरण राखणें असें ह्मणतात. मनुष्यांबरोबर अत्यंत साधाही व्यवहार करणेंझालें तथापिहा गुण आवश्यक आहेः यावांचून आपल्याअंगीं यथायुक्त सभ्यता येत नाहीं. हा गुण अत्यंतजीं मोठीं कामें त्यांतही उपयोगी पडतो.

आपल्यास अडचणीचा किंवा अरिष्टाचा प्रसंग प्राप्त झालाअसतां, आपल्यास जी लक्षपूर्वक अवलोकन करण्याची सवई लागली असेल, ती बहुधा मोठी उपयोगी पडती. उदाहरणार्थ आपण असें मनांत आणावेंकीं, ओर्कूनी ह्मणूनजीं बेटें आहेत, तेथील कोळी व नावाडे, यांतून ज्याने त्यासमुद्रांतील नानातऱ्हेचे खडक व आकार वेगळाल्याप्रसंगीं दृष्टीस पडतात, तेसे ज्या सावधगिरीने पाहून लक्ष्यांत ठेविलेअसतील, तो तुफानाचे वेळीं अरिष्टांतून बहुतकरून पार पडेल. याचप्रमाणें आपल्यास या संसारांत काहीं एके अडचणीच्या प्रसंगासीं गांठ पडलीअसतां, त्याप्रसंगीं लागू पडणाऱ्या अश्या अनेक लहानलहान गोष्टी आपण लक्ष लावून समजून घेतल्या असतील तर आपणास बहुधा काहीं अपाय न होतां आपण पार पडूं, परंतु त्याप्रकरणीं आपण कधीं चित्तच दिलें नसेल तर तसें कोठून घडेल. कि

त्येकजणाच्याठायीं आणि वाणीच्याप्रसंगीं इतरापेक्षां विशेष शांति व धारिष्ट दिसतें इतकेंच नव्हेतर जोउपाय योजावयांस योग्य तो ते लोकर धुंडून कादितात. ते झडकण विचारकरून त्याप्रसंगीं जें सर्वोत्कृष्ट उचित तें करितात. एक पार पडण्याची अथवा उपराळ्याची युक्ति सिधीस नगेली तर दुसरी एक तिच्या खालोखाल चांगली युक्ति तत्क्षणीच योजून कादितात. सारांश त्याचाठायीं समय सूचकता असती. हागुण कोणास स्वभावतः अधिक असेल, कोणास कमी असेल, परंतु सर्वांच्याठायीं त्या गुणास योग्य उपायेंकरून संस्कार करितां येईल.

---

## गासेन्डी ह्मणून एक लहानगाज्योतिषी.

फ्रान्सदेशीं पीटर गासेन्डी ह्मणून एक महाज्ञानी विद्वान् पुरुष होऊन गेला. तो लहान मुल स्कमारें च्यार वर्षांच्या वयांत असतां खुरशीवर उभा राहून आपल्या भाचांस व हिणीस धर्मोपदेशाविषयीं उपपादन करी. तो जसाजसा वाढूं लागला तसेंतसें पर्वत, शेतें, चंद्र, सूर्य, तारा यांजकडे पहाण्याचें त्यास फार आवडूं लागलें. तो केवळ सात वर्षांच्या वयांत असत्तां त्यास रात्रीस आकाशाकडेस पहावयाची असी आवड असेकीं त्याने वारंवार आपल्या अंथरूणांतून उठून आकाशांत चंद्र आणि ताराहीं कसीं गमन करीत आहेत तें पाहूं लागावें. एकादिवसीं संध्याकाळीं आपल्याच वयाचे दोयेतिघे मुलगे व मुली यां बरोबर तो फिरत होता. तेवेळीं आकाशांत पूर्णचंद्र प्रकाशला होता व वहुत पातळ पातळ ढगें वायूने इकडेतिकडे धांवत

होती. इतक्यांत चंद्र चालतो किंवा ढगें चालतात असीं दिसतात याविषयीं त्या मुलांत परस्परांमध्यें वादाचा आरंभ झाला. आमच्या तर असा निश्चय आहे कीं ढगें स्थिर आहेत. चंद्रच काय तो चालत आहे असें बाकीच्या मुलां मुलींचें बोलणें पडलें. तेव्हां तो पीटर आग्रहानें सांगूं लगला कीं तुह्मास वाटत आहे त्याप्रमाणें आपल्या प्रत्ययास यावयासारिखी गति चंद्राचे ठायीं नाहीं, त्वरेनें चालतीं आहेत तीं ढगें आहेत. पण त्याच्या युक्तीपासून त्याच्या त्या सोबत्यांच्या मनावर काहीं कार्य उत्पन्न झालें नाहीं, मग त्यानें एक युक्ति योजिली ती असी. त्यानें त्यांस एका मोठ्या झाडाखालीं नेऊन सांगितलें कीं तुह्मी या डाहाळ्यांतून चंद्राकडेस पहा. त्याप्रमाणे पाहतांच त्या झाडाचे पानांत व डाहळ्यांत चंद्र स्थिर राहिल्या सारिखा दिसला, परंतु तीं ढगें फार दूर जाऊन दिसतनासीं झालीं. तेसमयीं पीटरानें सांगितलें तें खरें व आह्मी बोलत होतों तें खोटें असें कबूल करणें त्यांस प्राप्त झालें.

## इंडियानच्या चोरून नेलेलें हरणाचें मांस.

उत्तर अमेरिकेंतील एक इंडियान् ह्मणजे तेथें राहणारा एक मनुष्य बाहेरून आपल्या झोंपडींत आला आणि पाहतो तों हरणाचें मांस वाळायाकरितां टांगून ठेविलें होतें तें चोरीस गेलें. मग त्या ठिकाणी लक्षपूर्वक अवलोकन करून तो त्या चोराच्या रानांतून माग काढीत त्याचा पाठलाग करीत गेला. तेव्हां मार्गांत कोणी भेटले त्यांस तो पुसूं लागला अहो एक ठेंगणा, झातारा, गोरा, मनुष्य, बरोबर लहान बंदूक व लांडा लहानसा कुत्रा घेऊन जातां तुह्मी पाहिला काय? त्यांनी उत्तर दिलें

होय पाहिला; त्याजवरून तो इंडियान् त्यांस सांगूं लागला, अहो ज्या ज्याचें असें वर्णन केलें त्यानें माझें हरणाचें मांस चोरून नेलें. तेव्हां ते ह्मणाले कीं तुह्मीं त्यास कधीं पाहिलें नाहीं असें दिसतें असें असतां त्याचें वर्णन तुह्मास इतकें बारकाईनें कसें करितां आलें हें आह्मास सांगावें. त्या इंडियानानें प्रत्युत्तर दिलें कीं ज्या भूमीवर उभें राहून तें हरण जितकें उंचीवर टांगिलें होतें, त्याजागीं आपला हात पोंहचून तें काढा यासाठीं उभें राहण्यास त्या चोरानें दगडाची रास केली, त्यावरून मी जाणतों कीं तो ठेंगणा आहे. रानांतील सुकलेल्या पानांवर त्याचीं पाउलें लागलीं आहेत तीं पाहतां जवळजवळ पडलीं आहेत, त्याजवरून मला वाटतें कीं तो ह्मातारा आहे. तो चालताना दोन्हीं पायांचे आंगठे बाहेर काढितो, त्याप्रमाणें इंडियान् कधीं चालत नाहींत याजवरून मी समजतों तो गोरा मनुष्य आहे. त्याची बंदूक झाडासीं टेंकून उभी केली होती, त्या बंदुकीचें तोंड लागून त्या झाडाची साल घांसली त्या खुणेवरून वाटतें कीं त्याची बंदूक आखूड आहे. त्याच्या कुत्र्याचे पाय लागले आहेत त्याजवरून समजतों कीं तो कुत्रा लहान आहे. आणि त्याचा धनी माझें तें मांस काढून घेण्यांत गुंतला असतां तो कुत्रा मातींत बसला होता, तेथें जी त्याची खूण ज्या पाहिली, त्यावरून वाटतें कीं तो लांडा असावा.

## उंदीर आणि आंडें.

लक्षपूर्वक अवलोकनाची सवई लागली असतां त्याचा किती उपयोग आहे याचा रानटी इंडियानापासूनही बोध होतो, असें पूर्वोक्त

गोष्टीवरून दिसतें. आतां पुढली उंदिराची गोष्ट ज्याविषयीं आहे तें ग
ष्यानें केलें असतां नीतियुक्त कर्म असें होणार नाहीं तथापि समयसूच
तेचा बोध करून देण्याविषयीं त्या गोष्टीची किमत कमी असें नाहीं.

उंदरांस आंडीं फार आवडतात आणि कोंबड्या बसावयाचे ठिक
ते फार नाश करितात. आंडीं जातात तेव्हां चोरून नेणारे उंदीर अस
ल असें विरळा मनात येतें, कांतर येवढी मोठी वस्तू उचलून नेण्याजो
प्रत्यक्ष साधनें त्या जीवाच्या ठायीं नाहींत. याकारणास्तव त्यांचा य
णास बहुत करून वहमा येत नाहीं, तथापि ते आंडीं नेतात याविषय
संशय नाहीं. एका दिवसीं फेंफग्रीर एथील एका कुणब्यानें कित्येक उंदी
कोंबड्या बसायाचे ठिकाणाजवळ पाहिले, त्याजवरून ते काय करिता
तें पहायास तो काहींसा दूर उगाच उभा राहिला. इतक्यांत एका उंदरा
एका आंड्यापासीं पडून आपलें लांबच्यालांब अंग त्या आंड्याभोंवं
वेंराळलें, आणि आपलें शेंपूट दातांत धरून त्या आंड्यास आपल्या
आंगाचें आवरण घालून तें गच्च धरिलें इतक्यांत दुसऱ्या उंदरानील
ज्याजवळ येऊन त्याची मान धरून त्याला त्या आंड्यासुद्धां कोंबडी
च्या घरांतून ओढीत नेलें.

## एक्या फुटलेल्या तारवावरील खलाशी.

सांफेर ह्मणून एक वनस्पति आहे ही समुद्र तीरीं होती परंतु स
मुद्रानें व्यापिलें नाहीं अशा ठिकाणीं होत असती. या गोष्टीचें ज्ञान
एका मनुष्यास होतें, तें त्याला थोर अरिष्टाच्या प्रसंगीं मोठें उपयोगी
पडलें.

इश्वी सन १८२७ सांत नोवेंबर महिन्यांत तुफान होउन फ्रान्स् देशींचें एक व्यापारी गलबत्त सस्सेकूच्या किनान्यावर बीचिहेड याज वळ फुटलें. तेंव्हां त्या तारवांतील सर्व मनुष्य खालीं पडले त्यांपैकीं वरच्या कड्यापासून कोसळून खडकाची राशी झाली होती तिजवर चढून चौघेमात्र वांचले. ती रात्र अगदी अंधारी होती आणि समुद्राच्या लाटा आपला ग्रास करून टाकितील असे ते प्रतिक्षणीं समजत आहेत, इतक्यांत त्यांनून एकास त्या खडकावर एक लहानसें झाड अढळलें. तें सांफेरचें असें त्यास समजलें. हें झाड ज्या ठिकाणी होत असतें तेथें समुद्राचें येणें नाहीं असें त्यास ठाउक होतें, ह्मणोन आपण निर्भय आहों असें त्यानें यत्याच्या सोबत्यानी खचीत जाणून ते तेथें धीर न सोडितां पहांट होईपर्यंत राहिले. मग ते त्या कड्यावरील लोकांचे दृष्टीस पडतांच ते लोक त्यांचे साह्यार्थ आले.

## चितान्याचाचाकर.

सरजेम्स् थार्न्हिल ह्मणून एक नामांकित चितारी सेंट पालच्या देवळाच्या घुमटाचें आंतलें अांग सुशोभित करायाचें कामकरीत होता. एके दिवसीं, आपल्या कामापैकीं काहीं काम कसें दिसतें, तें पहावयास तो पराचीवरून मागें हटत हटत एथपर्यंत गेला कीं त्या पराचीच्या केवळ टोंकावर येउन पोंहचला. दुसरें एक पाउल मागें टाकिलें असतें तर तो खालीं फरसबंदीवर पडून त्याचा चुराडा झाला असता. ह्याचक्षणीं त्याचे चाकरानें त्याचें तें प्राणसंकट पाहून पळमात्रांत चित्रावर रंगाचें भांडें उडविलें. हें निष्कारण कर्म असा सरजेम्सा

ला भास होऊन तो तत्क्षणींच त्या चाकरास शिक्षा करायास पुढें धांवला, परंतु तें तसें करण्याचें कारण जेव्हां त्यास समजाऊन सांगितलें, तेव्हां त्या चाकराचे उपकार त्याच्याने पुरतेपणी बोलवत ना, अथवा त्याच्यात्या तत्कालीन चातुर्याचें पुरतेपणीं सानंदाश्चर्य करवेना. तें अरिष्ट त्यास सांगावयास तो चाकर ओरडला असता, तर कदाचित् त्याचा पाय चुकून पडला असता आणि तो मरून जाता. त्या परांचीच्या कांठावरून स्वेच्छेने परत येई असा काहीं हेतु उत्पन्न करणें हाच कायतो त्याला रक्षावयाचा उपाय होता. याकार्यार्थ त्यारंगलेल्या अंगाचा बिघाड करणें हें उत्तम साधन होय. ही सर्व योजणूक, व ती कृतिहीं एका क्षणांत घडली, कांतर धारिष्ट, व समयसूचकता ह्मणून जे अमुल्य गुण ते त्या सेवकाजवळ होते

## कारन गलबतावरील खलाशी मुलगा.

स्टर्लिंगशैर एथील फेम अफ कारन ह्मणून एक लहान गलबत फ्रेंन्च लोकांच्या एका लुटारू जहाजाने नार्थम्बर्लंडच्या बान्यावर सन १८११चे सालीं अकटोबर महिन्यांत धरिलें, त्याजवरील एक ह्मातारा मनुष्य व मुलगा खेरीज करून बाकीच्या खलाशी लोकांस कैद करून फ्रांन्स देशीं न्यावयाकरितां त्या फ्रेन्चजहाजावर चढविलें, आणि त्यां दोघांस सहा फ्रेन्च लोकांसकट्यां तें सांपडलेलें गलबत फ्रेंन्चबंदरास चालवून आणायाकरितां त्याच गलबतावर ठेविलें. या गलबताने त्या लुटारू जहाजास सोडून दिल्यानंतर लवकरच यास मोठ्या तुफानाने गांठलें, त्यातुफानाने यास फर्थ बंदराच्या तोंडाकडेस नेलें.

त्यातून गलबत चालविण्याचा प्रकार त्या फ्रेंच्लोकांस व त्या ह्मातान्यास ही ठाऊक नव्हता, आणि काळोखीरात्र, तेल आणि मेणबत्या सरून गेल्या, अथवा गलबतांतून टाकून दिल्या होत्या, त्यामुळें होका निरुपयोगी होऊन गेला होता. मगते लोक निराश होऊन पाठीमागील वायु जिकडे नेईल ति कडे त्या गलबतास जाऊं देऊं लागले. तेव्हां तो मुलगा केवळ तेरा वर्षांचाअस तां त्याने पूर्वी एकदोन सफरी केल्या होत्या आणि जवळजवळच्या बंदर कांठ्यांपैकीं व बेटांपैकीं काहींकाहीं नजरेंत ठेविलें होतें. त्याजवरून त्याने त्या फर्थ बंदराच्या मध्यभागीं इन्चकीथ ह्मणून एक बेट आहे तेथील एक तऱ्हेदार खुणेचा दिवा ओळखिला. मग त्याने सुकान धरून तें गलबतचा लविलें, आणि सेन्ट्मार्गारिट्स्होप एथें ब्रिटिशलोकांचें एक मोठें लढाऊजहा ज असतें हें त्यास ठाऊक होतें तेथपर्यंत तो घेऊन पोहचला. त्याजाहजाजव ळ आल्यावर त्याने त्यावरील लोकांस हांक मारिली, आणि आपणाजवळ सहा बंदिवान् स्वाधीन करायाचे आहेत ह्मणोन काहीं हत्यारबंद लोक पाठ वून देण्यास सांगितलें. तेव्हां भिऊन गेलेले आणि तुफानातून वांचल्यामुळें आनंद मानणारे असेजे फ्रेंच्लोक त्यानी पळून जाण्याचा काहीं उद्योग केला नाहीं. त्या लढाऊ गलबतावरून लोक आले, तेव्हां त्यांला असें वस्तुतः अर ळलेंकीं त्या मुलाने सहा फ्रेंच्लोकांचीं सर्व हत्यारें आपल्याजवळ गोळा करून ठेविलीं आहेत आणि त्यांस खरोखर कैद केलें आहे. मगतें तारूं व त्याजवरील माल हीं त्याच्या धन्याकरितां राखून ठेविलीं.

अनुकूल संधी ध्यानांत घेणें आणि ती साधून घेणें यासचपळ व सावध बुद्धि पाहिजे. मनुष्याने पुढें पाहत असावें, अनुकूलसमय दूर

असतांच तो त्याहातून ठेवावा व त्याचर सतत आपली दृष्टि ठेवावी, तो अ
पल्याकडेस ज्यागतीने येत असेल त्या सर्व गतीचें अवलोकन करावें अ
णि त्याच्या येण्या विषयीं आपण सिद्ध होउन रहावें. आणि त्याने आपला
वेळ पाहिला ह्मणजे त्याने तो बळकट धरून आपलें लक्षिलेलें कार्य होई तों
पर्यंत तो जाउंदेउंनये.

चारनकृत

---

## संकोचवृत्ति.

जोकोणी आपली आपण स्तुति करितो अथवा आपल्यास वाखा
णितो अथवा मी आपल्या मतें थोर आहें असें कोणाएकाप्रकारें दाखवि
तो, त्यास निश्चयेंकरून हांसतात. आपण आपल्या विषयीं नम्र भाव वाग
वावा आणि नम्रभाव वागवितों असें दाखवावें, आणि आपली स्तुति इत
र करूं लागले असतां ही त्यांचा तो स्तुतिवाद नम्रतेने ग्रहण करावा. सर्व
चांगले गुण संकोचित वृत्तीने शोभतात आणि सुधारतात, असें जें मानि
लें आहे तें नीट आहे. बढाईखोर वृत्तीने जर आपले गुण दाखविलेतर ते
अत्यंत चांगले असतांही त्यांचा तिरस्कार होतो. मग ज्ञान, योग्यता अथवा प
दवी आपल्याजवळ नसतां त्याविषयीं आपण डौल घातलातर आपला फा
रच उपहास होतो. अशा डौलाची सहज उघडीक होती आणि त्या डौल घा
लणाऱ्याच्याठायीं अगदीच गुण नाहींत असें मानल्याने जो त्याचा अनादर
व्हावाचा त्याजपेक्षां त्याचा सर्वांकडून अधिक अनादर होतो.

आपलें स्वमत अतिशय उत्कृष्ट आणि दुसऱ्याचें अतिशय निकृ
ष्ट असें मानण्याचा जो स्वभाव त्याचाही आपण निर्बंध करावा. आपल्या

आसमंतात् राहणाराचें मन अयुक्तिक असें आपल्यास दिसत असलें तथापि ते कदाचित् खरा विचार करीत असतील; आणि आपलें मन आपल्यास खरेंवाटत असलें तरी तें कदाचित् खोटें असेल. लाखो मनुष्यांत प्रतिएक मनुष्य हा एकच; त्यां सर्वांचीं आपआपलीं विशेष मतें आहेत आणि त्या एकास जसा आपण खरा ह्मणोन विचार करायास अधिकार आहे तसा त्यां सर्वांसही अधिकार आहे. मी बहुधा खोटा असेन असें जाणूं लागणें, आणि असें जाणल्या सारिखें करूं लागणें, हें साधणेंही मोठी गोष्ट आहे.

## जायांचीं पिसें ल्यालेला डोमकावळा. कल्पित गोष्ट.

मला मोरासारिखें उत्तम पक्षी व्हावयास काहीं नलगे, त्याचा वेश मात्र पाहिजे असें मानायाचा एका डोमकावळ्याने अभिमान केला. मग अत्याया शहाणपणाचे अहंकाराने फुगून त्याने त्यांचीं अत्यंत सुंदर पिच्छें पुरवयाजोगतीं घेउन त्यां पिच्छानी आपले पाख नटिविले. नंतर असा जायांचा आणलेला वेश घेउन त्याने आपल्या मंडळीचा त्याग करून मोरांत खपण्याविषयीं उद्योग केला. परंतु त्यां सभ्य प्राण्यासीं तो सहवास करूं लागतांच हा उगाच तोतया आहे असें त्या डौलाचे मिरवणुकीवरून बाहेर पडलें. तेव्हां त्यांसंतापलेल्या मोरानी आपलींतीं स्थान भ्रष्ट केलेलीं पिसें त्या डोमकावळ्यापासून घुचाडून त्याची ती सभ्यता तत्क्षणींच हिराघून घेउन त्यास केवळ डोमकावळा करून दाफिला आणि त्याच्या भाउबंदाकडेस हांकून दिलें. मग त्यानीही त्याचा तसाच धिक्कार केला. असा सर्वांनी त्याचा

उपहास व त्याची हेलना केली हा त्यास वास्तविक दंड झाला.

## सर ऐझाक् न्यूटन्.

जे महान् विद्वान् व बुद्धिवान् ज्यांचें सर्व लोक आश्चर्य आणि ज्यांची स्तुति करितात असे जे पुरुष ते अल्पगुणी मनुष्यांपेक्षां बहुधा विशेष संकुचित आढळतात. असे थोर असून अत्यंत संकुचित जे पुरुष त्यांतलाच सर ऐझाक् न्यूटन हा प्रसिद्ध तत्वज्ञानी होऊन गेला.

शाळेंत हा लहान मुलगा असतां आपल्या हाताने जीं लहान लहान चमत्कारिक यंत्रें करी तीं पाहून सर्वजणास आश्चर्य वाटे. याच्याजवळ कितिएक करवत, कुऱ्हाडी, हातोडे व दुसरीं हातेरें होतीं, तीं हा मोठ्या चतुराईने वापरीत असे. हा जेथें रहात असे तेथें एक पवनचक्की चालू झाली होती, ती पहाण्यास हा वारंवार जाई. तें यंत्र यास पुरतेपणीं समजे व तें कसें चालतें त्याची यास माहिती होई तोंपर्यंत याणें त्याचा प्रत्येक अवयव न्याहाळून पाहिला. मग याने आपला चाकू, करवत, व हातोडा घेऊन काम आरंभिलें, आणि त्या मोठ्या पवनचक्की सारिखीच एक लहान पवनचक्की केली. तें केवळ नीट नेटकें व कुशलतेचें काम झालें. नंतर ती वाऱ्याने सभोंवती फिरावी याकरितां तिला तो कधीं कधीं घराच्या छापड्यावर ठेवी. ती उंदराकरून फिरवायाची ही त्याने युक्ति काढली होती. त्या लहान जीवास त्या यंत्रांत घालून त्याचे शेंपुटास सुतळी बांधून ती सुतळी तो हळू हळू मागें ओढी ह्मणजे तो जीव पुढें जाई, तेणेंकरून त्या यंत्राचीं चाकें चालूं लागत. चाकाच्या वरल्या अंगीं काहीं धान्य ठेविलें असे, त्या धान्याजवळ तो उंदीर जाऊं लागला ह्मणजे ती पवनचक्की फिरूं लागे.

न्यूटनाने एका मित्रापासून एक जुनी पेटी मिळवून तिचें एक पाण्याने चालायाचें घड्याळ केलें, त्याजवर थोडें थोडें पाणी पडून तें चालत असे. साधारण प्रकाराचीं जीं मोठीं घड्याळें असतात त्यांसारिखेंच तें होतें. इतकेंचकीं त्यांजपेक्षां फार लहान, सुमारें च्यार फुट उंचीचें मात्र होतें. त्याच्या मस्तकीं एक वाटोळा पत्रा बसवून त्याजवर तासांचे अंक लिहिले होते, आणि तासांचा कांटा एका लांकडाचे तुकड्याने फिरत असे, आणि या तुकड्यावर पाणी थेंबाथेंबाने पडे तेणेंकरून तो कांटा खाली पडे अथवा वर चढे. न्यूटन ज्या खोलींत निजत असे तेथें हें ठेविलें असे. यास तो प्रतिदिवसीं प्रातःकाळीं काळजीने पुष्कळ पाणी भरून ठेवी, आणि तें असें चांगल्यापणें तास दाखवी, कीं घरांतलीं माणसें किति वाजले ह्मणून तें पहावयास जात असत. पुढें ऐझाक विद्याज्यांत जाउन राहिल्यानंतर तें घड्याळ एक कौतुकाचा पदार्थ ह्मणून बहुत दिवस त्या घरीं ठेविलें होतें. ज्या खोलींत तो रहात असे, ती पक्षी, पशु, मनुष्यें, तारवें, यांच्या चित्रानी, भरलेली असे आणि त्या खोलीचे भिंतीवर कोळशाने चांगल्या रीतीने काढलेल्या भूमितीच्या आकृती असत.

न्यूटन काहींसा प्रौढवयाचा झाल्यानंतर विद्यालयांत गेला, तेव्हां त्यास वायु, पाणी, भरती ओहोट, चंद्र, सूर्य, तारा, यांविषयीं कांहीं कांहीं समजून घेण्याची मोठी इच्छा उत्पन्न झाली. एका दिवसीं तो आपले बागेंत एकाच बसला असतां एक फळ झाडावरून भूमीवर पडलें. त्याजवरून तो आपले आपण विचार करूं लागला कीं हें फळ खाली पडायाचें कारण काय ? त्या फळांत काहीं शक्ति आहे ह्मणून हें पडलें किंवा पृथ्वींत काहीं श

क्ति आहे तिणें तें खालीं ओढिलें ? असा या विषयावर फारचेळ विचार करितां त्यास असें आढळलें कीं पृथ्वीने त्या फळास आपल्याकडेस आकर्षून ह्मणजे ओढून घेतलें, आणिही आकर्षण शक्ति सृष्टि व्यवहार नियमांतील एक नियम होय. याच शक्तीने मोकळे पदार्थ पृथ्वीवर धरलेले राहतात, आणि तिजपासून उडून आकाशांत जात नाहींत. आकर्षण पदार्थांचे ठायीं भार उत्पन्न करितें ह्मणून कोणेसमयीं या शक्तीस गुरुत्वाकर्षकत्व ह्मणतात, त्याचा आणि वजन याचा अर्थ जवळजवळ आहे. नंतर न्यूटनानेअसें शोधून काढिलें कीं कोणते पदार्थ असले तथापि त्यां त्याठायीं परस्परांस आकर्षण करायाची शक्ति असती, आणि त्या पदार्थांचें जसेंजसें महत्व आणि ते जसेजसे परस्परांहून दूर असतात तसेंतसें त्यामानाने तें आकर्षण नित्य घडतें. असें कीं चंद्र मोठा गोल असतांही त्याजवर पृथ्वीचें आकर्षण घडतें, आणि ग्रहांवर सूर्याचें आकर्षण घडतें. हे सर्व या आकर्षणाच्या योगाने परस्परांहून यथायोग्य अंतरावर असतात. असे हे त्याचे नवीन शोध, त्यांची गणना अत्यंत थोरविषय जे आजपर्यंत शोधून काढलेले आहेत त्यांमध्यें झाली, हें वास्तविक होय, आणि न्यूटनाने ते नवीन शोध केले याजवरून विचारवंत पुरुष त्याचें नाम सर्वदा मानितील.

सूर्याचा प्रत्येक श्वेत किरण नानाप्रकारचे सात रंग मिळून झाला आहे, हें तरी प्रथम न्यूटनानेच दाखवून दिलें, आणि पूर्वीं जे कधीं कोणास ठाउक नव्हते असे बहुत अपूर्व, चमत्कारिक विषय त्याने प्रकट केले. त्याची वृत्ति सौम्य व एकसारिखी समान असे. त्यास क्रोध येतांना दृष्टीस पडला असें विरळा, किंबहुना कधीं दृष्टीस पडलाच नाहीं. त्याजवळ

एक लहान कुत्रा असे, त्याचें नाव त्याने डैअमंड ह्मणजे रत्न्या ठेविलें होतें. एकादिवसीं न्यूटनास आपले व्यासंगाचे खोलींतून बाहेर जाण्याचें पडलें तेथें मेजावर त्याचे सर्व कागद व लेख होते. त्यामेजावर रत्न्याकुत्र्याने उडीमारून मेणबत्ती जळत होती ती उलटी पाडिली, तेणेंकरून सर्व कागद पेटून थोडक्यापळांत जळून गेले, याप्रकारें त्याचे बहुतवर्षांचे श्रम फुकट गेले. त्याव्यासंगाचे खोलींत जें झालें तें त्याने जेव्हां येऊन पाहिलें, तेव्हां त्याकुत्र्यास न मारितो इतकेंमात्र ह्मणाला, "आहा, रत्न्या! रत्न्या! त्वां जी नासाडी केलीस ती तुला नकळे"! न्यूटन मोठा ज्ञानी आणि विद्वान् होता परंतु त्याला त्या विद्येचा गर्व नसे, तो केवळ भला व नम्र असे. तो सर्व मनुष्यांवर आणि अत्यंत गरीब, व कनिष्ट अवस्थांवरही प्रीति करी. तो इतर बहुत्येक लोकांपेक्षां विशेष ज्ञानी असतांहीं आपल्या मरणाच्या किंचित् पूर्वी त्याने असें ह्मटलें कीं, मलाजें अजून शिकावयाचें होतें त्याशीं माझें ज्ञान मिळवून पाहिलें असतां त्यापुढें तें कांहींच नाहीं. असें वारंवार व्हावेंकीं त्याजकरितां जेवण वाढलेलें तीनतीन तास तसेंच राहावें, मग त्याने मेजावर यावें, इतका तो कोणेसमयीं विचार करायाच्या कामांत गुंतला असे. त्याचा काळ इस्वी सन १७२७सांत झाला, तेसमयीं त्याचें वय ८५ वर्षांचें होतें.

## आत्मश्लाघी विद्यार्थी.

पोर्सन ह्मणून एक महान् विद्वान् विद्यागुरु होता परंतु त्याचा स्वभाव व स्वरूप काहींसें विलक्षण असे. हा एकदां डांकेचे गाडींत बसून जात होता, त्यागाडींत दुसरीं कित्येकजणें होतीं परंतु हा अमुक हें

त्यांस ठाऊक नव्हतें. तेव्हां अक्स्फर्डांतील एक अल्पवयी विद्यार्थी त्या गाडींतल्या स्त्रियांस नानाप्रकारच्या गोष्टीने रंजवूं लागला, व इतर जीं त्याने भाषणें केलीं त्यांत तो एक वाक्य बोलिला आणि हें सोफोक्लीसाच्या ग्रंथांतलें असें ह्मणाला. ग्रीकभाषेंतलें प्रतीक, तस्यांत तें गाडींत, ह्मणोन तेणेंकरून तो विद्यागुरू गाडीच्या एकेकडल्या कोनात ध्यानवत् निद्रेने जोडुकल्या देत होता तो जागृत झाला, आणि आपले कान झाडून डोळेपुसून त्या अल्पवयी ग्रहस्थास बोलिलाकीं आपण मला वाटतें सोफोक्लीसांतलें प्रतीक तुक्के आह्मास कृपा करून ऐकविलें. मला तरतें त्या ग्रंथांत आहेसें स्मरत नाहीं. त्याजवरून त्या नवशिक्याने उत्तर केलें, महाराज, तें प्रतीक जसें आहे तसें म्या अक्षरशः बोलून दाखविलें, तें सोफोक्लीसाच्या ग्रंथांतही आहे. महाराज मला वाटतें आपण विद्याशालेंत होतां त्यास कितीएक काळ होऊन गेला असेल. तेव्हां त्या विद्यागुरूने आपल्या मोठ्या डगल्यांत हात घालून खिशांत रहायासारिखी एक सोफोक्लीसाच्या ग्रंथाची लहान प्रत होती ती बाहेर काढून हळूच त्यास पुसलें कीं आपण या लहान ग्रंथांत तें वाक्य कृपाकरून मला दाखवून द्याल काय ? नंतर कांहींवेळ पाने चाळून त्याने उत्तर केलें कीं तें वाक्य युरिपिडिसाच्या ग्रंथांत आहे असें आतां मला पुनः विचारकरून स्मरलें. त्याजवरून विद्यागुरूजीने पुनः आपल्या खिशांत हात घालून पहिल्यासारिखी एक युरिपिडीसाच्या ग्रंथाची प्रत काढून ती त्याच्या हातीं देऊन ह्मटलें कीं तरमग आपण कृपाकरून तें वाक्य या लहान ग्रंथांतून मजकरितां शोधून काढावें. त्या अक्स्फर्डकराने पुनः त्या कार्यास हात घातला, परंतु त्यास पहि

त्यापेक्षां चांगलें यश मिळालें नाहीं. तस्यांत त्या स्त्रियाही तोंडांतल्या तोंडांत हासूं लागल्या, त्याजवरून त्यास समजलेंकीं मी अडचणीत पडलोंखरा. शेवटीं तो ह्मणाला हे भगवान् कितीमी जडबुधि झालों आहें. महाराज! हांहां ! आतां मला पुरतेपणी आठवण झाली, तें वाक्य इस्किलसाच्या ग्रंथांत आहे. तेव्हां सदैव भरपूरजो खिसा त्यांत तो आग्रहीगुरु पुनः हात घालून इस्किलस ग्रंथ त्याच्या हातांत देऊं लागला, इतक्यांत तो विद्यार्थीचकित होऊन मोठ्याने ह्मणूं लागला. "अरेअरे गाडीवान् गाडी थांबीव, अरे मला झडकन उतरूं दे. एथें एकजण सोबती आहे त्याच्या खिशांतंतर अवघा बोडलियन्* ग्रंथसंग्रह आहे.

---

## सभ्यपणा.

मनुष्यें भिन्नभिन्न स्वभावाचीं व वृत्तीचीं असतात, याजकरितां प्रत्येकाच्या विचारासजें काहीं येईल तें तो इतरांजवळ जर बोलूं लागला तर एकमेकासीं निश्चयेंकरून तुटेल. दुसऱ्याचा असंतोष करणें हें वर्ज्यांकरितां आपण सोबतीत असतां आपल्या कल्पनांचा निरोध अवश्य करावा, आणि जेणेंकरून प्रायः कोणाची अप्रसन्नता होणार नाहीं असें आपल्यास वाटेल तेंच बोलावें.

परस्परांसीं सहवास करितांना बोलण्याचालण्याच्या ज्या आदरयुक्त व प्रीतियुक्त अस्या प्रकारच्या ठरविलेल्या पद्धति आहेत त्या लक्ष्यांत ठेवणें आवश्यक, असेंही मनुष्यांच्या अनुभवास आलें आहे. कोणी

---

* अक्सफर्ड एथील ग्रंथसंग्रह

कोणास पत्र लिहूं लागलातर ज्यास पत्र लिहायाचें तो असामी केवळ अपरिचित असला तथापि आज्ञाधारक सेवक असें तो पत्र लिहिणारा आपल्याविषयीं पत्राच्याखालीं लिहितो. ज्यास पत्र लिहावें तो लिहिणाराचे ओळखीचा असला,जरी तो त्याजविषयीं कांहीं चिंताही वागवीत नसलातरी तो त्यास मित्रवर्य असें लिहितो असें करणें यांत कांहीं कृत्रिमीपणा आहे खरा; परंतु जेणेंकरून पत्र ग्रहण करणाराची वृत्ति दुखविल्यावांचून राहणार नाहीं असाजो उद्धटपणा किंवा बोंधटपणा त्याचा आविर्भाव वर्जायाकरितां तो आवश्यक आहे.

कुलीन स्त्रिया व गृहस्थ भाषण करित असतां परस्परांसीं आदराच्या शब्दानी संबोधनपूर्वक बोलतात; युरोपखंडांत पुरुष प्रथम स्त्रीस खुरशी देतो नंतर आपण बसत असतो; एकाचें बोलणें होई तोंपर्यंत दुसरा वाट पाहतो, नंतर बोलूं लागतो; याप्रमाणें सर्वजण परस्परें मर्यादा राखितात व प्रीति करितात. हे असे आदरशीलतेचे उपचार करणें हें बहुतांचे मर्जीस येत नसेल यांत संशय नाहीं; तथापि असे उपचार करावे हें योग्यआहे, कांतर अन्यप्रकार केला असतां असंतोषकारक होईल. बोंधटपणा दाखवून आपल्याच सारिखीं जीं इतर मनुष्यें त्यांस दुखविणें यापेक्षां आपल्याच मनाच्या कलाचा थोडासा निग्रह करणें हें उत्तम आहे. सभ्यपणाचें वास्तविक मूलतर वस्तुतः परोपकारशीलता आहे. मनुष्यांवर प्रीति करावयास आपल्यास उचित आहे त्याप्रमाणें जर आपली प्रीति त्यांजवर आहे, तर त्यांजविषयीं सभ्यपणा धरल्यावांचून, आणि वाणीने अथवा अवलोकनाने जें त्यांस निःकारण रंजीस करणें त्याचा त्याग केल्यावांचून, आपल्या

स राहणार नाहीं.

आपल्या आसपास असणाऱ्या व आपल्याशीं संबंध राखणाऱ्याज्या वस्तु त्यांच्या केवळ दर्शनेकरूनच आपल्या वृत्तींची वास्तविक स्थिति अतिशय विकार पावण्याजोगी आहे, हेंही लक्षांत ठेवणें ही एक मोठी गोष्ट होय. कटकट व धिसधिस यांतच आपलें राहणें बहुतअसलें म्हणजे आपल्या वृत्ति कर्कश व शीघ्रकोपी होतात. जेथें सभ्यतेचीं मृदु भाषणें बोलतअसतात अश्याठायीं आपलें राहणें झालें म्हणजे सौम्य व आदरसत्कारी अशी आपली प्रकृति होती. सभ्य मंडळींत आपण असलों म्हणजे सर्व प्रबळ वृत्ति आवरण्याचें सामर्थ्य आपल्यास क्रमेंकरून प्राप्त होतें, आणि प्रथम ज्यांचा आपल्याठायीं भासमाच दिसतो तसेच प्राणी शेवटीं वस्तुतः आपण होतों. इतर सद्गुणांप्रमाणें सभ्यपणाच्याही सीमा आहेत. अविनय जसा अप्रिय, तसीच अतिशय आदराची अथवा हांजीहांजी करण्याची वागणूक अप्रिय आहे. वास्तविक सभ्यपणांतर प्रमाणिकपणानें आणि मर्दपणानें दुसऱ्याची मर्जी राखणें आहे. तोजसा आर्जव व आज्ञाधारकपणा यांपासून दूर आहे तसाच तो उद्धतपणा व बेपर्वाई यांजपासून ही दूर आहे.

---

## पारसीकुणबी.

अत्यंत दीनाच्याही सभ्यपणा ज्याचे चित्तांत भरणार नाहीं असा कोणी थोर नाहीं आणि सभ्यपणानें ज्यास वाहवा मिळणार नाहीं असा कोणी दीनही नाहीं. याचें कारण असें आहेकीं रूपा अथवा

सभ्यपणाच्या उपचार याच्या किमतीवर आपण मुख्यत्वेंकरून दृष्टि ठेवीत नाहींत. तीं ज्या चित्तवृत्तीपासून उत्पन्न होतात, व ज्या रीतीने केलीं असतात तीं विशेषेंकरून आपण फार किमतीचीं समजतों. याच कारणामुळें अत्यंत गरिबानी अति अल्प कृपाकरून अथवा कृपा ह्मणण्यास योग्य नाहीं अस्या गोष्टीनी जी प्रीति संपादन केली त्याजपेक्षां अत्यंत थोर पुरुषानी अत्यंत कृपेने कोण्या समयीं अल्प प्रीति जोडली. पहिल्या चॉर्लसाविषयीं असें सांगतात कीं कोणावर कृपा करणें झालीतरतो असंतोषकारक रीतीने करी ह्मणून आपल्या दर्बारी लोकांची तृप्ति करण्याविषयीं सभ्यपणाने नकार करणारे जे कित्येक राजे त्यांजपेक्षां त्याने लोकाचें प्रेम थोडें संपादन केलें.

पर्शिया देशींचा आर्टाक्सर्झीज राजा एकासमयीं मार्गक्रमण करीत असतां त्यास एक कुणबी भेटला, तेव्हां आपल्या प्रभूस नजर करायास आपल्याजवळ काहीं नाहीं असें जाणूनतो जवळच्या एका ओहळाकडेस धांवला आणि आपली ओंजळी पाण्याने भरून तें त्याने राजास प्यायाकरितां पुढें केलें. असाहा विलक्षण नजराणा पाहून राजा किंचित् हासला परंतु तें देणाराचा उपकार मानून असें बोलिला कीं याजवरून किमानपक्षीं तरी सभ्यस्वभाव दिसून आला. असा हा कुणबी स्वरूपाने गांवढळसा दिसो परंतु याचें मन स्वभावतः ग्रहस्थाचें असावें.

## डरिन एथें गेलेला इंग्लिश मानू ह्मणजे इंग्रेज.

इश्वीसनाच्या अठराव्या शेकड्याच्या मध्यभागाच्या सुमारें

*. इंग्लंदेशाचा राजा

इंग्लिशलोकांचें बाहेर फिरणें विरळा असे, त्यामुळें तेव्हां आतांपेक्षा ते विशेष आदर पावत असत. त्यासमयीं त्यांतील एक युरोपखंडांत पर्यटनकरितअसतां टुरिन एथें आला. तो तेथील स्थळ पाहण्यास बाहेर निघाला आहे इतक्यांत एक पायदळाची टोळी मिरवणूक करून परत येतां त्यासअवचित भेटली. तो त्या जाणाऱ्या शिपायांकडेस न्याहाळून पहात असतां त्या परदेशीच्या मनुष्यास डोळ दाखवावा असी ज्यास उघड इच्छाअसा एक अल्पवयी सर्दार जे पाण्याचे पाट त्या शहरांत सर्वत्र आहेत त्यांतील एक पाट ओलांडून जातांना त्याचें पाउल चुकून पडलें आणि तो आपल्यास सांभाळायास गेला इतक्यांत त्याची टोपी पडली. तेव्हां लोक हांसून त्या इंग्लिशानेही हांसावें असे अपेक्षेने त्याच्या तोंडाकडेस पाहूं लागले. परंतु तो तसें नकरितां त्याने आपली भरखुमी राखून टोपी गडबडत गेली होती तेथें झडकन जाउन, ती उचलून गोंधळलेला जो तिचा धनी त्यास निष्कृत्रिम प्रीतीचा आकार दाखवून दिली.

विस्मय व कृतज्ञतासूचक चिन्ह त्याच्या मुखावर उठलें आणि त्याने ती टोपी घेउन आपल्या त्या टोळीस मिळायास त्वरा केली. तेव्हां शाबास्कीची गुणगुण झाली आणि तो परदेशी तेथून पुढें चालला. हें कृत्य तर एक्या क्षणांत झालें व एक शब्दही कोणी बोलिलें नाहीं तथापि त्या गोष्टीने तेथील प्रत्येकाचें हृदय वेधलें. कृपाळू व सौम्य वृत्तीपासून जी शुद्ध सभ्यता उत्पन्न होती तिचें हें कृत्य. तो अल्पवयी कप्तान् पदवीचा मनुष्य होता, त्याने पलटणीस निरोप झाल्यावर तें वर्तमान रसभरित शब्दानी आपला कर्नल ह्मणजे मुख्य सर्दार यास सांगितलें. तें तो मुख्य स

दार तत्क्षणींच सेनापतीजवळ बोलिला. मग तो इंग्लिश्मान् आपल्या
णावळीच्या घरांत आल्यावर हुजूरकचेरींत आपल्या समागमें भोज
व्हावें असी विनंती करायास नकीब येऊन वाट पाहत आहे असें त्या
पाहिलें. नंतर संध्याकाळीं त्या इंग्लीशास दर्बारीं नेलें. त्याकाळीं तें द
र युरोपखंडांत अति चकचकीत होतें, तेथें त्याचा विशेष आदरसत्का
झाला. नंतर तो त्या तुरिन् शहरांत जोंपर्यंत होता तोंपर्यंत त्यास सर्व
जे वजनदार लोक त्यांच्या घरचीं आमंत्रणें येऊं लागलीं. तो तेथून जात
ना त्याला इटलीदेशांतील निरनिराळ्या संस्थानीं प्रवेश होण्याकरितां
पत्रें मिळालीं. याप्रकारें राजसंबंधहीन व परमित द्रव्यवान् असा तो
गृहस्थ असतां, त्यानें शोभायाजोगा एक ममतेचा उपचार केल्यावरून
असें झालें कीं त्याकाळीं जनसहवासाकरितां जो अत्यंत कौतुकपात्र होता
अस्यात्या परदेशांतून विशेष मान आणि अनुकूल साधन पावून देशा
टन करण्यास समर्थ झाला. तितका मान आणि अनुकूलताही सत्कुळीं
जन्म आणि संपत्ति यांपासून केवळ प्राप्त झाली नसती.

## चौदावा लुइस.

चौदावा लुइस ह्मणून जो फ्रान्स देशाचा राजा, त्याचें बहुत्येक प्र
करणीं बहुमानपूर्वक आश्चर्य करावें असा तो राजा नव्हता तथापि प
रोपकारशीलतेपासून जी शुद्ध सभ्यता उत्पन्न होती ती तो अनेक प्रसं
गीं प्रगट करी. हा वर्सैल्स एथील आपल्या मंदिरांत एके होसदार मं
डळींत असतां यानें जी थट्टेची गोष्ट असें मानिलें होतें ती फाटाची अ
सायोग आला परंतु ती हा सांगूं लागला तों काहींसी विरस असी झाली.

नंतर त्या मंडळीपैकीं एकजण लवकरच त्या खोलींतून निघून गेला. त्यास मयीं राजा बोलिलाकीं मी नवल ह्मणून सांगायास गेलों तें निरस असें तु मच्या सर्वांच्या लक्षांत आलें असेल असें मला खचीत वाटतें. त्याजवरून तेथेंजी मंडळी होती त्यानी कबूल केलेंकीं खरें आह्मास जस्यां गोष्टींची अपे क्षा करण्याचा अभ्यास पडला आहे तसीच केवळ ती गोष्ट नव्हती. तेव्हां रा जा बोलिलाकीं या गोष्टीचा मी आरंभ केला तों पर्यंत मला स्मरण झालें नव्ह तें कीं "आर्मागनाकचा राजपुत्र नुगता आपल्यास सोडून एथून गेला त्या च्या जवळच्या पूर्वजावरती गोष्ट लागू होऊन त्याची निंदा होईल. ह्या आणि दुसऱ्या सर्व प्रसंगीं कोण्या योग्य मनुष्यास दुखवावें त्याजपेक्षां चांगली गो ष्ट बिगडावी हें माझ्यामतें फार उत्तम."

हा राजा राजसंबंधहीन मनुष्याविषयीं उपरोधिक भाषण कदापि करीत नसे आणि आपल्या कुटुंबांतील कोण्याएकास करूं देत नसे, आ णि असें ह्मणेकीं आमच्या पदवीच्या मनुष्यांपासून असीउत्तरें निघालीं असतां तीं वज्रप्राय अथवा विषाच्या बाणासारिखीं होत. एकासमयीं या राजाची सून एका माणसाविषयीं तो ऐके इतके मोठ्यानें बोलिलीकीं त्या च्यासारिखा अत्यंत कुरूप प्राणी म्या कधींच पाहिला नाहीं, त्याजवरून राजा तत्क्षणीच कठोरपणाने तिजकडे पाहून उच्चस्वराने ह्मणाला "माझ्या राज्यांत अत्यंत स्वरूप मनुष्यांनी हाच असें मी यास मानितों. जेमाझे सर्वो त्कृष्ट सरदार, आणि अत्यंत शूरपणें रक्षण करणारे त्यांतला हा एक होय. याजकरितां त्वां त्याची अमर्यादा केली हा अपराध घडला त्याजविषयीं त्याचे जवळ लवकर क्षमा मागावीस हें मी तुला निश्चून सांगतों."

बोलूनचालूनजो गोडपणा तो थोरास प्रीतिपात्र करितो, बरोबरीच्यास मन मिळाऊ करितो आणि लहानास संग्रह करण्यास योग्य करितो. तो पदाचा लहान मोठेपणा साफकरून टाकितो, संभाषणास गोडी आणितो आणि आपल्यासमागमी असणारांतून प्रत्येक आपल्यास पाहून प्रसन्न होई असें करितो. तो सुस्वभाव व परस्पर उपकारबुद्धि उत्पन्नकरितो. भेडास धैर्य देतो, गलबल्यास निवळवितो, क्रूरास शांत करितो आणि रानवटांच्या गोंधळापासून सुजनाचे मंडळीची भिन्नता दाखवितो.

मनुष्यास दुर्जनतेचें कर्म करण्याविषयीं जसा अधिकार नाहीं, तसा त्यास दुर्जनतेचा शब्द बोलण्याविषयींही अधिकार नाहीं, आणि दुसऱ्यास धक्का मारून खालीं पाडण्याविषयीं जसा अधिकार नाहीं तसा त्यालाउद्धत बोलण्याविषयींही अधिकार नाहीं.

ज्यान्सन कृत.

---

## मिताहार.

शरीरीं आरोग्य व बल राहावें म्हणून सर्व अबालवृद्धांस नियमित मानानें भक्ष्य पाहिजे. कोणास थोडकें, कोणास त्याजपेक्षां अधिक पाहिजे. जो जसा बळकट, व निरोगी अथवा कृश, व अशक्त असेल, त्याने तसें नियमित मानाने म्हणजे आपले आहारा पुरतें खावें; त्यापेक्षां अधिक खाणें तर दुःखकारक परिणाम झाल्यावांचून त्याच्याने खावणार नाहीं. मांस अथवा उत्तम रीतीने सिद्ध केलेलें आणि चांगलें मसालेदार खाणें याचा पुष्कळच अंश खाण्यांत असूं नये हेंही आवश्यक

आहे, कांतर अशा सर्वांच्या अतिशय झाला असतां शरीरास विकार होता त, आणि ते पदार्थ सतत चालविलेतर तेणेंकरून प्रकृति बिगडती, ती त सीच नेहमी राहती.

ज्यास जितकें खाण्यास योग्य त्यापेक्षां जो अधिक खातो त्यास अधाशी ह्मणतात: आणि ज्यास चांगल्या खाण्याची आवड असती त्यास गोडघांशा ह्मणतात. विचारास जें नीट दिसतें, त्यापेक्षां अधिक रूखानुभवाची जो खाण्यापासून इच्छा करितो, तो नीट विचार करणारांच्या व नीट चालणारांच्या मतें फार नीचत्व पावतो. आपल्यास आपल्या अन्नाविषयीं आनंद असावा आणि आपण तें परिमित मानाने संतोषपूर्वक व कृतज्ञता पूर्वक खावें, परंतु खाण्याविषयीं अतिशय चिंतन करणें व त्याचे तयारी करितां फार मेहनत करणें अथवा खाणें आपल्या रूखाचें मुख्य अधिष्ठान असें समजणें हें अत्यंत लज्जित कर्म होय. अधाशीपणाच्या जितकाधिकार होतो तितका दुसऱ्या कोणत्या दुर्गुणाचा धिक्कार झालेला विरळा. असे याचे हेतु नीच व स्वस्थूल आहेत आणि यांत ज्याला आनंद वाटतो तो अवश्य धिक्कारास योग्य होतो.

ज्यापेक्षां फार खाणें किंवा सुग्रास खाणें इतकें वाईट आहे त्यापेक्षां मग मद्य पिण्यांततर फार मोठा प्रमाद घडण्याजोगा आहे. मनुष्याने अनेक प्रकारचीं मद्यें उत्पन्न केलीं आहेत. वैन् (द्राक्षामद्य) ब्रांडी, व्हिस्की, जीन्, ऐल असीं मद्यें आहेत, तीं कोणीही फार माशन केलीं असतां त्याची मोठी नासाडी झाल्यावाचून राहणार नाहीं, आणि कोणतेंही मद्य किंवा अमलाचा पदार्थ अत्यंत अल्प ग्रहण केला, तथापि त्याजपासून

काहींतरी अपकार झाल्यावांचून राहणार नाहीं. या अमलाच्या पदार्थांत एक अर्क असतो, त्याचा गुण असा आहे कीं त्याचें अधिक सेवन झालें ह्मणजे त्याजपासून शरीरास उत्तेजन आणि उन्माद येणें हें कार्य घडतें. तेणेंकरून मनुष्य विवेकहीन होऊन वेड्यासारिखें करण्याची त्यास योग्यता येती. या अमलाच्या उन्मादानें मनुष्यें अत्यंत अमर्याद कर्मे करितात, खूनही करायास चुकत नाहींत; अल्प सेविला असतांही ते मूर्खासारिखें भाषण करूं लागतात, आणि ज्याविषयीं मागाहून फार पस्तावतात असेंही बोलून जातात. याजकरितां सर्व अल्पवयी मनुष्यांनी अमलाविषयीं फार सावध असावें, असें कीं तें चाखूं नये. कारण थोडकें घेतांघेतां बहुत घ्यावेंसें वाटतें. याप्रमाणें होतांहोतां शेवटीं अंगीं दुर्व्यसन जडतें. असा जो दारू पिण्याच्या स्वाधीन झाला त्याला दारूबाज अथवा झिंग्या ह्मणतात. जरी अश्या मनुष्याकडून दारूच्या वेळेंत एखादें मोठें दुष्टकर्म होणें टळलें तथापि त्याला त्या अमित सेवनापासून बहुधा अवश्य दुःख भोगावें लागेल. निर्व्यसनी मनुष्यासारिखें त्याचे हातून स्थिरपणानें अथवा उत्तम उपयोगाचें काम होत नाहीं. तो जें काम पत्कारितो तें करील असा त्याचा कोणास भरंवसा वाटत नाहीं. याजकरितां त्यास कोणी कामावर ठेवीत नाहीं, तेणेंकरून तो गरीब होऊन जातो. तो जी दारू पितो तिच्या खर्चानें त्याची गरिबी ज्यास्त होती. त्याचे कुटुंबातील माणसें जीं त्याचे दुर्व्यसनानें विपत्तीस मिळालीं तीं त्याजवर प्रीति अथवा त्याचा सत्कार करीत नाहींत. त्याचें घर विपत्तीचें स्थल होतें, व रोग आणि दरिद्र हीं त्याचे आयुष्याचे दिवस लवकर कमी करितात.

# दोनमधमाशा.कल्पितगोष्ट.

एका वैशाखमासीं चांगल्या प्रातःकाळीं दोनमधमाशा मधाचा शोधकरावयास बाहेर पडल्या, त्यांतून एक सूज्ञ,व मिताहारी, आणि एक निश्चिंतवउडाउ असे. मग रूचासिक वनस्पति, अत्यंत रूगंधपुष्पें, आणि अत्यंत रुचिकर फळें पाहींकरून समृद्ध अस्या एका बागांत त्या लवकर येउन पोहंचल्या, आणि त्यांजपुढें जे नानाप्रकारचे गोडघांस मांडून ठेविलेले होते ते त्यानी काहींवेळ सेचन केले. त्यांतून एकीने ते सेवनकरितां करितां आपलें घर करावयासाठी आपल्या जांघांत मेण भरून घेतलें. दुसरीनेतर प्रस्तुत मिळालेलाजो उपभोग त्याशिवाय दुसरी करण्याची चिंता न धरितां त्या मिष्टपदार्थांची धण घेतली.

शेवटीं अंजिरासारिख्या एका झाडाचे खांदीचे खालीं एक पसर ट तोंडाची मधाने भरलेली कुपी टांगलेली त्यांस आढळली. तेव्हां त्या विचारशून्य गोडघांशीला तिचे सखीने निषेधकरून सांगितलें तथापि इंद्रियजन्य जे सर्व आनंद त्यांचा उपभोग घेण्याचा निर्धार करून तिने त्या पात्रांत आपल्यास डोक्यारूधां बुडवून घेतलें. परंतु दुसरीजी ज्ञानी इनेतसें नकरितां, सावधगिरीने अल्प सेचन केलें, आणि अपकाराविषयीं शंकित होउनही फळें व फुलें यांजवर उडून गेली, तेथें इने आपला आहार अल्पमानाने घेतला, तेणेंकरून स्वरचाचा वास्तविक भोग घडायाकरितां आपली रुची रक्षिंगत केली.

असेंही असतां आपली ती सखी मधुमक्षिकागृहीं येणार किंवा नाहीं हें पुसावयासही संध्याकाळीं तिजकडेस गेली, परंतु ते मिष्टपदार्थ

तिच्याने असे सोडवतना तसा तिच्याने त्यांचा उपभोग करवेना इतकी ती त्यांच्या सेवनाने धुंद झालेली इला अडकली. जी आपल्या पायांनीं अडकली, जिचे पाय निश्शक्त झाले, जिचें अवघें शरीर अगदी प्राणहीन झाले असीजी ती माशी तिला आपल्या या सरबीस शेवटच्या आशीर्वाद द्यायाचे मात्र सामर्थ्य होतें. मग तिने शेवटच्या उसासा टाकितेवेळीं खेद केला कीं विषयानंदाच्या सेवनाने प्रपंचाचे रुचीसजरी उत्तेजन येतें तथापि अनापर उपभोग झाला असतां अपरिहार्यनाश आहे.

## लुइसकोर्नेरो.

वेनिसनगरांत लुइस कोर्नेरो म्हणून एक मानकरी होता. तो चाळीसवर्षांचा होईतोंपर्यंत आपल्या बहुत्येक मित्रांप्रमाणें अमित आहार करीत असे म्हणून अतिशय भक्षण, प्राशन यांपासून होणारे रक्तदोष, संधिवात, ज्वर इत्यादि जे रोग त्यापासून तो त्या अवघ्या काळांत कटलेला असें दिसला. शेवटीं आपल्या वैद्याच्या सांगीतल्यावरून त्याने आपलीजीवनाची रीति सुधारून तो पराकाष्टेचा मिताहारी झाला. त्याचें फळ असें झालेंकीं त्यासजे रोग होत असत त्यां सर्वांपासून तो एका वर्षांत सुटला. नंतर तो प्रतिदिवसास बारा औंसा इतका मात्र कोरडा आहार व चौदा औंसा इतकें एक साधें द्राक्षामद्य याप्रमाणें सेवूं लागला. आस्या मानाचा आहार बहुत्येक मनुष्यांचें जीवधारण व्हावयास कदाचित् फार थोडका पडेल परंतु तेणेंकरून कोर्नेरो केवळ वृद्ध होईतोंपर्यंत त्याच्या शरीरसंपत्तीचें चांगलें रक्षण झालें. तो सत्तराचे वर्षीं पडून त्याचा दंड व पाय मोडला, या अस्या वयांत कित्येक मनुष्यांची इतकी मोठी दुखापत बरी होणें कठिण, अथवा ती मरणास कारण

झाली असती, परंतु कोर्नेरोचें शरीर केवळ निर्विकार स्थितीने होतें ह्मणून ती फार थोडक्याकाळांत बरी झाली. तो ब्यायशींवर्षांचा असतांडों गरावर धांवत चढे, आणि आपल्या आपणजमिनीवरून उडून आपल्या घोड्यावर बसे आणि त्याची बुद्धि जसीचीतसीच पूर्ण असे, तेणेंकरून तो त्या वयांत कोमलरसप्रधान नाटकें लिही. सर्वकाल संतोषवृत्ति असे, आणि आपल्या अंतकाळापर्यंत मुलांचे खेळ त्यांच्या बरोबर खेळायास तो समर्थ असे. असाहा विलक्षण मिताहाराचा कित्ता त्याने घातला तेणेंकरून त्याचें अठ्यायणव वर्षांचें वय झालें, तेव्हां तो अत्यंत शांतवृत्तीने केवळ दुःखरहित मरण पावला.

## जाक्सिंप्किन्

जाक् सिंप्किन् ह्मणून एक खलाशी होता. हा पोर्टस्‌मौथ एथील गोदींत काम करी, हा फार दारू पिऊं लागला. त्याचा स्वाभाविक परिणाम असा झाला कीं याला बयाचे स्नीस व मुलांस, अंगभर वस्त्र, पोटभर अन्न मिळूं नये, घरदमसर, अणअणीत, व त्यांत सांगायासारिखें काही सामान राहिलें नाहीं असें झालें. एकादिवसीं संध्याकाळीं हाज्याक् पयाचे कोणी दारूबाज सोबती असे मार्गांतून जात असतां याचें दैवगत्या एका स्थळीं जाणें झालें. तेथें मद्य पिऊं नये अस्या निर्धाराची मंडळी मिळाली होती, आणि एक सौम्य व प्रतिष्ठितसा दिसणारा मनुष्य, मद्य प्राशनामुळें कसे अपाय होतात व कोणतेंही उन्मादक मद्य जे कधींच पीत नाहींत ते तारतम्यानें पाहिले असतां कसे सुखाने वर्ततात, त्याविषयीं भाषण करीत होता. तेव्हां तो खलाशी अर्धा झिंगला असतां ही जें बोलणें झालें तें सम

जून आपली खात्रीकरून घ्यांयापुरती त्यास शुध्दि होती. मग त्या बोध
पर भाषणाच्या अंतीं त्या खलाशाने त्यावकूत्याजवळ विनंती केली कीं
या मंडळीतला मीही एक मनुष्य आहें अस्या भावाने माझें नाव लिहून
ठेवावें.

नंतर त्या प्रमाणिक जाकूचे सोबत्ती त्याची ख्याली करीत असतां
ही तो आपल्या निर्धाराविषयीं दृढ राहिला. कलालाच्या दुकानी त्याचें जाणें
नाहींसें झालें. त्याने जें मिळवावें त्यास सर्वांचा आपल्या प्रपंच करवास आव
श्यक जे पदार्थ त्याविषयीं खर्च करावा. त्यास व त्याचे कुटुंबास चांगलेपणीं
वस्त्र व पुरतेपणीं अन्न मिळूं लागलें, त्यानी घरांत काहीं चांगलें सामान आ-
णिलें, पुढें मुलें शाळेंत घातलीं. कदाचित् कोण्यासमयीं दुखणें लागून काम
करवेनासें झालें असतां आपला सांभाळ व्हावा म्हणून अथवा आपलें म्हाता
रपण झालें असतां कारवान्यांत आपलें राहायास जाणें न व्हावें याकरितां
आपली शिलक वाढत जावी म्हणून तो थोडे पैसेही राखूं लागला आणि ते एकी
कडेस शिलक ठेवण्याचे पेटीवर काळजीने ठेवूं लागला.

जाकाच्या पूर्वीच्या सोबत्यानी त्याच्या त्या रूपर्तनाचें आश्चर्य मानावें
तसें न करितां त्यास हांसूं लागले. आपण चिंध्या पांघरत असावें, आणि दुस
ऱ्या मनुष्यास चांगलीं वस्त्रें जेणेंकरून मिळतात त्यास हांसावें अथवा
आपण शिळीं बटाटीं खायास बसत असावें, आणि दुसऱ्या मनुष्यास रु
खकर आंबरीचा वाडगा जेणेंकरून मिळतो त्यास हांसावें हा आडाणीपणा.
जाकास उपरोधिक भाषण बोलणारे जे होते त्यांस त्याने एकादिवसीं चांगलें
जिंकिलें. तो मार्गाने जातो आहे असें पाहून एकजण त्यास मोठ्याने बोलूं

लागला. " अरेजाक् त्वां मद्य सोडून दिलेंस हें मला वाटतें तुला मानत नसेल,, तणेंकरून तुझे गालतर फार फिक्ले दिसूं लागले," तेव्हां तो बारा रुवर्ण मुद्रा शिलक ठेवण्याचे पेटीवर ठेवावयास नेत होता त्या बाहेर काढून ह्मणाला, " पोरानो तेणेंकरून गालच काय, माझा खिसाही पिवळा झाला." त्याजव रून त्यांस आपल्या दरिद्राची लज्जा वाटली, मग त्यानी त्याची पुढें कधींच थट्टा केली नाहीं.

## साधें खाणें सर्वोत्कृष्ट मिष्टान्न होय.

मिष्टान्न सेवनेकरून जो आनंद वृद्धिंगत करण्याविषयीं आपण योजिलें असतें तोच आनंद त्याणेंकरून नाहींसा होतो, कांतर साध्या खाण्याने जी निरोगी भूक तृप्त होती तिचा विशेष आनंद जे मिष्टान्नाचा उपभो करितात ते कधींच जाणत नाहींत. आर्टक्झर्झीस्नीमन् ह्मणून पारसी राजा होता, त्याजविषयीं असें सांगतातकीं, तो शत्रूपासून पळत असतां कोरडीं अंजिरें वजवाची भाकर असें जेवण जेव्हां त्यास मिळूं लागलें, तेव्हां "केवढाहा आनंद यांविषयींमी अजाणता होतों," असें मोठ्याने बोलणें त्यास प्राप्त झालें.

---

## शरीरसंपत्तीचें संरक्षण.

शरीराचें प्रत्येक इंद्रिय अथवा त्याचा प्रत्येक अवयव निर्विकार असुतो आणिजो व्यापार अथवाजें कर्म ज्यास लावून दिलेलें आहे तेंत्या जकडून आयासा वांचून होत असतें, असीजी शरीराची स्थिति ती शरीर· संपत्ति किंवा आरोग्य होय. जर अन्नाशय व मलाशय यांस यांचें अवघें

स्वभावसिद्ध सामर्थ्य आहे, व यांचा व्यापार अन्नावर यथायोग्य रीतीने घडत आहे; काळीज व त्याच्या सारिणी उत्तम स्थितीने आहेत, व तिहींकरून रुधिराभिसरण नीट होत आहे. फुप्फुस अव्यंग आहे आणि वायूचा पाहिजे तितका पुरावा रक्तास होऊं देत आहे; सर्व मनोव्यापार यथायुक्तरीतीने घडावे असा जर मगज निर्विकार आहे; आणि जर त्वचा घाम बाहेरेन्यायाजोगी आहे; तर आरोग्याचे मुख्य संकेत लक्ष्यांत ठेविले आहेत असें समजावें: तेव्हां अप्रशस्त अथवा दुःखकारक प्रतीति आपल्या अनुभवास येत नाहीं, आणि जींजीं आपलीं नेमलेलीं कार्यें असतात त्यां सर्वांकडेस आपल्यास लक्ष देतां येतें. अश्या अवस्थेंत असणें हें एका सर्वोत्कृष्ट कल्याणाच्या उपभोग घेणें आहें; आणि याहून विपरीत असणें हें एक कठिण विपत्ति अनुभवणें आहे. आपल्या उत्पन्न कर्त्या परम कृपाळू प्रभूने असें नेमून ठेविलें आहेकीं, आपले शरीराचीं अवघीं इंद्रियें किंवा अवयव यांस आपल्याकडून अपकार न होई इतकीमात्र काळजी आपण वागविली असतां, त्यांनी मुळच्या निर्विकारपणें राहत असावें, आणि त्याणें करून आपल्यास आरोग्य व्हावें. परंतु तीं धडधाकड राहत असीं ठेवण्याविषयीं आपण काळजी न वागविली, तस्मग आरोग्य प्राप्ति असंभावनीय होईल. यास उदाहरण, अतिशय आहार सेवनाची सवई लागली अथवा अपकार कारक आहार सेवन केला तर अन्नाशयास निश्चयेंकरून विकार होतो; अतिशय कल्पना, व चिंता केलीतर मगजास व हृदय व त्याच्या सारिणी यांस विकृति होती, त्वचा उष्ण असतां तिला जर थंड वाऱ्याची झुळुक लागलीतर तिचीं रंध्रें बंद होतात ह्मणजे तिचाने घामास बाहेर नेववत नाहीं, अश्यारीतीने काहींतरी

अशुध आचरणाच्या मार्गाने, अथवा काहीं अपाय अवचट प्राप्त झाल्याने, प्रत्येक इंद्रिय विकार पावावयाजोगें अथवा त्याच्या व्यापाराची अव्यवस्था व्हावयाजोगें आहे, त्याचा परिणाम रोग होतो, तो अत्यंत घाईट रूपाचा असला ह्मणजे पुष्कळवेळ मृत्यूस उत्पन्न करितो. याजकरितां प्रकृति नीट राखून ठेवावयासाठीं आपणास कितीएक कायद्याप्रमाणें चाललें पाहिजे, अर्थात् आरोग्याविषयीं जे नियम त्यांकडेस लक्ष दिलें पाहिजे, असें स्पष्ट दिसतें. आपलें स्वाभाविक बळ व आरोग्य आपले शरीरांत राही अशा रीतीने वागण्याविषयीं आपण अभ्यास ठेवणें हें एक अत्यंत मोठीं जीं स्वविषयक कर्तव्यें त्यांतलेंच होय.

कित्येक लोकांस त्यांचे आईबापापासून रोग प्राप्त होतात. कित्येक रोगांचा फैलाव संसर्गानें अथवा स्पर्श संचारानेंही होतो, ह्मणजे, त्यांस वायु एका मनुष्यापासून दुसऱ्याकडेस घेऊन जातो अथवा ते एकापासून दुसऱ्यास स्पर्शेंकरून प्राप्त होतात; ह्मणून परिणामीं असें होतें कीं ते रोग उत्पन्न करून घेण्याविषयीं ज्यांचा काहीं संबंध नसतो अशा बहुत्येकांस लागतात. अशा व इतर सर्वप्रसंगीं, व्याधीस पात्र झालेले जे पुरुषविशेष ते कसेही निर्दोष असले तथापि त्या व्याधीचा शोध केला असतां ती मनुष्याच्या चुकेपासून होती असें आढळतें. आईबाप, आजा, आजी, अथवा दुसरीं पूर्वजें यांनीं ते रोग अविचारेंकरून आपल्यास लावून घेतले ते मग त्यांजपासून त्यांच्या मुलांस प्राप्त झाले असावे. पाणथळ जमीन, अथवा मोठ्या शहरांतील दाटीमधली, व हिडिस अशा रोगी जागेंत जे लोक राहतात अथवा जे आरोग्यकारक व पुरतेपणी आहार सेवीत नाहीं

न अथवा जे आपलीं शरीरें आणि घरें स्वच्छ ठेवीत नाहींत त्यांपासून सांसर्गिक आणि स्पर्शसंचारी रोगांची उत्पत्ति नेहमी होत असती.

याजवरून असें दिसतें कीं, आपल्या व आपलेच सारिखे जे इतर लोक त्यांच्या हितार्थ, आपण आरोग्य रक्षणाविषयीं जे युक्त उपाय ते सर्व योजावे, हें करणें आपल्यास उचित आहे.

जो मनुष्य मुळचा दणका असेल त्याच्या आरोग्य रक्षणार्थ जे मुख्य उपाय आवश्यक आहेत ते असे कीं जेथें तो राहत असेल ती जागा कोरडी असावी त्याचें घर स्वच्छ असावें आणि त्यांत दिवसास व तसेंच रात्रीसही नवीन वायु येउंदेउन त्याचा चहूंकडे संचार होउं द्यावा. त्याने आपल्या शरीराचा अवघा बाह्यभाग वारंवार धूत असावा. प्रतिदिवसास सा़ठतोळ्यापेक्षां कमी नाहीं इतका कोरडा आहार घेत असावा. त्याने फारच एका प्रकारचा आहार व एका जेवणांत पुष्कळ अनेक प्रकारचे पदार्थ सेवूं नयेत. अफूची व कराचीजीं मद्यें त्यांचें किंवा अमलाच्या पदार्थांचें सेवन त्याने वर्जावें. प्रति दिवसास कनिष्ठपक्षीं एक तास अथवा जितका अधिक घालवेल तितका त्याने आपला वेळ उघड्या वायूंत घालवावा. त्यास शारीर व मानसिक व्यायाम घडण्याजोगा काहीं उद्योग असावा, त्याकडेस त्याचें लक्ष प्रति दिवसीं आठ किंवा दाहा तास योजलेलें असावें. असा जर तो कामांत लागलेला असेल तर त्याने प्रति दिवसीं आपल्या फुरसतीपैकीं काहीं काळ आनंदकारक मनोरंजनांतही घालवावा. ओल्यावस्त्रानी अथवा थंड वारा वाहत असेल अश्या खोलींत क्षणभरही बसूं नये. रात्रदिवस मिळून २४ तास त्यांपैकीं त्याने सहा तासांपासून आठ तास निद्रेंत घालवावे. महान् चिंता मनांतून टाळ

ण्याविषयीं त्याने सावध असावें आणि दुर्दैवामुळें जें दुःख उत्पन्न होईल तें धैर्येंकरून सहन करण्याविषयीं झटावें. जर ह्या नियमाप्रमाणें सर्वलोक आपला निर्वाह करूं लागले तर कालेंकरून या पृथ्वीवर रोगान्ची वळख थोडीच राहील. आणि मानुष स्करवाचें मान किती वाढेल त्याविषयीं आतां आपल्यास कांहीं कल्पना करवत नाहीं.

---

## दमसरघर.

आरोग्य रक्षणाविषयींचे नियम जिला ठाऊक होते असी एक कुलीन स्त्री, आपली बहीण इंग्लंडदेशींच्या एका पूर्व प्रांतीं राहत होती तिला भेटायास गेली. या बहिणीचें मन चांगलें होतें, परंतु इतरांसीं बरोबरीकरून पाहतां ही स्त्री गैरसमजूतदार होती. पाणथळाच्या जवळ एक घर होतें त्यांत इचें आपल्या कुटुंबासुद्धां राहणें असे, त्याची जमीन इतकी नीच कीं हिवाळ्यांत स्वयंपाकघरांत बहुधा एकएक तसू पाणी भरत असे. त्या भेटायास आलेल्या बाईनें, कुटुंबास आरोग्य आहे ना म्हणून पुसलें, तेव्हां ही म्हणाली कीं आम्ही मोठीं दैवहीन असें या घरांत एकनाएक प्रकारें झालें आहे. एथें आम्ही आल्यापासून, वैद्यास कधींच निरोप दिला नाहीं. माझ्या नवऱ्यास संधिवायूचें कठिण दुखणें लागलें आहे, तें त्यांच्या शरीरास अगदीं लुलें करील असें भय वाटत आहे. मी पडशापासून बरी आहें असें विरळा, आणि हिंवाळा आला म्हणजे मुलांचे घसे दुखूं लागतात. आणखी गतवर्षींतर आश्विन महिन्याचे सुमारांत आम्हां अवघ्यांस ज्वर लागला होता तेव्हां दोन मुलगे आणि एक चाकर गेला, तें तुम्हास तर ठाऊकच आहे. आम्ही अ-

सी दैवहीन एथेंच कसी झालों हें मला सांगतां येत नाहीं.

पाहुणी बोलिली माझे आवडत्ये तूं दैवहीन नाहींस, तूं असमंजसमात्र आहेस. रोगकारक पाणथळाजवळ तुमचें घर, तें दमसर, अस्यांत तुमचें राहणें ह्मणून तुह्मास कुटुंबसंबंधीं दुःखें होतात आणि एथें जोंपर्यंत तुह्मी राहाल तोंपर्यंत अन्यथा कधींच होणार नाहीं.

बहिणीने उत्तर दिलें तुह्मास असें वास्तविक वाटतें काय? असेंच जर आहे तरमग मीउद्यां एथून निघून जात्यें. पण आपण कोठेही असलोंतरी अपाय आपल्यावर येऊन पडतील, आणि आपल्यास जे प्राप्त झाले असतील त्यांपासून आपण पळूं लागलों असतां अधिक वाईट जे त्यांची आपली कदाचित् गांठ पडेल.

ती कुलीन स्त्री ह्मणाली आपण कोठेही असलोंतरी आपण अपायांस पात्र आहों यांत संशय नाहीं; पण अमुक एक अनिष्ट होणार असें आपल्यास भय प्राप्त झालें असतां तें टाळावें, हा आपला धर्म आहे. असें केल्याने आपण इतर आपायांस अवश्य अधिक पात्र होऊं असें नाहीं. या विश्वांतने कसें वर्तावें, आपली शरीर प्रकृति कसी रक्षून नीट ठेवावी, इत्यादिकांविषयीं ईश्वराने कितीएक नियम करून ठेविले आहेत. याजकरितां तूं एथें राहून त्यांतील कित्येक नियम मोडितीस आणि तुह्मीं जीं कुटुंबसंबंधीं दुःखें तीं तुझ्या चुकेचाच स्वाभाविक परिणाम असें माझे नजरेस येतें.

शेवटीं त्या पाहुणीने फार विनंतीने आपल्या बहिणीकडून तिचें तें कुटुंब गांवांत एका दुसऱ्या ठिकाणीं नेवविलें, तेथें तो नवरा त्या संधिवाताचे दुखण्यांतून बरा झाला, आणि ती आई व मुलें कितीएक वर्षें उत्कृष्ट

आरोग्य सुखानुभव घेत आहेत.

## अजीर्णझालेल्यारोग्यास बरें करण्याच्या प्रथमउपाय.

इंग्लंड देशीं जलाशय ह्मणून काहीं स्थळें आहेत, तेथें एका स्थळीं एक वैद्य राहतो, त्याने अजीर्ण ह्मणजे पाचक इंद्रियांची अव्यवस्था बरी केल्यावरून मोठेंनाव मिळविलें आहे. तो वैद्य तर आपल्या रोग्यांस काहीं सांगाया सारिखें करीत नाहीं, त्यांस परिमित खायाप्यायास व घराबाहेर पडून काहींसा व्यायाम करायासमाच सांगतो. एकादिवशीं शरीराने जड व मध्यम वयाचा असा एक मनुष्य त्याचेजवळ येऊन आपलें दुःख सांगूं लागला कीं माझी प्रकृति भारी बिगडली आहे. त्यासमयीं त्या वैद्यास लवकरच समजलें कीं ज्यांच्याजवळ पुष्कळ संपत्ति असती ह्मणून ज्यांचें सर्व जाणें येणें गाडींत बसून होत असतें, आणि ज्यांस मिष्ट पदार्थाविषयीं इच्छा होती त्यांची जे आपल्यास कदापि मनाई करीत नाहींत असेजे असंख्य लोक त्यांतलाच हा एक आहे. तेव्हां मी गाडींत बसून गावांबाहेर काहीं कोस फिरायास जातों तुह्मी माझे सोबतीस यावें असी त्याने त्या रोग्याजवळ विनंती केली, ती त्याने मान्य केली. मग तो वैद्य गावांबाहेर सुमारे अडीच कोस जाऊन त्याने आपला चाबूक टाकून दिला आणि तुह्मी खालीं उतरून तो मजकरितां वर उचलून द्याया ह्मणून त्याने आपल्या त्या रोग्याची प्रार्थना केली. तो गृहस्थ गाडींतून बाहेर पडतांच वैद्याने गाडी फिरवून शहराकडेस परतून जायाच्या मार्ग धरिला व मागें पाहून हांसत हांसत त्यास सांगितलें कीं तुह्मी पायींच परत यावें, याउपायाने बहुत करून तुह्मास

भोजन करायाजोगी चांगली अन्नाची वासना उत्पन्न होईल. तें दुखणें पुरतेपणीं बरें करण्यास हा पहिला उपाय झाला.

यासारिखीच अवस्था एका गृहस्थाची होऊन तो,लंडन शहरांतील नामांकित असून काहींसा भ्रांत अश्या एका वैद्यास विचार पुसूं लागला. त्या वैद्यापासून त्यास इतकेंच उत्तर मिळालें कीं "दर दिवस सहा पेन्स ह्मणजे तीन आण्याचें खात जा, आणि ते पैसे आपले मेहेनतीनें मिळवीत जा." हें उत्तर तो छांदिष्टासारिखें बोलून गेला तथापि त्या रोग्यास जें काहीं कर्तव्य तेंच हें निश्चयेंकरून होय.

## शैत्य झालेला एक अल्पवयी मनुष्य.

एक अल्पवयी मनुष्य नुक्ताच धंदा करूं लागला होता, तो एके रात्रीस नाटकगृहाहून घरीं येत असतां त्यास शैत्य झालें. त्यानेंजर दुसरे दिवशीं बिच्छान्यात निजून राहून थोडेसें औषध घेतलें असतें, तरती विकृति दूर झाली असती; परंतु आपल्या कामावर हजीर होण्याची त्यास चिंता असे, व त्यानें त्या कामाची फार खबरदारी राखावी असें जरूर होतें, ह्मणून त्यास एक दिवसाचाही अटकाव कबूल करवेना असें झालें. मग तो आपल्या मेजावर जाऊन बसला परंतु संध्याकाळीं पाहतो तों प्रकृति सहजच किंचित् अधिक बिगडली. त्याचा जलद स्वभाव असे, आणि जें कर्तव्य तें करण्याविषयीं तो दृढनिश्चय असे ह्मणून त्यानें तत्कालच बाहेर जाण्याचें चालविलें, त्याचा परिणाम असा झाला कीं त्याच्या गळ्यांत अधिक जळजळूं लागलें परंतु त्यापासून त्यास विशेष वेदना झाली नाहीं, ह्मणून मी आरिष्टांत पडलों आहें असें त्याच्या मनात आलें नाहीं. काहीं एका कामाविषयीं तो चिंतातूर

होता. त्याची रवानगी करण्यासाठीं रथावर घोडे हांकावयाचे स्थानीं बरून त्याने रात्रीस मजलही केली. तेव्हां त्याचा शब्द खोल जाउन अगदी हळू येउं लागला, तथापि तो आपल्या व्यापाराच्या धंद्यावर हजीर होत गेला. शेवटीं त्याचे घरवारींत कोणीएक वैद्य एकादिवसी दैववशात् आला, त्याने त्याची अवस्थापाहून त्यास सांगितलेंकीं तुह्मी बिछान्यांत निजून न राहतां बाहेर पडतां यापेंकरून तुह्मी आपल्याजीवास अनर्थ करून घ्याल. याजकरितां तुह्मी लवकर घरीं जाउन तुमचा जो नित्याचा वैद्य असेल त्यास बोलवावें, असी त्याने त्यास सल्ला दिली.

हेंतरी त्या तरण्या गृहस्थाने खिन्नतेने कबूल केलें. मग त्याला बरें करण्याविषयीं सर्व उपाय केले, पण ते निष्फळ झाले. त्याच्या घशाच्या वरला भाग व फुफुसांत ज्या नळ्या उतरल्या असतात त्यांस बरीं होउंच नये असीं क्षतें पडलीं, मग तो काहीं आठवड्यानी मेला, त्याविषयीं त्याचे कुटुंबांतील सर्वजणांनी व मित्रांनी फार खेद केला. याप्रकारें ज्याचा स्वभाव प्रिय होता, व ज्याविषयीं मोठी उमेद होती असल्या तरुण मनुष्याने किंचित् अविवेकमात्र केला, त्यामुळें असें झालेंकीं तो अल्पवयांतच मरण पावला.

---

हे धन्य आरोग्या! सकळ सुवर्ण व संपत्ति यांहून तूं श्रेष्ठ आहेस. जीवास तूं मोठा करितोस, तूं त्याच्या शक्तींस शिक्षा ग्रहण करण्याविषयीं, व सद्गुणाची रुची घेण्या विषयीं मोकळ्या करितोस. तूंज्याच्या जवळ आहेस त्याला इच्छा करावयाजोगें दुसरें थोडकेंच असतें, परंतु तूंज्याला कमी आहेस असाजो हतभाग्य त्याला तुझ्या बरोबर सर्वच वस्तु कमी आहेत!

स्टर्नकृत.

# समाधान.

आरोग्य आणि दीर्घायुष्य यांचीं साधारण कारणें ह्लरलीं असतां अ ति मिताहार, मोकळा वायु, अल्पायास उद्योग, अल्प चिंता असीं आहेत.

सरफिलिपसिड्नी कृत.

---

## समाधान.

समाधान खऱ्या व खोट्या प्रकारचें आहे. आपल्यास केवळ रुरवा- स पडूंनये असी स्थिति असली; अन्न, वस्त्र, व दुसरे आवश्यक पदार्थ यांची आपल्यास कमती असली; आपली स्थिति सुधारावयाजोग्या आपल्या मनाच्या व शरीराच्याठायीं शक्ति असल्या, आणि आपलें चांगलें करून घे ण्याविषयीं उद्योगकरून पाहणें कोणत्याही प्रकारें अविवेकास्पद नसलें; तरअ स्याप्रसंगीं समाधान मानून राहणें हें खोटें आहे. वास्तविक अपायांच्या आप ल्यास नेर लागावयासारिख्या ठिकाणीं आपण असावें असेंही पडूं शकेल. आपण दमसर घरांत राहण्याने आपल्या प्रकृतीस विकार करून घेत असों; जो सहज नीट करितां याचा असा एखादा छेद आपल्या वस्त्रास पडला असेल; तर अस्याप्रसंगीं समाधान मानणें हें तरी त्यासारिखेंच खोटें आहे. मनुष्यें ज सीं होतीं तसीच तीं सर्वजणें जगाच्या आरंभापासून समाधान मानून राहिलीं असतीं आणि सहजांत ज्यांच्या परिहार करितां याचा असेजे अपाय त्यांस सहनशीलतेने नमून राहिलीं असतीं,तर ही पृथ्वी रानटीलोकाचें राहयाचें ठिकाण असी अजून पर्यंत असती.

आपल्या शक्तीस व उपायास योग्य असी अवस्था, आणि कोणत्या ही उद्योगाने अथवा चिंतेने ज्यांचा परिहार होऊंनये असे अपायही प्राप्त झा-

लींअसतां सहनशील आणि स्वरी असणें हें खरें समाधान होय. अस्याप्रकार
ऱ्या समाधानावरून सर्वजण आश्चर्य मानितात, आणि जो कोणी सूजनआहे
तो हें समाधान करून घेण्याविषयीं झटतो.

ज्या कोणास काहीं चांगलें प्राप्त झालें असतां तेणेंकरूनजो सहजस
माधान पावत नाहीं त्यास महत्वाकांक्षी ह्मणतात. महत्वाकांक्षी मनुष्यांकडू
न ईश्वराचे व्यवस्थेंत एक उपयोगी परिणाम होतो; परंतु ते स्वतां वस्तुतः सु
खी होत नाहींत, कांतरते कधींच पुरतेपणीं संतुष्ट नाहीं असे असतात. त्यांस
एक वस्तु दिली असतां ते दुसरीची इच्छा करितात; त्यांस कितीही मान प्राप्त
झालातरी ते अधिक इच्छितात. शिकंदराचेवेळीं जी पृथ्वी माहित होती तिचा
बहुतेक भाग त्याने जिंकिल्यानंतर जेव्हां त्याने विचार केला कीं जिंकून घ्याव
यास दुसरे लोक राहिले नाहींत तेव्हां त्यास रडूं आलें. थोर अधिकार, व मो
ठ्या संपत्तीचा संबंध यांत नेहमी अरिष्ट असतें, अतएव अस्वस्थता अस
ती, परंतु प्रापंचिक ज्या चांगल्या वस्तु त्यांच्या परिमित अंशानेजो मनुष्यस
माधान पावलेला असतो तो स्वस्थपणें व निर्भयपणें राहतो. याजकरितां
केवळ सहज समाधान न मानितां, अथवा आपल्याकडून दूर व्हावयाजो
गे अपाय प्राप्तअसतां समाधान मानून नराहतां बहुतकरून मनाची स
माधान वृत्ति ठेवावी हें चांगलें आहे.

---

## सोन्याचीं आंडीं घालणारी हंसी

### कल्पित गोष्ट.

कोणेएका मनुष्यास सुदैवेंकरून एक हंसी मिळाली, ती प्र

तिदिवसीं एक सोन्याचें अंडें घालून त्यास देऊं लागली. परंतु तेणेंकरून त्याचें समाधान होईना, त्याचा लोभ कमी व्हावा तो अधिकच वाढूं लागला. त्यासवाटलेंकीं इच्यामध्यें अपार द्रव्य आहे तें एकदांच प्राप्त व्हावें, व जें एकएक अंड्यापासून प्रतिदिवसीं सावकाशपणें उपजतें त्याची वाट पाहण्याचें जरूर न पडावें ह्मणून त्यानें त्या हंसीस मारून तिचें पोट चिरण्याचा निश्चय केला. मग त्याप्रमाणें त्यानें केलें, तेव्हां त्यास कांहीं नसांपडतां मोठें दुःख व आशाभंग झाला.

## एकामोठ्याराज्याधिकारीपुरुषाचेंअस्करव.

तिसऱ्या जार्जाच्या राज्यांत हेन्रीडन्डास ह्मणून एक मोठा राज्याधिकारी होता. यास फार सत्ता दिली असे ह्मणून बहुतजनास सुखी करण्याचे उपाय याजकडेस असत, असेंअसतांहीहा स्वतां नित्य सुखी नव्हता. सन १७९५ सालाचे शेवटल्यादिवसीं सरजान् सिंक्लेर याच्या दर्शनास येऊन विम्बुल्डनांत याची राहाण्याची जागा होती तेथें सारीरात्र वस्तीस राहिला. दुसरेदिवसीं मोठे पहाटेस तो पाहुणा याडन्डासाचे पुस्तकालयांत गेला, तेथें हा इंडियातील ब्रिटिश मुलकाच्या संरक्षणाकरितां केपअफ्गुड होप जिंकून घेण्याच्या अगत्याविषयीं एक लांबचेलांब कागद वाचीत होता. असाहा अटकला असतां याचा हात हालवून सरजान् बोलिलाकीं, " माझ्या मित्रा स्काटलोकांचे रीतीप्रमाणें मी तुह्मांकडेस आलों आहें. तुह्मास हें नवीन वर्ष शुभदायक होवो, आणि ह्याऋतु करेंकरून बहुतवेळ तुह्मास परत येवो." तेव्हां या राज्याधिकारी पुरुषानें अंमळ थांबून कांहीं उद्वेगानें उत्तर दिलेकीं, मागल्यावर्षापेक्षां हें वर्ष सुखानें जावें असी मीही आशा करितों, मागल्या अवघ्या व

र्यंत एकही दिवस स्फरवाचा गेलासा मला आठवत नाहीं." ज्याच्या अवघ्या आयुष्यांत विजयश्रीची श्रेणी लागलेली, जो राजकीय महत्वाकांक्षेच्या शिखरावर निश्चित उभाराहिलासा दिसे असाही पुरुष हें असें कबूल झाला. मग याने ती कबूल केलेली गोष्ट सरजान् सिंक्लेर मनुष्याच्या इच्छांचे निष्फलतेच्या उदाहरणार्थ वारंवार सांगत असे.

## दरबारींचा उंदीर आणि ग्राम्य उंदीर कल्पितगोष्ट.

एक ग्राम्य उंदीर समाधानवृत्तीने असे, यास दरबारी वाढलेला असा एक याचा पूर्वींचा ओळखी होता, त्याचे भेटीचा एकासमयीं लाभ झाला. तेव्हां आपल्या पाहुण्यास मेजवानी करण्याची या ग्राम्य उंदिरास आवड ह्मणोनयाने खेंपेंत प्राप्त झालेला नामी पनीर व कांहींएक मास असीं त्याच्या पुढें ठेविलीं. तेव्हां जेवण तर घरघुती परंतु आतिथ्यसत्कार अंतःकरणपूर्वक होता. मगते ती संध्याकाळ मौजेने गोष्टींत घालवून विश्रांति घ्यावयास गेले. दुसरेदिवसीं प्रातःकाळीं, तोशहरकरी उंदीर निरोप घेऊनजावा तसें नकरितां त्या आपल्या गांवढेकरी मित्रास आपल्या समागमें येण्याविषयीं प्रीतीने आग्रह करूं लागला, आणि दरबारीं आपण निवडक स्फरवांच्याज्या समृद्धीमध्यें राहत असे तें डौलाच्या भाषणाने सांगूं लागला. नंतर ते समागमे निघाले आणि ते संध्याकाळीं राजगृहीं उशिराने पोंहचले तथापि दुधाची मलई, मांसरस, मिठाया, पार्मिसा एथील पनीर असेजे मातबर मेजवानी होऊन पदार्थउरले होते ते त्यांस मिळाले, मग त्यानी आपले फस्ते एका पराकाष्ठेच्या मिष्टमयांत भिजविले. पण त्यांचें जेवण बहुतसें जालें नाहीं इतक्यांत एका कुलंग्या कु

त्याच्या भुंकण्याने व ओरखडण्याने ते भिउन गेले. पुनः त्यानी आरंभ केला, तंव माजरीच्या मेमाटाने ते भयभीत होउन त्यांस जसाकाय प्राणांत झाला. हें पुरतेपणीं सरलें नाहीं तंव सेवकांची स्वारी त्याखोलीत कोसळली, त्यानीत क्षणींच त्या अवघ्यांस झाडून काढलें. मग त्या ग्राम्य उंदरास बोलायाजोगें धैर्य प्राप्त होतांच तो ह्मणूं लागला. "अरे माझ्या प्रिय मित्रा, या तुझ्या छान दार राहण्यांत भयें, व अरिष्टें इहींकरून जर असें व्यवधान पडत असलें, तर मग माझें जें साधें खाणें, वजी स्वस्थतेची खोप तिकडे मला परतून जाऊं दे; कांतर स्वस्थतेवांचून उत्तम स्करवतें काय ? अथवा काळजांत दुःख असून संम्रृद्धिती काय"?

## भिक्षागृहींचें समाधान.

आह्मी अलीकडेस – या ठिकाणी भिक्षागृहें पाहयास गेलों होतों, तेथील राहणाऱ्यांपैकीं एका मनुष्यामध्यें समाधानाचा व ईश्वरेच्छानुरूप राहण्याचा चमत्कारी कित्ता आह्मास आढळला. मिस्तेस बेरही आपला चुलता व चुलती यांजकडेस स्करयाने वाढली होती. तीं चांगल्या स्थितींत असत, परंतु परिमित आणि विवेकयुक्तरीतीने वागत. तो गृहस्थ असा असेकीं त्याने आपल्या मुलांस एकमेकासीं उल्लासाने भाषण करण्याविषयीं प्रोत्साहन करीत असावें, परंतु कोणी मनुष्य किंवा कुटुंब, किंवा पोशाक, किंवा कोणाचा कोणासीं संकेत यांविषयीं बरें अथवा वाईट असें कांहीं बोलणें बोलायास मना करावें. तो असें बोलत असेकीं या आसल्याविषयांवर भाषण मुलांचेकानी नित्य पडत गेलें ह्मणजे ते विषय त्यांचीं मनें कसीं भेदितात, आणि त्यांच्याठायीं अयोग्यरीतीचा थोरपणा मानायास

तीं कसीं शिकसात हें त्यांच्या आईबापांस समजत नाहीं.

अस्या योग्य मनुष्याच्या हातारवालीं वाढून त्या पुतणीने शेवटीं लग्न केलें. पुढें पंधरा वर्षांच्या स्रुमारांत तिचा चुलता, चुलती, व नवरा असीं मरून गेलीं. याप्रमाणें ती निराश्रित झाली असतांही स्वत्तां उद्योग करून, स्रुरवेंकरून आपला सांभाळ करून आपल्या अनेक इष्टमित्रांत आपली मान्यता रारवून राहिली. याप्रकारें संतोषाने आपल्या आयुष्याचीं दाहा वर्षें घालविलीं असतां शेवटीं एके रात्रीं जवळच्या एका घरापासून तिच्या लहानस्या घरास अग्नि लागला, तेव्हां तिने रवोलीच्या खिडकींतून बाहेर उडी टाकून आपला बचाव केला. पण त्या उडीपासून तिला दुरवापत झाली तिचा असा परिणाम झाला कीं शस्त्रवैद्यास तिचा उजवा हात कापून टाकावा लागला आणि तिचा उजवा पाय तर अगदी कामांतून गेला.

तेव्हां तिचीं इष्टमित्रें तीं कृपाळू होऊन तिजकडेस फार लक्ष ठेवूं लागलीं, व त्यांच्या दातृत्वाने आपला निर्वाह करून घेण्याविषयीं तीने काहीं दिवस कबूल केलें; परंतु एकऱ्याचा धर्म म्हटला म्हणजे तिकडेस अनेक मागणीं असतात असें समजून निराश्रित दीन यांकरितां, लोकांनी केलेली जी तर्तूद तिजपासून आपला चरितार्थ करून घ्यावा असा तिने आपल्या धीटमनाच्या स्वतंत्रतेने निर्धार केला. भिक्षागृहीं जाण्याची गोष्ट तिला भयकारक किंवा लज्जाकारक असी वाटली नाहीं, कां तर तिला असा बोध होऊन गेला होता कीं मनुष्य मान्य अथवा त्याच्या विपरीत होण्याविषयीं, वास्तविक पाहतां, त्याचें आचरणमात्र कारण आहे. सर्व वस्तूंचा जो दाता त्याजविषयीं उपकार स्मरणाने भरलेल्या अंतःकरणेंकरून ती आत्तां तेथें आहे. ती सहनशील, भ

क्किमान् आणि एकसारखी संतोषवृत्ति आहे. ती बाळांस शिकविती, आणि वृद्धांच्या सुखदुःखांचा विभाग घेती. तिचेंजें अनेकप्रकारचें ज्ञान व तिचेंजें मनोहर संभाषण तेणेंकरून तिजपासून सर्वांस आनंद होतो. अश्या तिच्या लक्षणापासून तिचे स्थितीवर महत्वाची शोभा पडती; आणिजीं कोणी तो कारखाना पहावयास जातात तीं त्या भिक्षागृहीं त्या स्वेच्छेने वास करणारणीविषयीं सत्कारयुक्त व सानंदाश्चर्ययुक्त भाव मनांत आणून परत येतात.

## बेडकानी राजाची इच्छाकेली. कल्पितगोष्ट.

असंतुष्ट व चंचळ असीज्या बेडकांची ज्याति, ज्यांस मोकळिकेचा कंटाळा येऊन आणि उलटापालटीची आवड होऊन आह्मास एक राजा द्यावा ह्मणून त्यानी बृहस्पतीजवळ अर्ज केला.

तेव्हां त्यांचा अर्जतर मान्यकरावा आणि त्यापासून त्यांस जितका अल्प अपाय होईल तितका व्हावा ह्मणून त्या सुस्वभावदेवाने त्यांजकडे एक लाकडाचा तुकडा टाकून दिला. तेव्हां प्रथमतर ते त्या नवीन राजाचा मोठा वचक धाकरून त्याजपासून आदरपूर्वक दूर राहूं लागले; परंतु त्यांस त्याचा मिसकीन व शांत स्वभाव कळूं आल्यावरून ते अधिक सलगीने त्याच्याजवळ जाण्याविषयीं हळू हळू अवसान धरूं लागले, शेवटीं त्यास ते अतिशय तुच्छ मानूं लागले. मग अश्या भावाने त्यानी बृहस्पतीजवळ पुनः अर्ज करून दुसरा एक राजा आह्मास द्यावा असी विनंति केली. तेव्हां त्या गर्जना कर्त्याने क्षोभून त्यांच्या करितां एक करकोचा पाठविला. तो आपल्या स्वाधीन तें नवें राज्य करून घेतांच आपले प्रजेस एकामागें एक अत्यंत स्वच्छंदाच्या व बला

त्कारच्या रीतीने खाऊं लागला.

नंतर त्यानी पूर्वीपेक्षां फारच असंतुष्ट होऊन तिसऱ्याने बृहस्पतीज
वळ अर्ज केला. त्याकाळीं तुह्मीज्या अपायाविषयीं माझ्याजवळ गाऱ्हाणें सां
गत्तां तोतुह्मीच अविचारेंकरून आपल्यावर आणून घेतला; त्यास सहनशी
लता धरून आतां नमून राहावें हाचकायतो उपाय, असा त्याने यांचा नि
षेधकरून त्यांस वाटेस लावून दिलें.

---

सृष्टीतील जे वास्तविक लाभ, व समृद्धीचीं जीं स्वरें, ज्यांविषयींच्या
अधिकार अत्यंतश्रेष्ट वश्रीमान् मानकरी आपणास आहे असें ह्मणतात.
तीं सर्व गांवठ्यातील राहणारे भले गृहस्थ, व थाढता व्यापार करणारे अथवा
शेतकी करणारे यांस प्राप्त होतात; आणखी हें विशेषकीं राजाची मर्जी संपा
दण्यांत आमचा कोणी प्रतिस्पर्धी होईल, अथवा दर्बारांतून आमचा कोणी
पाय काढून टाकील, अथवा आह्मी आपल्या थोरव प्रियपदापासून पतन
पावूं असीं वेदनाकारक भयें आणि शंका यांवांचून तीं सर्वस्वरें प्राप्त होता
त. हीं असलीं तुफाने यांच्या डोईवरून उडून जाऊन दुर्गाकृति पर्वत व उंच
देवदारूवृक्ष अस्यांस अपाय करितात. कुयुक्तीने मेळविलेले व गमाविण्यास
रिखे अधिकार यांकडेस नाहींत; यांची कोणी बेअब्रू करीत नाहीं अथवा यांची
कोणी कपटाने खराबी करीत नाहीं. हे कोणाचा हक्क अनीतीने घेण्यास नजा
तां आणि मात्सर्यास्पद महत्वाबरोबर निश्चयेंकरून प्राप्त होणार ज्याविप
त्ति व वैभव व थोरपण त्यांपासून मोकळे होऊन आपल्या परिमित संपत्ती
च्या आनंदाच्या उबेने निर्भय उपभोग करित बसतात. जो कोणी असल्या

स्थितीने समाधान पावत नाहीं, त्याने परलोकींचें सुख प्राप्त व्हाया साठिरचें के लें असल्यास त्याचा शोध करावा, कां तर त्याजकरितां याहून उत्तम एथेंतर खतां ईश्वराच्यानेही सिद्ध करवणार नाहीं.

बिशाप् सेोथकृत.

तात्कालिक व साधारण खर्च करायापुरतें माझ्याजवळ आहे तेणेंकरून मी संतुष्ट आहें; असाधारण प्रसंगास जगांतील अवघें सांठवणही पुरणार नाहीं, आणि आपण संपत्ति उधळत असतां ती आपल्यास कधींतरी पुरते पणी द्वात देईल असें प्रतीक्षण करणें अत्यंत व पराकाष्ठेचें मौर्ख्य होय.

मान्टेगकृत.

समाधान हें एक मोठ्या किमतीचें मोती होय, जो कोणी दहा सहस्र द्रव्यांचा व्यय करून हें मेळवितो, तो शाहणपणाची आणि सुखाची खरेदी करितो

बालगेकृत.

---

# मितव्यय.

द्रव्य मिळविण्याविषयीं उद्योग करावा इतकेंच आपल्यास केवळ अवश्य आहे असें नाहीं तर द्रव्य मिळविलें असतां आपण त्याचा सावधगिरीने, व विचाराने उपयोग करावा हेंही तसेंच आहे. जर आपण फार खपत गेलों आणि वरच्यावर खर्चीत गलों, तर निरुद्योगी असणें त्यापेक्षां उद्योग करणें बरें याशिवाय आणखी काही आपलें चांगलें होणार नाहीं. जर आपल्याकडून फार उद्योग होत नसला, अथवा आपल्यास दुसऱ्या काहीं कारणामुळें थोडकी

प्राप्ति होत असली आणि असें असतांही आपला खर्च मोकळा असला, तरमग अधिकच वाईट अवस्था; कांतरतस्यासमयीं द्रव्य लवकर खपून जाईल व आपल्यास कर्ज होऊन विपत्ति प्राप्त होईल. वास्तविक येत ह्मटलाह्मणजे जसी प्राप्तिअसेल त्यामानानेखर्चअसावा,, परंतु आपल्यास जितकी प्राप्ति होईल तीअवघी आपण कधींही खर्चूंनये. काहींतरी उरवून मागें टाकावें ह्मणजे तें, दुखणें, ह्मातारपण, अथवा काहीं जडजोखीम यामुळें आपल्यास खपवेना असें झालें असतां अनुपपत्ति होऊं देणार नाहीं. कोणी मनुष्य कितिही अल्पमिळवो तथापि त्यांतून त्याने जो प्रयत्न चालेल तों अल्पतरी विपत्तिकाळींच्या आपल्या साह्यार्थ रखून ठेवावें.

आपण कितीही मातबर असलों तथापि योग्य कारणीं आपल्या पैकाचा व्ययकरण्याविषयीं आपण नेहमी काळजी वागवावी. दुष्टपणाच्या अथवा मूर्खपणाच्या कर्मगुकींत पैसा खर्चणे तो उडवून टाकिल्याप्रमाणें अथवा तो पैसा मिळविण्याविषयींचे श्रम आपण न केल्याप्रमाणें होतें. तेश्रम आणि तो पैसा यांस आपण आणिजग मुकलें. उपयोगी पडायासारिख्याअन्नाची नासाडी करणें अथवा काहीं सामान अथवा माल यांचा खराबा करणें यांविषयींही आपण जपावें. जें काहीं उरेल तें तुच्छ कारणीं खर्चणें अथवा तेणेंकरून विकत घेतलेल्या चांगल्या वस्तु नासून टाकणें, त्यापेक्षां तें दया करण्यास योग्य अस्या गरिबांस देणें कितीबरें उत्तम आहे !

---

## मुंगीआणिटोळ. कल्पितगोष्ट.

मुंग्यांचीजमात थंडीच्या ऋतूंत आपल्या धान्याचें संगोपन व र

क्षणकरण्याविषयीं झटून उद्योग करूं लागली. त्या धान्याच्या त्यानीं आपल्या लहान गांवठळ गृहांच्या मार्गासभोंवत्या वायु लाभावयाकरितां रासी केल्या. तेव्हां दैववशात् उन्हाळ्यांतून निभावलेला, व थंडीने व क्षुधेने मरायास टेकलेला असा एक टोळ त्यांच्याजवळ आला, आणि गव्हांच्या अथवा जाडे धान्याच्या एकाकण्याने माझेया अडचणींत माझें साह्य करावें असें त्याने मोठ्या नम्रतेने मागणें केलें. त्याजवरून एके मुंगीने त्यास पुसलें कीं आमच्या सारिखा त्वां कष्ट करून संग्रह केला नाहींस तर उन्हाळ्यांत काळाचा व्यय कसा केलास. तो बोलतो हायहाय! पिणें, गाणें, नाचणें यांतम्या उल्लास, व आनंदपूर्वक काळ घालविला, हिंवाळ्याविषयीं माझ्या मनांत कधीं कल्पनाच आली नाहीं. मुंगीने उत्तर केलें, कीं असें असल्यास माझें तुला सांगणें इतकेंच कीं जे उन्हाळ्यांत पितात, गातात, आणि नाचतात त्यानीं हिंवाळ्यांत भुकेने मरावें.

## कित्येक थोर मनुष्यांची मितव्ययता.

अधिकारेंकरून अत्यंत थोर, असेजे कित्तीएक पुरुष होऊन गले ते मितव्ययतेविषयीं विख्यात असत. शिकंदर बादशाहातर आपल्या एखाद्या कनिष्ठ अधिकाऱ्यांसारिखा साधापोशाक बहुधा करी. रोमचे राज्यांत केटो ह्मणून एक मुख्य अधिकारी होऊन गेला त्यानेतर सुमारें च्याररुपयापेक्षां अधिक किमतीचें उगलें आपल्या आगांत कधीं घातलें नाहीं; आणि त्याणें असें ह्मणत असावें कीं ज्यावस्तूची मला गरज नाहीं तीजरी पैश्यास मिळाली तरी महाग, असें मी मानितों. सार्वभौमराजा आगष्टस् याच्यावेळीं जितकी दुनिया कळली होती त्या अवघे दुनियेचा प्रायः तो धनी असतां आपले स्त्रीने आणि कन्येने शिवलेलीं वस्त्रें पांगरत असे, आणि राजसंबंधहीन मनुष्याच्या

ान्या पेक्षां विशेष अधिक किमतीचाजो नव्हे अशा बिछान्यांत निजे. ज
चा सार्वभौम राजा, आणि ऑस्ट्रिया एथील घराण्याचा मूल पुरुष रोडो
याची असीं साधीं वस्त्रें असत; कीं एक्या दिवसीं तो रोटीवाल्याचे दुकानां
ापल्यास शेकून घ्यावयास शिरला असतां हा कोणी हलका मनुष्य असा
ला, त्यावरून त्यास त्या रोटीवाल्याचे स्त्रीनें धमकावून आपले शेकोटीज
ा बाहेर घालविलें. त्याचा वंशज जो पांचवा च्यार्लस् जर्मनीचा सार्वभौम
आणि स्पेनचा राजा तोही फार साधीं वस्त्रें पांगरत असे. फ्रान्स देशाचा
अकरावा लुईस तो तरी तसेंच करी, त्याचे हिशोबाचे चोपडींत, त्याचे जु
िस नव्या अस्तन्या लावावयास एक कापड एका रुपायाचें, व जोडयास
लावावयास काहींएक रस तीन पैस्यांचा मांडलेला आढळतो. असेंही अस
सर्व थोर राजे असे पुरुष होते कीं त्यानीं योग्य कारणीं मोठा खर्च केल्या
न कधीं अनमान केला नाहीं.

## परिमितव्ययीकुटूंब.

मुलांनीं सर्व वस्तु संभाळून ठेवण्याविषयीं शिकावें. हें त्यानीं आ
ाच उपयोगाकरितां करूं नये, कां तर तेणेंकरून ती स्वार्थबुधी धराव
प्रवर्तील म्हणून संभाळून ठेवणें तें काहीं उपयोगाकरितां ठेवावें. त्यांच्या
ठ जें काहीं असेल त्यांतला अंश त्यानीं आपल्या खेळगड्यांस द्यावा, हें अ
रणें औदार्य होय, परंतु असें न करितां काहीं एक वस्तु त्यानीं कधींही ना
ये. म्या एक कुटुंब पाहिलें तेथें केवळ एकरुती परिमितव्यय होत असे
ाहीं नीच अथवा अरुरवकारक असें नसे. वास्तविक घरजोगावणीनें
ल्या मुळें असें असे कीं बहुत मिळाल्यानें जसी इतर रुरवी असत तसी

तीं मनुष्यें आल्याने रुखी असत. त्या कुटुंबांत बापाने घरीं कशाच्या एका पुडका आणिला, ह्मणजे मोठ्या मुलांनी त्या पुडक्याचरला कागद व सुतळी अग्नींत न टाकितां अथवा फाडून तोडून तुकडे न करितां आपलेआपण नेऊन नीट ठेवावी. कोण्या लहान मुलास कांहींएक खेळ करायास अथवा भोंवरा नाचवायास सुतळीचा तुकडा लागला तर तो तयार असे आणि लहानांनी ती भुईवर टाकून दिली तर जागेच्याजागीं नेऊन ठेवावयास मोठ्यांस सांगावयाची गरज पडत नसे.

## सवारुपयाची किमत.

बालेमैन् तेरावर्षांचा असतां एके मोठे शाळेंत विद्यार्थी होता. हा स्वभावाने चांगला मुलगा असे परंतु याच्या कित्येक सोबत्यांस याजपेक्षां पैक्याची नेमणूक अधिक असे त्यांचा किंचित हेवा केल्यावांचून यास राहवत नसे. मग याने आपल्या बापास पत्र लिहिलें त्याद्वारें याने त्यास त्याप्रकरणीं सुचविण्याविषयीं हिय्या केला. त्याजवळ अमुक एक रकम स्पष्टरीतीने न मागतां माझ्या वर्गांतील बहुत्येक मुलांस गैर खर्च करण्याविषयीं दर आठवड्यास १।- रुपया मिळत असतो असें याने कळविलें.

त्याच्या बापाने कित्येक कारणामुळें याच्या इच्छिल्याप्रमाणें कबूल न करितां अथवा खेदकारकरीतीने यास नकारही न करितां दर आठवड्यांत १।- रुपया खर्चणें ती कोण्याप्रकारची रकम आहे आणि शाळेंतील मुलांस निरुपयोगी पदार्थ घेऊन याचे त्यापेक्षां तो किती मोठमोठे उपयोगाकडे योजितां येईल हें यास कळावें या मुख्य हेतूने उत्तर लिहिलें.

जेथें बराख्यांची फार लागवड होत असती तेथें दरमापास ऐशींपेंड

असीं दोन मापें बरारीं १।। रुपयास मिळतील. दोन मापांचे १६० पौंड रुके अन्न झालें. तें शिजवितांना जी नासाडी होती ती वजाकरून मोजून पाहतां दरमनुष्या स आपल्या दिवसाच्या पोषणार्थ अडीच पौंड पुरेत. याप्रमानाने १।। रुपयाने आठवड्यांत नऊ मनुष्यांचें पोषण होईल. हें गरीबीचें वांचणेंखरें, पण त्याबरो बरयांत थोडेसें मीठ अथवा ताक यांची योजना केल्यानें हजारोजनाचें पोषण होतें.

आपल्या आसपासचे खोपींत राहणारे बहुत्येकजन बारापैश्यांची भा करी दर आठवड्यास उपकार स्मरून घेतील, आणि आपल्या मुलांस बरीच विशेष भाकर मिळाली असें मानितील, म्हणून १।। रुपयाने एका आठवड्या त पांचा गरीब कुटुंबांचें कल्याण होईल.

खेड्यापाड्यांत बहुत खोपा अशा आहेतकीं एकएके खोपींत एकएक मोठें कुटुंब दरसाल २० रुपये भाडें भरून राहतें. त्यास १।। रुपयाने आसल्या तीन खोपांचें एका आठवड्याचें अवघें भाडें फिटून डागडुजी करायासही काहींउरेल.

खेडेगावांतील बायकांचे शाळेंत शिकविण्याकरितां बहुतकरून ऐवज द्यावयाचा तो दर आठवड्यास च्यारपैसे द्यावा लागतो. तेव्हां दर आठवड्यांत १।। रुपयाने १५ मुलें वाचायास व मुलग्या शिवायास शिकतील. शहरांतील शाळेंत तीन महिन्यास २।।। रुपये देतात तेथें वाचायास, लिहायास, हिशोब करायास शि कवून साधारण व्यापार करायाजोगें तयार करितात. त्यास १।। रुपयाने एका आठवड्यांत शाळेंत सहा मुलें ठेवितां येतील व त्यांस पोथ्याही पुरव्यापाडतां येतील.

एका आठवड्यांत १।। रुपयाने इतरांचें बहुत्येक बरें करायाचे हे सर्व मा र्ग होत. आतां तुझें हित व्हावयासारिखी १।। रुपयाची योजना कसी करावी याविषयींमात्र एक दोन युक्ति सांगतों.

झाडें व सिद्धपदार्थांच्या इतिहास संबंधी इतरवस्तु यांचीं रंगीत चित्रें तुला फार आवडतात हें मला ठाऊक आहे. अशाप्रकारच्या कितिएक पोथ्या आतां दरमहिन्यास छापत असतात. त्यांतून १।.रुपयाने दर आठवड्यास कित्येक उत्तम पोथ्या विकत घेतां येतील.

सवारुपयाजर लंडनशहरांत एखाद्याजुन्या पुस्तकांच्या दुकानांत ठेविला तर तुला पांचवर्षेपर्यंत वाचायास पुरून उरत इतके उत्तम प्रतीतले कवितेचे नीरनेरके छापणीचे ग्रंथ एकावर्षांत विकत मिळतील.

तुला एका आठवड्यास १।.रुपया द्यावयास मी अनमान करितोंअसें नाहीं, परंतु जेणेंकरून तुझें व इतरांचें इतकें बरें करितां येईल असा १।.रुपया त्वां तुझ्या शाळेंतील सोबत्याप्रमाणें खाऊ व खेळ घेण्यांत उडवावा हेंमला प्रशस्त वाटत नाहीं.

---

## परोपकारबुद्धि.

प्रत्येक मनुष्यास ज्याची गरज अथवा इच्छा आहे त्या अवघ्याकरितां त्याने प्राय: आपलेंच अवलंबन करावें असा संकेत आहे खरा, तथापि सर्व मनुष्यें अनेकप्रकारच्या सामान्य संबंधानी जडलीं आहेत, याजकरितां त्यानी परस्परांचें बरें इच्छावें, आणि सर्वयोग्यसमयीं परस्परांची सेवा व साह्य करावयास प्रवृत्त व्हावें हें आवश्यक होय.

परस्परांचें बरें इच्छिल्याने आपल्याच सारिखे जे इतरलोक ते स्वतांकरितां जें काहीं करीत असतील तें प्रीतीने पहावें, त्यांसीं स्नेहाचे रीतीने भाषण करावें असें आपल्या मनांत येतें. आपण ज्यांसीं चांगलें भाषण करितों,

त्याजवरून त्यांसही इतरांविषयीं प्रीति धराची असें वाटतें. याप्रकारें मंडळीतून प्रियवृत्ति प्रसृत होती, तेणेंकरून यच्चयावत् मानुषीय सुखाचें मान फार वृद्धिंगत होतें. परंतु असें न करितां जर मनुष्यें परस्परांचें बरें न इच्छितील तर त्यांच्यामध्यें बहुधा रुष्टभाव उत्पन्न होईल आणि कोणास मी सुखी असें वाटणार नाहीं.

या संसारांत बहुत दुःखें आहेत, तीं असीं कीं कोणी कितीही सावध असला तथापि त्यांतून मी पार पडेन असा कोणास भरवसा नाहीं. आपल्यास कदाचित् दुखणें येईल, अथवा काहीं दुखापत होईल; आपले उत्तम चेन फसतील; आपल्यास दारिद्र्य व अनुपपत्ति येदितील. हीं असीं दुःखें कोणी भोगीत असतां, इतरानी आपल्या सामर्थ्यानुरूप जितकें करवेल तितकें त्यांचें समाधान, साह्य व त्यांस पूर्ववत सुखी करावें हें त्यांस उचित होय. यां उपायें करून त्यां दैवहीनांचें अत्यंत किंवा मोठ्या कठिण अवस्थेंत रक्षण होतें; आणि ते इतरजन सुखी होतात, कांतर आपल्याच सारिखीं जीं मनुष्यें अस्यांचीं भोगणीं कमी करण्याचें सामर्थ्य आपल्या आंगीं असणें हें आनंदकारक होय.

ईश्वरानें मनुष्यांस वेगळाले गुणही दिले आहेत. कोणी शरीरानें व बुद्धीनें, बलवान् आहेत, कोणी अल्पबल आहेत. कोणास चुकी करण्याविषयीं अल्प मोह होतो, कोणास फार मोह होतो. कोणास आईबापांपासून संपत्ति, उत्तम शिक्षा असी प्राप्त होतात, कोणास यांतून काहींच प्राप्त होत नाहीं, वेगळाल्या देशांची दैवदशा याप्रमाणें अधिक उणी नसती असें नाहीं, कित्येक ज्ञानेंकरून प्रकाशित आहेत, कित्येक रानटीपणांत बुडाले आहेत. याजकरितां मनुष्यसंबंधानें अथवा देशसंबंधानें पाहतां हेंच आवश्यक कीं आपण स

र्वानी परस्परांविषयीं कळकळ वागवावी, बलवानाने निर्बलाचें साह्य करावें, उत्तमाने अधमास शिक्षादेऊन सुधारावें, मातबरानें गरजवंतास मदत द्यावें, आणि ज्ञान्याने अज्ञानास ज्ञानोपदेश करावा.

यां कार्याकरितां आपण परोपकार बुधीचा उपयोग करावा ह्मणून ती वृत्ति आपल्यास आपल्या सर्व शक्तिमान् उत्पन्न कर्त्याने दिली आहे, आणखी आपल्याविषयीं शास्त्रांत त्याची साक्षात् आज्ञा असी आहे कीं, आपण आपल्या शेजाऱ्यावर प्रीति करावी, गरिबांचें साह्य करावें, मातापिताहीन, पतिहीन जीं त्यांचा शोधसमाचार घ्यावा, व परस्परांस बोध करावा व शिकवावें.

हीं सर्वकर्में आपण विचाराने केलीं पाहिजेत. जर आपल्या दानानी आलस्यास प्रोत्साहन होईल अथवा दुर्गुणाची वृद्धि होउं लागेल तरतीं आरोपणें हें बरें. वास्तविक दुःखभोगणारास आपल्या दानाने निश्चयेंकरून सुख व्हावें व तीं जे कोणी घेतात त्यांचें कल्याण व्हावें, अपाय होऊंनये याविषयीं आपण जपावें. गरजवंत मनुष्य आपलें साह्य आपल्याआपणाच करायास समर्थ होई असल्यारीतीने त्याचें साह्य करणें ही प्रायः सर्वोत्तम रीति. जें आपण देतों तें चांगल्यारीतीने उरवितां येई असें असावें, आणि आपल्यावर जें इतरांचें ऋण असेल तें फेडण्याविषयीं आपल्यास त्या आपल्या देण्याने प्रतिबंध होउंनये याविषयींही आपण जपावें. जें आपलें स्वतांचें नाहीं, अथवा जेणें करून आपलें स्वतांचें कर्ज फेडावयाचें, तेंच जर आपण देऊं लागलों, तरमग आपलें करणें दात्यासारिखें नव्हे, चोरासारिखें, असें लोकांनी ह्मणावें.

---

# जगमित्र हवार्ड.

मानुषीयदुःखें कमी करण्याविषयीं ज्यानें प्रयत्न केल्यावरून कीर्तिमान् झालेला असा एक जान् हवार्ड ह्मणून द्रव्यवान् गृहस्थ इंग्लंडदेशीं होऊन गेला. हा अल्पवयांत असतां जलमार्गानें लिस्बनास जात होता, तेव्हां फ्रेंच्च लोकांनीं यास धरून ब्रेस्ट एथील एके विपत्तिकारक अंधारखणींत टाकिलें; तेथें याला व याच्या सोबत्यांस कितीएक रात्री फरसबंदीवर निजावें लागलें व भुकेनें मरावें असें प्राप्त झालें. यानें ज्या विपत्ति भोगिल्या व त्याप्रसंगीं इतरांस भोगितां पाहिल्या, त्यांचा याच्या मनावर चांगलाच ठसा उठला, आणि हा आपल्या देशीं परत आल्यावर इंग्लिश सर्कारांत यानें असा उद्योग केला कीं त्या प्रकरणीं फिर्याद झाली आणि इंग्लिश बंदिवानांचा विशेष दयेनें संभाळ करण्याविषयीं फ्रेंच्च प्रवृत्त झाले.

नंतर कांहीं वर्षे हा बेड्फर्डजवळ कार्डिंग्टनांतील आपल्या वतनाचे जागीं राहून आसमंतात् सुखाचा फैलावा करूं लागला. यानें आपल्या जमीनीवरील लहान लहान झोपडींत कितीएक योग्य व उद्योगशील असे लोक वसविले व हा त्यांच्या सुखाविषयीं अत्यंत काळजीनें जपूं लागला. यानें शाळा बांधिल्या, तेथें मुलें कुकर वाचायास शिकूं लागलीं, आणि आपल्या उत्पन्नाचा मोठा हिसा धर्मार्थ वांटून हा केवळ परिमित द्रव्यावर आपला निर्वाह करूं लागला. शेवटीं सन १७७३त याचें लक्ष आपल्या प्रांतांतील बंदिशाळांकडेस गेलें. तेसमयीं ज्या बंदिशाळा सर्व ठिकाणीं असत, त्या दुःखाचीं विवरें, जेथें प्रकृति बिगडून जावी, आणि दुर्गुण प्रायः द्विगत व्हावा, त्यास दंड होऊं नये, अस्या त्या यास आढळल्या, त्याजवरून यानें मोठा उद्योग करून आपल्या राहण्याच्या ठिकाणाजवळच्या बंदि

शाळांत याच्यानेकाहीं सुधारणूक झाली. मग विशेष दूरचे बंदिशाळांचे स्थिती विषयीं चौकशी करावयास हा प्रवृत्त झाला. कालेंकरून याने इंग्लंड, स्कातलांड व ऐर्लंड एथील सर्व मोठ्या बंदिशाळा पाहिल्या. जे पुरुष अधिकारावर होते त्यां जवळ बंदिशाळांचे स्थितीचें वर्णन करण्याचें सामर्थ्य याच्या अंगीं असे याजकरितां अपराधांतून मुक्त झालेल्या बंदिवानांपासून कमी दस्तुरी घेणें याविषयीं एक व कैद्यांची प्रकृति नीट राही असें त्यांस ठेवणें याविषयीं एक असे दोन कायदे पार्लमेंट सभेंतून होण्यास हा साधन झाला. असें याने आपल्या देशीं लोकांचें काहींबरें करून आपले परोपकारी प्रयत्न बाहेर विस्तृत करावे असा निर्धार करून १७७५चे सालांत युरोपाच्या इतर देशांत पर्यटनाचा क्रम आरंभिला, तो मागाहून सोळा वर्षांनी याचा काळ झाला तेव्हां संपला. याने युरोपखंडांतील प्रति देशाच्या बंदिशाळा पाहून त्यांचे स्थिती विषयीं मनाचा निर्धार करून त्या सुधारण्याविषयीं त्यात्या ठिकाणच्या राज्यांत आपला प्रयत्न चालविला. हा सर्व ठिकाणीं मितखर्चाने आपला निर्वाह करून अवशिष्ट द्रव्य दुःखितांच्या साह्यार्थ अर्पण करी. आपण देशाटन करीत असतां आपल्या अवलोकनांत येई तें व बंदिशाळांतील उत्तम शिक्षेच्या पद्धतीविषयीं जें यास सुचें तें हा जेव्हांतेव्हां छापून प्रसिद्ध करीत असे. या उपायेंकरून, आणि इतरांस अगत्य पडावयाजोगी जी याची अलौकिक परोपकारबुद्धि तेणेंकरून याने लोकांचें लक्ष्य या प्रकरणीं असें उपयोग होण्याजोगें जडवून दिलें कीं फार सुधारणूक होणें हा त्याचा परिणाम झाला. १७८४शींत झाला असें आढळलें कीं, बंदिशाळांत बंदिवान् ज्या विपत्ति भोगीत होते त्यांचें उपशमन करावें या हेतूने आपल्याकडून सुमारें बेचाळीस हज़ार मैल अथवा भूगोलाचे परिधीचे काहींसें दुप्पट पर्यटन झालें.

भूमध्यसमुद्रालगतच्या सर्वबंदरांत प्लेगनामें एका रोगापासून जीं दुखें उत्पन्न होतात त्यांविषयीं हवार्डानें फार ऐकिलें होतें. त्यांतून दरएक बंदरीं लाझारेटो नामें रोगोपचारगृहासारिखें एक घर असतें, तेथें रोगानें व्याप्त अशा स्थळापासून गलबत आलें, ह्मणजे त्यांतील अवघीं उतारू रोगापासून केवळ निर्मुक्त आहेत असी खात्री करायास्तव बरेच मुदतीपर्यंत कोंडून ठेवितात. हे लाझारेट्टो अत्यंत वाईट बंदिशाळांसारिखे भयंकर असतात, आणि बहुतकरून यांजपासून जितका विशेष रोग व मृत्यु उत्पन्न होत असेल तसें त्याचें निराकरण होत नसेल, यांची स्वतां तपासणी करावी असा हवार्डानें निर्धार केला. आपल्या शिवाय दुसऱ्या कोणाचा जीव विघ्नांत घालायास आपल्यास रजा नाहीं, असें यास वाटून हा सेवकावाचून १७८५त बाहेर पडला. तो फ्रान्सदेशाचे दक्षिणप्रांताचा मार्ग धरून इटलींतून मालटा, झांटी, स्मर्ना, कुस्तंतुनिया एथें गेला. तेव्हां हा कुस्तंतुनिया राजधानींत असतां स्मर्ना एथें रोग उठला आहे असें यास समजलें त्याजवरून लाझारेट्टो एथील अवरोधाचें दुःख आपल्यास प्राप्त व्हावें आणि तेणेंकरून तेथल्या नियमाचा आपल्यास जात्या अनुभव यावा ह्मणून आरोग्याविषयींची खराब याद घेऊन वेनिस एथें जायाकरितां हा मागें परतून स्मिर्नास गेला. स्मिर्नाहून याचें जलमार्गानें गमन होत असतां गलबतावर, मूरलोकांच्या लढाऊ गलबतानें घाला घातला, तेव्हां लढाई होऊन त्यां बर्बरांस हटविलें त्या लढाईंत हवार्ड मोठ्या शौर्यानें लढला. नंतर हा वेनिस एथें अत्यंत संतोषानें लाझारेट्टोमध्यें जाऊन तेथील चालीप्रमाणें तेथें चाळीस दिवस राहिला. याप्रकारें लोकांच्या हिताकरितां यानें आपला जीव जाणून बुजून विघ्नांत घातला. अश्या वृत्तीवरून यास सर्वत्र मान्यता प्राप्त झाल्यावाचून राहिली नाहीं. जर्मनीच्या पादशहास याचेया धैर्ययुक्त परोपकार बुद्धीचें

असें आश्चर्य झालेंकीं हा जेव्हां वियन्ना शहरांतून परत जाऊं लागला, तेव्हां त्याने भेटीविषयीं त्याची प्रार्थना केली आणि याचा पुतळा करून शहरांत प्रसिद्ध ठिकाणी बसवावा म्हणून द्रव्याची वरगणी करावयास आरंभ केला, परंतु जगमित्र हवार्ड जसा भला तसाच संकोचित असे म्हणून याने स्पष्टरीतीने विनंती केल्यावरून याचा सन्मान करण्याविषयींचा तो बेत मागाहून सोडून दिला.

हवार्ड हा १७८९त ग्रीष्मऋतूमध्यें शेवटचें पर्यटन करायास निघून जर्मनी देशांतून सेंटपीटर्सबर्ग व मास्को या शहरांत गेला. सुधारलेल्या जगांतील प्रत्येक ठिकाणींच्या दैवहीन प्राण्यांचीं निवासस्थानें त्यांविषयीं यास जाणूं धर्माधिकारच प्राप्त झाला आहे काय असें मानून सर्व ठिकाणी बंदिशाळा व रोगोपचार गृहें याने पाहण्यास उघडी करून ठेवीत असत. मग हा तुर्की समुद्राचे लगत रुस देशीचीं जीं नवीं संस्थानें तेथें जाऊन कर्सोन एथें राहिला. तेथें एक दुष्टज्वर चालू होता, त्याचा स्पर्शसंचार एके तरुण स्त्रीस प्राप्त होऊन तिला असें वाटलेंकीं हवार्ड हा मला बरी करील म्हणून तिने याचे येण्याची इच्छा केली. तेव्हां पीडितांचे हांकेविषयीं जो सर्वदा सावधान असा तो पुरुष तिचें साह्य करावयास गेला, त्यासमयीं याच्या आंगीं त्याज्वराचा संचार प्रायः त्या स्त्रीपासून होऊन याची त्याज्वरास इतरांसारिखी बळ पोंहचली. मग याला कर्सोनाच्या शेजारींच पुरलें तेथें काहीं वर्षांनंतर आलेक्सांडर पादशाहाने याच्या स्मरणार्थ एक स्तंभ बांधून ठेविला.

## सरफिलिप सिडनी.

सरफिलिप सिडनी हा शौर्यशाली शिपाई व कवी असून त्या काळीं च्यांत अत्यंत गुणाढ्य गृहस्थ असे. तेव्हां नेदर्लंडि एथील झुरफेनचे लढा

ईंत याचे दोन घोडे मेलेअसतां हा तिसऱ्यावर चढत आहे इतक्यांत यास जखम झाली. मग याच्या आंगांतून रक्त वाहत असतां व हा मूर्च्छित असतां यास छावणीत नेलें. लढायींतली जखमी मनुष्यें बहुधा फार तृषाक्रांत होतात, परंतु अशा समयीं पाणी सहजांत सांपडतें असें नाहीं. असेंहीअसतां सरफिलिप याचें तृषेच्या शमनार्थ थोडेंसें पाणी आणिलें. तें तो तोंडीं लावावयास उच्चलीत होता त्या क्षणीं एक जखमी झालेला गरीब शिपाई यास तिकडून नेत होते त्याने तो प्याला उत्कंठित दृष्टीने पाहिला. त्याजवरून त्या उदार सिड्नीने तें पाणी न चाखितां आपल्या मुखापासून तत्क्षणींच काढिलें, आणि तें त्या शिपायास देऊन ह्मटलें कीं तुझी गरज माझ्यापेक्षां अधिक आहे. मग तो सिड्नी त्याच जखमेने केवळ तेहतीस वर्षांचे वयांत मरण पावला; त्याने त्या गरीब शिपायावर कृपा केल्यामुळें त्या काळापासून त्याच्या नावाचें आश्चर्येंकरून स्मरण राहिलें आणि पुढें जनांत जोंपर्यंत उदार कर्माची किंमत समजत आहे तों पर्यंत त्याच्या नावाचा प्रायः कधीं विसर पडणार नाहीं.

## द्रमंड मुख्य कोतवाल.

सुमारें ७५ वर्षांमागें ज्यार्ज द्रमंड ह्मणून एक इडिन्बर्ग शहरचा मुख्य कोतवाल होता, त्याची उपकारी स्वभावाविषयीं आख्या झाली असे. एका दिवसीं वेस्टपोर्ट ह्मणून जी पेंठ तेथून हा शहरांत येत असतां पाहतो तों एक मसण बोळाचा कोणी एका लहानस्या घराच्या दारांतून निघून देवळाच्या परसांत चालला आहे. ती मसण बोळाच्याची मंडळी ह्मणजे फक्त चार जण होते, ते तरी गरीब साधारण भिकाऱ्यावाणी दिसणारे ह्मातारे आहेत, त्यांतून दरएकाने तारीचे दांड्याच्या शेवडास धरिलें आहे, त्यांस मदत करायास कोणीच

नाहीं, आणि एकही बरोबर जाणारा नाहीं असें त्यानें पाहिलें. तेव्हां त्या मुख्यकोतवालास तत्क्षणींच वाटलें कीं ही एका भिकाऱ्याची प्रेतयात्रा असावी, याजकरितां आपण पुढें होऊन त्या म्हाताऱ्यांस म्हणाला, "अहो आतां या मेलेल्या दीनाचें प्रेत कबरींत न्यायाकरितां याच्यामागें जाणारा कोणीच यास मित्र नाहीं, त्यापेक्षां तें खेदकारक कर्म मी स्वतः करितों." असें बोलून त्या प्रेताचे पेटी पुढें तो चालूं लागला. ती किंचित् पुढें चालली नाहींत इतक्यांत त्यांस त्या मुख्य कोतवालाचे ओळखीचे दोन गृहस्थ भेटले, त्यांनी त्यास पुसलें एथें काय करितां? तो म्हणाला कीं मी या दीन अनाश्रित भिकाऱ्यास पुरायास चाललों आहें, यास पुरायास दुसरा कोणीच नाहीं. त्यावरून ते दोघे परतून त्याजबरोबर चालूं लागले. याच प्रमाणें दुसरेही गृहस्थ येऊन मिळत गेले, तेणेंकरून असें झालें कीं कबरेजवळ बरीच मोठी मंडळी जमली. मग तो कृपाळू प्राचीन सरदारासारिख्या काळिजाचा कोतवाल बोलिला कीं मी या म्हाताऱ्याचें डोकें कबरींत ठेवितों. असें बोलून त्यानें त्याप्रमाणें केलें. नंतर त्यास बरे रीतीनें आपल्या देखत पुरविलें. ती क्रिया सिद्धीस गेल्यावर या म्हाताऱ्यास मागें कोणी बायका मुलें आहेत काय असें त्यानें पुसलें. तेव्हां यास बायको आहे ती म्हातारी असून केवळ अनुपपत्तीचे अवस्थेंत आहे असें त्यास समजलें. त्याजवरून तो मुख्य कोतवाल आपल्या सभोंवतें जे होते त्यांस बोलूं लागला कीं "बरें तर, अहो गृहस्थांनो एथें आपली भेट काहीं एके तऱ्हेनेंच झाली, म्हणून त्या अनाश्रित विधवेच्या हितार्थ काहीं प्रतिष्ठित कर्म केल्यावांचून आपणास एकमेकाचा निरोप घेऊन जातां येत नाहीं; आपण प्रत्येकानें अल्पस्वल्प द्यावें, तें तीस अत्यंत हितावह होई अश्या रीतीनें देण्याविषयीं मी स्वतः बंदोबस्त ठेवीन." त्याजवरून स

र्वांनी झडदिशी काहीं ऐवजाची वरगणी करून दिली, त्याची एक बरीच रकम झाली, ती मागाहून त्यागरीब स्त्रीला योग्यरीतीने दिली. नंतर त्या मुख्य कोतवालाने तिला काहीं खटपटीचें काम सांगितलें, तेणेंकरून असें घडलेंकीं लोकांपासून होणाऱ्या उपराळ्यावर नजर ठेवून नराहतां आपला सांभाळ करण्याविषयीं ती समर्थ झाली.

## कोसिअस्को सेनापति.

कोसिअस्को सेनापति ह्मणून एक पोलांड देशीं शूर होऊन गेला, तो परम परोपकारी पुरुष असे. त्याची इच्छा असी झालीकीं सोलोथुओम् एथील पाद्रीस चांगल्या द्राक्षा मद्याच्या काहीं शिस्या पाठवाव्या. परंतु चाकरास लोभ उत्पन्न व्हाया सारिखें करावें हें त्यास न आवडे, ह्मणून त्याने झेल्टनर नामें एक तरुण मनुष्य होता, त्याकडेस ती भेट न्यावयाचें काम सोपिलें आणि आपण ज्या घोड्यावर बहुधा बसत असे तो घोडा घ्यावयास त्यास सांगितलें. झेल्टनर परत आल्यावर सांगूंलागलाकीं सेनापति साहेबानी हा घोडा देतेवेळीं आपली द्व्याची पिशवी जर मला न दिलीतर मी पुनः या घोड्यावर बसणार नाहीं. त्याजवरून कोसिअस्को पुसूं लागला कीं तुझ्या बोलण्याचा भाव काय. तेव्हां तो ह्मणालाकीं मार्गांत कोणी गरीब माणूस टोपीकाढून धर्मार्थ मागूं लागला, ह्मणजे हा घोडा झडकन स्थिर उभा राहतो, त्या मागणारास काहीं दिल्यावांचून हा चालतच नाहीं. माझ्याजवळ तर पैसे नव्हते ह्मणूनत्या घोड्याची समजूत करायास्तव मला काहीं दिल्याचें मिषकरावें लागे.

## टैटस.

टैटस ह्मणून रूमी लोकांचा बादशाहा असे, त्यास आपले प्रजेचें

बरें करावें याचाचून आणखी मोठी होस काहीं नसे. आज आपण आपल्या लोकांस हितावह असें काहीं कर्म केलें नाहीं, अथवा कोणावर काहीं कृपा केली नाहीं असें त्यास एके संध्याकाळीं स्मरण होऊन त्याच्या सभोंवते जे होते त्यांजवळ तो मोठ्यानें बोलला "माझे मित्रहो माझा एक दिवस फुकट गेला."

---

तुझे सोबतीजर तुजवर प्रीति करीत नाहींत, तरहा तुझा दोष. तूंजर ममता करूं लागलास, व स्नेह देवूं लागलास तर त्यांला तुजवर प्रीति केल्यावांचून राहवणार नाहीं. तुझ्या सोबत्यांस असंतोषकारक असेंही कधी कधीं तुला कर्तव्याच्या विचारामुळें करणें जरूर होईल. परंतु तुझी कृपाळू वृत्ति आहे, तूं स्वार्थबुधीपासून दूर आहेस, आपल्या सोबत्यांच्यें सुख वाढवावयास तूं आपले स्वतांचे सोईस मुकण्यास राजी आहेस, असें दृष्टीस पडलें असतां, तुला मित्रांची कधी उणीव पडणार नाहीं. दुसरे तुजवर प्रीति न करीतसे झालेतर तो तुझा दोष, तुझें दुर्दैव असें मानूं नको. सौंदर्यानें अथवा संपत्तीने मित्र मिळत नाहींत. तुझ्या सभोंवतेजे आहेत त्यांची मान्यता दृष्टि व प्रीति आपल्याकडेस ओढून घ्यावी असें तुला वाटत असेल तर तूं आपलें हृदय कृपनें प्रकाशित कर.

दिनचर्याग्रंथ.

---

## मितक्रोध, सहनशीलता आणि क्षमा.

आपल्या सर्व शक्तिमान् उत्पन्न कर्त्यानें आपली प्रकृति असीके

ली आहे कीं आपल्या एकादे वृत्तीस संताप व्हायाजोगें कांहीं असलें ह्मणजे क्रोध अथवा प्रतिकारबुद्धीचें उत्तेजन होतें, आणि आपल्या एकादे वृत्तीस संतोष करायाजोगें कांही असलें ह्मणजे परोपकारबुधीचें आणि कृपेचें उत्तेजन होतें. यास दृष्टांत, वाजवी अथवा प्रमाणिक कर्म आपले दृष्टीस पडलें ह्मणजे आपली सत्यवृत्ति संतुष्ट होती आणि आपल्याठायीं प्रीतिभाव उत्पन्न होतो; परंतु जर केवळ दुष्ट गैरवाजवी कर्म आपले दृष्टीस पडलें; तर आपली सत्यवृत्ति संतापून आपल्याठायीं क्रोध उत्पन्न होतो. याप्रमाणें पाहातां आपल्या प्रकृतीच्याठायीं क्रोधवृत्तीपासून कांहीं उपयोग व्हावा ह्मणून ती योजिली आहे. जें कांहीं खोटें अथवा संतापकारक त्याचा प्रतिबंध करण्याविषयींही क्रोधवृत्ति कल्पिली आहे. आपल्यास मान्य जीं मनुष्यें आणि जे पदार्थ त्यांस अनुलक्षून निष्ठुरता अथवा अपकार अथवा अपमान हीं कोणाचे हातून झालीं असतां आपल्यास त्याचा क्रोध न आला तर मग आपण केवळ दयेस पात्र मात्र होऊं.

योग्यप्रसंगीं क्रोध करणें हें जरी उचित आहे तथापि क्रोध विवेकाचे मर्यादेंत असावा, त्याजपासून अविचारी कर्में, प्रकट उगविण्याचीं कामें होऊं न येत, असें आपल्यास आग्रहें करून सांगितलें आहे. तूं रागें भर पण पाप करूं नको; रागें भरलेला राहून सूर्य अस्तास जाऊं देऊं नको असें जें सेंटपालाचें ह्मणणें त्याचा अर्थ असा कीं क्रोध येण्यासारिख्या समयीं क्रोध आला तर त्या क्रोधाचे आवेशानें तुजपासून किमपि दुष्ट कर्म घडूं नये, आणि तो समय जातांच त्वां आपल्या मनांतून क्रोध लवकर दूर करावा. कोणाविषयीं क्रोधास उत्तेजन देणें, अथवा तो नित्य मनांत पोसणें हें प्रायः दूषित धरिलें, आहे. क्रोध ज्यां कर्मास प्रवृत्त करितो तीं बहुधा मनुष्यांच्या साधारण स्वभावास अनुसरून

असतात. अडाणी गांवढेकर तीक्ष्ण आणि स्त्रोट्याने डरकण्या फोडून अथवा हाताफळीस येउन आपला क्रोध प्रगट करितात. सभ्य गृहस्थ तर हाताफळीस येणें अथवा डरकणें हें वर्जितो, परंतु गोडबोलून छद्मे काढितो, अथवा नाखुश करणारास मारक शब्दानी भांडायास बोलावितो. यांतून क्रोध प्रगट करण्याचा प्रकार एकही चांगला आहे काय? नाहीं. दोन्ही एकसारिखेच खोटे आहेत. उपरोधिक भाषण बोलणें, छद्मे काढणें, व हाताफळीस येणें यांपासून काहीं चांगलें होत नाहीं. पहिलें जें काहीं असेल त्यापेक्षां हटकून वाईट होतें. वाजवी वेरीतीने क्रोध आला असतां तो बाहेर दाखविण्याचा वास्तविक प्रकार असा आहे कीं त्यासमयीं आपल्या मनांत जे भाव आले असतील ते शांत आणि स्थिर भाषणाने बोलावे असें कीं त्यापासून आणखी वाईट न होतां सुधारणूक व्हावी.

चिरडखोड, तापट, खुनशी, अस्या स्वभावापेक्षां शांत, व सहनशील स्वभावाची उठावणी करणें यांत आपल्या सुखाची मोठी गोष्ट आहे. या जगताची असी रचना आहे कीं आपल्या आयुष्याच्या प्रतिदिवसीं आपल्यास संताप विणाऱ्या बहुत गोष्टी घडतात; आणि आपण जर प्रतिगोष्टीवरून चिवचिवूं आणि जळफळूं लागलों, तर आपण आपल्या अंतरीं वास्तविकपणें दुःखित होऊं, आणि आपल्या सभोंवतीं जीं त्यां सर्वांच्या असुखास कारण होउं. चांगला स्वभाव अथवा नम्रतेने व क्षांतीने सहन करण्याची शक्ति अंगीं असणें हा एक अत्यंत उत्तम गुण होय.

अपकार लक्षांत न आणितां लागलीच क्षमा करणें हें प्रियकर स्वभावाचें लक्षण होय. आपण सर्वजण चुकीस पात्र आहों, याजकरितां परस्पर

अपराधांची आपण परस्परांस सहज क्षमा करावी, ह्मणून आपल्यास आग्रह करून सांगितलें आहे. मुळचें जें थाकडें तें रूड उगविण्याने दुप्पट होतें परंतु तें क्षमाकेल्याने अगदी नाहींसें होऊन जातें. यासाधनाने आपला शत्रु असेल तो आपल्यास मित्र करितां येतो; आपली चाल पाहून इतरांस द्रव येतो, तेही कृपाळू होऊन सहजगत्या पुनः मित्रभाव धरितात; याप्रकारें शुभेच्छा व शांति पृथ्वीवर विस्तृत होतात.

---

## सोक्रेटीस.

सोक्रेटीस त्या युनानी पंडिताची प्रकृति स्वभावतः मोठी रागीट असतां तिचें आकलन करण्याचें जें सामर्थ्य यास प्राप्त झालें होतें त्याजवरून हा विख्यात झाला असे. याने आपले मित्रांस असें सांगून ठेविलें असेकीं मी क्रोधाच्या स्वाधीन होण्याविषयीं सिद्ध झालों असें तुमचे दृष्टीस पडलें ह्मणजे तुह्मी मला सूचवीत जा. त्याप्रमाणें प्रथम सूचना केली ह्मणजे याने आपला शब्द मृदु करून उगेंच राहवें. आपला आपल्या दासावर परम क्षोभ झाला असें यास अटळल्यावरून हा त्यास बोलतो, "जर मी रागांत नसतों तर तुला मारितों." याचे कानशिलांत बुकी बसली, तेव्हां हा समाधान मानून राहिला, आणि किंचित् हांसून इतकेंमात्र बोलिलाकीं, "डोकीस टोप केव्हां घालावाहें न समजणें हें दुर्दैव होय." सोक्रेटीस यास मार्गांत एक थोर ग्रहस्थ भेटला, तेव्हां याने त्यास नमन केलें, परंतु त्या ग्रहस्थाने तिकडेस लक्ष दिलें नाहीं. तें याचे सोबतीस जे याचे मित्र होते ते पाहून या तत्वज्ञ पुरुषास बोलूं लागले कीं. "त्या मनुष्याने अनादर केल्यावरून आह्मास इतका संताप झाला, कीं त्याचें उसणें उगवा

वें असें आह्मास वाटलें." तेव्हां याने शांतपणाने उत्तर केलें कीं "अहो तुमच्यापेक्षां वाईट असीं वस्त्रें कोण्हीएक आपल्या शरीरावर घालून तुह्मास मार्गांत भेटला, तरती वाईट वस्त्रें तुमच्या क्रोधास कारण व्हावीं काय. जर न व्हावीं असें आहे तर मग तुमच्यापेक्षां वाईट असीं वस्त्रें ज्याने आपल्या मनास लेवविलीं आहेत अस्या मनुष्यावर संतप्त होण्याविषयीं तुह्मास कोणतें कारण असावें?"

परंतु सोक्रेटीसाला घरांतून बाहेर न जातां आपली सहनशीलता पुरतेपणी आचरून दाखवायास जागा होती. झान्टिपी ह्मणून याची बायको होती, तीची हुजतखोर, क्रोधिष्ट, साहसी प्रकृति असे तीने याची सहनशीलता मोठ्या कठिण कसोटीस लावून पाहिली. तीचेसारिखी प्रकोपीच छांदिष्ट व वाईट स्वभावांची दुसरी कोणी स्त्री झालीच नाहीं. तिच्यापासून कोणत्या एका अपशब्दाचा अथवा अपकाराचा याने अनुभव घेतला नाहीं असें घडलेंच नाहीं. एकदां ती याजवर इतकी रागें भरली कीं तिने उघड्या मार्गांत याचा डगला फाडून टाकिला. त्याजवरून याचे मित्र यास बोलूं लागले कीं "असलें वर्तन तर असह्य होय, तिला तुह्मी बळकट ठोक द्यावा." तेव्हां हा ह्मणतो "होय मग एक चांगलाच तमाशा होईल, ती आणि मी असीं एकमेकास बुकलूं लागलों ह्मणजे तुह्मी आपआपल्या पाक्षीने आह्मां उभयतांतून एकमेकास लढण्याविषयीं उत्तेजन देऊन ह्मणत जाल, भलेभले सोक्रेटीस चांगलें हाणलें; इतक्यांत दुसरा ह्मणेल वाहवा झान्टिपी चांगलें मारिलें." एका समयीं आवेशाने जितकी निर्भर्त्सना रुचली तितकी सर्व तिने तोंडांतून बाहेर काढिल्यावर हा बाहेर निघून दारापुढें बसला. मग याच्या त्या सौम्य व उदासीन वृत्तीवरून तरती अधिकच खवळली, आणि तिच्या कोपाचा अतिशय होऊन ती जिन्यावरून धांवत वर गेली, आणि एक मळक

ट पाण्याचें पात्र होतें तें याच्या डोकीवर रिकामें केलें. त्याजवरून हा हांसलामात्र आणि बोलिला "कीं इतकी गर्जना झाली तेव्हां वृष्टि झाली पाहिजे खरी."

## सुस्वभावाचें एक अलौकिक प्रतीक.

जिनिवा एथील आबारेट ह्मणून एक तत्वज्ञ पुरुष होता, त्याजविषयीं असें सांगतात कीं त्याची वृत्ति कधीं क्षोभानें पावलीच नाहीं. त्याच्या घरीं एक स्त्री तीस वर्षे चाकरीस होती, तीनें त्यास कधीं रागें भरतां पाहिलें नाहीं. यास कसोटीस लावून पाहवें असें कितीएक जणांच्या मनांत आल्यावरून तूं त्यास क्रोध आणण्याविषयीं उद्योग करसील तर तुला अमुक द्रव्याची रकम मिळेल असें त्या स्त्रीस त्यांनी कबूल केलें; तें तिनें मान्य केलें. आपला बिछाना चांगल्या रीतीनें केलेला असावा ह्मणून यास फारच आवडत असे, हें असें तिनें जाणून नेमले त्या दिवसीं तो बिछाना करण्याविषयीं दुर्लक्ष्य केलें. तें पाहून आबारेटानें दुसरे दिवसीं प्रातःकाळीं तिलानें वर्तमान सांगितलें. तेव्हां तिनें उत्तर दिल्हें कीं मी बिछाना करावयास विसरलें, आणखी कांहीं ती बोलिली नाहीं. पुनः त्याच दिवसीं संध्याकाळीं तिनें तो बिछाना करण्याविषयीं आळस केला तेव्हां दुसऱ्या दिवसीं तो पंडित पहिल्याच्यासारिखेंच बोलला. त्याजवरून तिनें पूर्वीपेक्षां विशेष शांतपणानें कांहीं निमित्त सांगितलें. तिसरे दिवसीं तो तिला ह्मणाला त्वां अजून माझा बिछाना केला नाहींस, बिछाना करण्यानें तुला श्रम होतात असें कदाचित् अढळलें असेल ह्मणून त्या विषयीं त्वां कांहीं निश्चय केला आहेस असें दिसण्यांत येतें, पण इतकेंही असून ती कांहीं मोठी गोष्ट आहे असें नाहीं; कां तर तो जसा बिछाना आहे त्या तऱ्याची मलाही सवई लागत चालली आहे". तेव्हां ती त्याच्या पायीं पडून त्याजवळ सर्व कबूल झाली.

## क्षांतीने एकत्र ठेविलेलें कुटुंब.

एक असा लेख आहे कीं चिनचा पादशाह आपल्या राज्यांतून गमन करीत असतां साहजिक एका घरीं जेवण्याचा त्यास प्रसंग आला. तेथला धनी, त्याच्या बायका, लेंकरें, सुना, नातुडें, चाकर अशा सर्वांच्या ठायीं पूर्ण शांति आहेत तीं एकोप्याने रहात आहेत असें दृष्टीस पडल्यावरून पादशाह आश्चर्याने चकित झाला. मग इतकीं व असीं तऱ्हेतऱ्हेचीं मनुष्यें असतां या सर्वांच्या ठायीं शांति राहण्याविषयीं तुह्मी कोणत्या उपायांची योजना केली आहे तें मला सांगावें ह्मणून त्याने त्या घरधन्यास विनंती केली. तेव्हां त्या वृद्ध पुरुषाने शिशाची लेखणी काढून हे तीन शब्द लिहिले "क्षांति, क्षांति, क्षांति,"

## अपकाऱ्यावर उपकार.

ज्ञान आणि अनाचार यांच्यासमयीं इटली देशामध्यें फ्लारेन्झा एथें एक मनुष्य कोणे एकासीं हाडवैर धरून त्याचे जपणीस बसला, याचे शरीराच्या बांधा बळकट असे ह्मणून याने त्यास दुखापती होई असा मार देऊन त्याचे डोळे काढून टाकिले. तो आंधळा व अन्न मिळवायास असमर्थ असा होऊन एका मठांत जाऊन तेथें आपल्या हातून घडायासारिखीं जीं धर्मकृत्यें तत्परायण झाला. मग त्याची दृष्टि हरण करणारा असा हा पुरुष काहीं वर्षांनंतर दुःखकारक रोगाने पीडित होऊन पडला. तेव्हां यास बरें होण्याकरितां त्याच मठांत घेऊन जाणें आवश्यक झालें. त्याकाळीं याच्या अंतःकरणापासून यास भय प्राप्त झालें कीं ज्याज्याचे डोळे काढून टाकिले तो आतां त्या अपकाराचा सूड उगवायाकरितां माझे डोळे काढून टाकील. परंतु तसें न करितां या रोगी मनुष्याच्या दुखण्यांत याच्याजवळ हाजीर राहाण्याविषयीं त्या अंधळ्याने आपल्या मुख्याजवळ आज्ञा

मागितली. जसीकाय एकादि केवळ मोठी गोष्ट ओढंगली आहे अस्या साक्षेपाने तें कृपादान त्याने मागितलें. मग त्यास रजा मिळाल्यावर तो या दुखणेकराच्या सेवेस सर्वभावें लागला, त्याने अवघी रात्र याचे बिछान्याजवळ जागत बसावें, याच्या दुखाचें उपशमन होऊन हा लवकर बरा व्हावा ह्मणून आपल्या हातून जितकें होई तितकें दिवसभर करीत असावें. या उपायें करून रोगाचें निरसन झालें. तेव्हां पूर्वीं मी एव्हड्या क्रूरतेने ज्यासीं वर्तलों होतों त्याने मुख्यत्वें करून मला वांचविल्याबद्दल त्याचें मजवर ऋण झालें असें या रोग्यास आढळल्यावरून याच्याठायीं काय भाव उत्पन्न झाले असतील ते आपल्यास सहज कल्पित्तां येतील.

## समुद्रांतील एक आकस्मिक प्रसंग.

मित्रांची एक धार्मिक मंडळी असती, त्या मंडळींतील लोकांस कोणे समयीं क्केकर असें ह्मणतात. ते कधीं लढाई करीत नाहींत, अथवा कोणत्याही प्रकारचा त्यांजवर बलात्कार केला असतां ते त्याचा कधीं प्रतिकार करीत नाहींत, यामुळें ते इतर मनुष्यांपासून भिन्न असे मानिले आहेत. असें झालें कीं दुसऱ्या चार्लसाच्या राज्यांत, एक इंग्लिश सावकारी गलबत लंडनाहून वेनीसपर्यंत व्यापारास जात असतां त्यावर मुख्य मालिम क्केकर होता. रामसलरिंग ह्मणून जो दुयम होता तोही त्याच क्केकरमताचा असे, पण बाकीचे चार नावाडी लोक होते, ते साधारण ख्रिस्ती होते. तें गलबत वेनीसची एक सफर करून परत येत असतां तुर्कीचांच्यांनी धरिलें. तेव्हां जेथें बंदिवानास खुला मादारवळ विकावयाची टेव त्यां तुर्कांस पडली होती असें जें आफ्रिकाखंड तेथें तें गलबत न्यावयाकरितां त्या गलबतावर ते दहा असामी आले. दुसरे

दिवसीं रात्रीस त्या तुर्कांचा सर्दार कित्येक आपल्या माणसांसुद्धां खालच्या मजल्यावर निजला असतां रामस लर्डिंगाने बाकीच्या माणसांस सांगितलें कीं पाउस फार पडतो तुह्मी आंत आस्त्रा धरावा असी वेगळाल्या कोठडींत जाण्याविषयीं त्याने एकामागें एकास सांगून सर्वांची समजूत केली. मग सर्वांस निद्रित पाहून त्याने त्यांचीं हत्यारें गोळा करून एके जागीं ठेउन आपल्या माणसांस सांगितलें कीं "आतां हे तुर्क आपल्या हुकमतेंत पुरतेपणीं आले, परंतु यांतून कोणा एकास आपण दुखवूं नये, मेजोर्कास पोंहचूं तों पर्यंत यांस असेंच खालतें ठेवावें." मेजोर्का हें स्पानियार्ड लोकांचें बेट, याजकरितां तेथें गेलों असतां आपण निर्भय राहूं आणि तेथून इंग्लंडास आपल्यास लवकर परत जातां येईल असा त्याने अजमास केला.

पहाटेस एक तुर्क खोलीचे दाराजवळ आला, त्याला मजल्यावर जाउं दिलें, तेव्हां तें गलबत पुनः इंग्लिश नावाडी लोकांच्या हातीं सांपडलें, आणि तें मेजोर्कापासून फार दूरही नाहीं असें पाहून त्यास मोठें आश्चर्य वाटलें. मग त्याने खालीं जाउन तें वर्तमान दुसऱ्यांस सांगितलें, त्याजवरून ते केवळ भांबावून गेले. तेव्हां त्यांच्या डोळ्यांत अश्रु येउन ते विनंती करूं लागले कीं आह्मास विकून स्पानियार्डांजवळ देऊं नका, ते मोठे निर्दय धनी असें आह्मास माहीत आहे. त्याजवरून नौकाधीशाने व त्याचे दुय्यमाने त्यांस वचन दिलें कीं तुह्मी तुमच्या जीवाविषयीं व मोकळेपणाविषयीं निर्भय राहावें. मग जों पर्यंत मेजोर्काचे बंदरांत गलबत होतें तों पर्यंत त्यांस लपवून ठेवण्याविषयीं त्यानी बंदोबस्त केला. असा कृपाळूपणा पाहून त्या तुर्कांस मोठा आनंद झाला, कारण त्यानी इंग्लिशांसी वर्तण्याचा जो बेत केला होता त्याजहून हा प्रकार केवळ भिन्न झाला.

तें गलबत मेजोर्काचे बंदरीं असतां त्याजवर एका दुसऱ्या इंग्लिश गलबताचा नौकाधीश आला, त्याचा त्यांनी विश्वास धरून त्यास तें गुह्य सांगून त्याजवळ ते असें बोलिले कीं आह्मी त्यां तुर्कबंदिवानास विकणार नाहींत, आह्मास सोय पडल्यास आफ्रिकेच्या कांठीं एका ठिकाणीं उतरूं. तेव्हां त्या अनोळखी गृहस्थानें त्यांच्या औदार्यास हांसून त्यांस सांगितलें कीं तुह्मास दर एक तुर्काच्या दोन सहस्त्र सुवर्ण मुद्रा मिळतील. त्याजवरून त्यांनी उत्तर केलें कीं हें अवघें बेट आह्मास मिळत असलें तरी यांस आह्मी विकणार नाहीं. नंतर त्या भेटीस आलेल्या गृहस्थानें आपलें वचन एकीकडेस ठेवून त्या गुह्यगोष्टीचा बोभाट केला. त्याजवरून त्यां तुर्कांस धरावें असा निश्चय त्या स्पानियार्डांत ठरला. मग हा असा बेत झाला आहे असें त्यां दोघां कैकरांनीं ऐकून तत्क्षणींच शीड हाकारिलें आणि पाठलाग करणारांच्या हातून त्यांस त्या बंदिवानाच्या सात्याने निघून जातां आलें. तेव्हां त्यां बंदिवानास सोडून देण्याविषयीं कोणता मार्ग धरावा याचा कांहीं निश्चय न होतां व ख्रिस्ती लोकांच्या कोणत्याही देशीं त्यांस उतरूं नये अश्या निश्चयेंकरून ते नऊ दिवसपर्यंत भूमध्यसमुद्रांत परिभ्रमण करीत होते. एकासमयीं त्या गलबताची हुकमत आपल्याकडेस घेण्याविषयीं त्यां तुर्कांनी उद्योग केला परंतु नौकाधीशानें आणि दुयमानें त्यांस निमूट दाबिलें. मग ते इंग्लिश नावाडी लोक आपल्या मुख्यांजवळ कुरकुरून बोलूं लागले कीं आपण आह्मास अरिष्टांत घालायासारिखें केलें आहे आणि आमच्यापेक्षां यां तुर्कांच्या जीवांची तुह्मी अधिक काळजी वागवितां. तस्यांत कोणी दुसरे तुर्कांचे त्या गलबतास पुनः पकडतील असें भय साराचवेळ लागलें असे. असें असतांही रक्तपात आणि मनुष्यास गुलाम करण्याबद्दलचा दोष टाळण्याविषयींचा नों

काधीशाच्या व दुयमाचा जो निर्धार तो तें धरून राहिले. शेवटीं ते बार्वरीचे किनाऱ्याजवळ आले, तेव्हां विचार करूं लागले कीं यां तुर्कांस किनाऱ्यावर कसें उतरावें. यांस त्याकामाकरितां होडी द्यावी तर तिकडूनही भय, कांतर ते शस्त्रें घेऊन त्याच होडींत परतून गलबत घेतील. बरें त्यांस कित्येक नावाडी लोकांबरोबर पाठविलें तर ते त्यां लोकांवर उठावणी करून त्यांस समुद्रांत टाकितील. जर त्याच्या दोन टोळ्या करून एका मागें एक पाठविली तर पहिली जी उतरेल ती गावांतील लोकांस उठवून मागाहून होडी गेली असतां त्या होडीवर घाला घालील. शेवटीं लर्टिंग दोन मनुष्यें आणि एक मुलगा मदतीस घेऊन त्यां अवघ्यांस एकदम काठीं नेण्यास पुढें झाला; त्या योजनेस नौकाधीशानें आपलें अनुमत दिल्यावरून काहीं एक जोखीम होऊं न देतां तें कार्य सिद्धीस नेलें. मग ते किनाऱ्यावर उतरल्यावर त्यांच्या ठायीं त्यांस उदारपणानें धरणाराविषयीं इतका स्नेहभाव उत्पन्न झाला कीं ते त्यांस आपल्या बरोबर शेजारच्या गावीं जाण्याकरितां विनवूं लागले, आणि तेथें आम्ही तुम्हासीं औदार्यानें वर्तूं ह्मणून त्यानीं आपलें वचन दिलें. परंतु आपण लवकर परत जावें हीच शाहणपणाची गोष्ट असें लर्टिंगास वाटलें.

मग अनुकूल वायू लागून तें गलबत लवकर इंग्लंडास आलें, तेथें त्यां तुर्कांस धरिल्याची गोष्ट पूर्वीच कळली होती. त्यां केवकरांच्या क्षांतियुक्त आचारावरून इतका विशेष चमत्कार वाटला होता कीं अलौकिक कर्म करण्याविषयीं समर्थ असे जे ते पुरुष त्यांस पहावयास स्वतः राजा व ड्यूक अफ् योर्क, व कित्येक मानकरी हे ग्रीनिच एथें त्या गलबतावर आले. त्या मजकुराविषयीं मेजोर्का एथील इंग्लिश व्यापारी यांचें अनुमत पडलें होतें तसेंच प्रायः राजाचें पडलें.

तो रामसू लर्डिगास बोलिला कीं तुह्मी त्यां तुर्कांस मारुयाज यव्ह आणा याचें हो तें, तेव्हां त्या दुयमाने इतकेंच नम्र उत्तर केलें कीं " त्यानी आपल्या स्वदेशीं असावें हें बरें असें मला वाटलें."

## युबर्टोची गोष्ट.

भूमध्य समुद्राचे काठचें जिनोआ शहर हें पूर्वी लक्ष्यांत ठेवायाजोगें व्यापाराचें असे. तेथील राज्य प्रायः मानकरी लोकांची मंडळी करीत असे. कोणाए कासमयीं त्यां मानकऱ्यांचा अधिकार जाऊन लोकानी निवडून नेमिलेल्या पुरुषांचा जो गट त्याचे हातून काहींएक काळ त्या नगराची व्यवस्था होऊं लागली. या लोकसत्ताक राज्यांत प्रमुख मनुष्य युबर्टो असे. हा मूळचा गरीब असतां आपल्या बुद्धीने व उद्योगाने वाढून अत्यंत संभावित व्यापाऱ्यांतला एक व्यापारी झाला होता.

शेवटीं त्या मानकऱ्यांनी निकराचा प्रयत्न करून तें लोक सत्ताक राज्य मोडून काढलें, आणि आपल्यास अधिकारावरून काढण्याकरितां पुढें काहीं उद्योग न व्हावा ह्मणून त्यानी आपला विजय होतांच निष्ठुरता आरंभिली. मग युबर्टोला फितूर ह्मणून धरिल्यावर त्या मानकऱ्यानी इतकेंच ठरविलें कीं हा सर्वकाळ बाहेर राही असें यास जिनोआचे पार करावें आणि याची सर्व मिळकत हरण करावी. असें केलें, यांत आह्मी यासी फार सौम्यरीतीने वागलों असें त्यांस वाटलें. मग हा ठराव याने ऐकावा ह्मणून याजला आदोर्नो जो नवीन मुख्य न्यायाधीश त्याच्या सन्मुख आणिला. तो मानकरी केवळ उदार भावावांचून न व्हता परंतु माझें उंच पद होय अस्या समजुतीने गर्विष्ट होऊन, नुकत्याच कर करी झाल्या होत्या त्यामुळें संतप्त झालेला होता. तो युबर्टोवर क्षोभायमान

होऊन धिक्कार पूर्वक वाणीने तो ठराव बोलून गेला कीं तूं – तूं – नीच कारागिराचा लेंक, तूं मानकऱ्यांस तुडवायाचा हिय्या केलास – ज्या शून्यातून निघाला होतास त्यांतच पुनः तुझें संकोचन व्हावें – इतकेंच त्यांचे दयेने तुजवर ठरलें आहे.

सुबर्दो त्या कचेरीस सन्मानाने नमन करून आदोर्नोला बोलिला कीं आपण हें भाषण बोलिलां याविषयीं पुढें कदाचित् आपल्यास पश्चात्ताप करायासारिखें कारण प्राप्त होईल. नंतर याने नेपल्सा देशाकडेस गलबत हकारिलें. तेथें कित्येक व्यापाऱ्यांवर याचें ऋण होतें असें दैवगत्या घडलें. मग त्यांजवर जें कर्ज निघत होतें तें त्यानी याला तत्क्षणीं दिलें. तो आपल्या संपत्तीचा स्वल्प अवशेष घेऊन हा आर्किपिलेगो एथें वेनीस संस्थाना खालील एका बेटांत जाऊन राहिला. तेथें आपल्या उद्योगाने व व्यवहार कौशल्याने पुनः लवकरच संपत्तीस चढला.

हा व्यापाऱ्यां सारिखा कित्येक दुसऱ्या स्थळीं जाई व कोण्या समयीं त्यूनिस शहरींही जाई. त्या शहराचें त्याकाळीं वेनिसच्या संस्थाना बरावर सख्य असे, परंतु दुसरीं जीं इटालिचीं संस्थाने त्यांतील बहुत्येकासीं, आणि विशेषेंकरून जिनोआसीं वैर असे. त्यूनिसांत मुसलमान लोक रहात, तेथें लढाईंत जे ख्रिस्ती सांपडतील त्यां सर्वांस गुलाम करावें असा परिपाठ असे. या स्थळींचा कोणी एक मुख्य मनुष्य नगराबाहेरील जागेंतल्या आपल्या घरीं राहत होता, त्याचे भेटीस सुबर्दो जात असतां याने एक तरुण ख्रिस्ती गुलाम घिड्यांरक्षां खपतांना पाहिला, त्याचें तें स्वरूप पाहून याच्या ठायीं करुणा उत्पन्न झाली. आपल्या नाजूक शरीराच्या बांध्यास केवळ दुःसह असीजी मेहनत तेणेंकरून तो अल्पवयी पुरुष श्रमी झालासा दिसला. तो काम करितां मध्येंमध्यें पावड्याच्या दांड्यावर आपलें आंग टेकीत आहे, तस्यांत त्याच्या हृदयांतून उश्वास बाहेर पडत आहे, आणि गालावर अश्रु

उतरले आहेत अशा अवस्थेंत तो होता. त्यास युबरोंनें इटाली भाषेंत हरकतांच तो स्वकीय भाषेचा ध्वनी त्या अल्पवयी पुरुषानें उत्कंठेनें श्रवण केला. नंतर प्रीतीचे थोडकेसे शब्द बोलतांच आदोर्नो ह्मणून जिनोआच्या जो मुख्य न्यायाधीश त्याचा च हा लेंक असें त्यापासून युबरोंनें लवकर समजून घेतलें. हा देश पार केलेल्या पारीतर त्या वर्तमानावरून चमत्कार पावला परंतु आपलें आकलन करून त्वरेनें चालता झाला.

नंतर आदोर्नोचे पुत्रास धरून आणणारा जो त्यांच्या सर्दार त्यास युबरोंनें लवकर शोधून काढून पुसलें कीं तुह्मी त्या अल्पवयी पुरुषाविषयीं किती निष्क्रय द्रव्याची उमेद धरिली आहे. तेव्हां यास असें विदित झालें कीं तो कोणी भारदारीचा मनुष्य असें त्या त्यांच्यास ठाऊक आहे, याजकरितां ते सुमारें ५००० रुपये घेतील. तो ऐवज युबरोंनें तत्क्षणीच देऊन एक गडी व सुंदर वस्त्रांचा पोशाक बरोबर घेऊन त्या अल्पवयी पुरुषाजवळ परत येऊन त्यास सांगितलें कीं तूं मुक्त झालास. मग हा आपल्या हातानें त्या उमेदवार गृहस्थाच्या पायांतल्या विड्या काढायास, व त्याचा पोशाक पालटून त्यास नवीन वस्त्रें घालायास सहाय झाला. त्या आदोर्नोला तर तें सर्व स्वप्न असें वाटलें आणि मी आतां वस्तुतः गुलाम नाहीं असी पहिल्यानें त्याची समजूत बहुधा होईचना, परंतु युबरोंनें त्यास आपल्या बिन्हाडीं नेऊन मिजाला करावयास योग्य अस्या सर्वप्रीतीनें त्यासीं वर्तून त्याची खात्री केली. पुढें योग्य समय आल्यावर वाउदार व्यापाऱ्यानें त्या अल्पवयी आदोर्नोला इटलीस एक गलबत जाणार होतें त्यांत बसवून जिनोआपर्यंत खर्च निभावया पुरते पैसे देऊन सांगितलें कीं "माझ्या प्रिय अल्पवयी मित्रा, तूं आपल्या आईबापाजवळ जाण्याविषयीं उत्कंठित झाला अससील असी जर कल्पना आली नसती तर म्या तुला

एथें बहुत दिवस मोठ्या आनंदाने राहवून घेतलें असतें. जळमार्गाकरितां या बेगमीचा रुपाकरून स्वीकारकर, आणि हें पत्र तुझ्या बापास दे. तुझें कल्याणअसो. मी तर तुला लवकर विसरणार नाहीं, आणि मला वाटतें कीं तूंही मलालवकर विसरणार नाहींस." मग त्या तरण्या गृहस्थाने मी फार आभारी झालों असें त्या आपल्या उपकार कर्त्यास बहुतवेळ बोलून दाखविलें आणि ते परस्परें आश्रुयुक्त होऊन परस्परांस आलिंगन देऊन निघून गेले.

इकडे आदोर्नोव त्याची स्त्री यानीं असें मानिलें होतें कीं आमचा पुत्र ज्या गलबतांत होता तें समुद्रांत फुटून बुडालें, आणि तो मेला ह्मणोन बहुत दिवस त्याची आशा सोडिली होती. असें असतां तो जेव्हां पुढें येऊन त्यांचे दृष्टीस पडला त्याकाळीं त्यांच्या शोकाचा पालट होऊन त्यांचा जीव जाग्यावर नाहीं असा झाला. त्यानी पास आपल्या हाताची कव घातली व त्यांस काहींवेळ बोलवेनासें झालें. मग त्यांची ती व्याकुलता किंचित् शमतांच, याला धरून बंदिवान कसें केलें व गुलाम कसें केलें तें या मुलाने त्यांस सांगितलें. तेव्हां आदोर्नो ह्मणाला तुझ्या मुक्तिरूप अमूल्य उपकाराविषयीं मी कोणाचा ऋणी झालों आहे? त्याजवरून हा पुत्र बोलिला "हें पत्र आपल्यास सांगेल." तें पत्र आदोर्नोनें उघडून वाचिलें तें असें.

"तुह्मीज्याची हेलना केली त्याविषयीं तुह्मी एका दिवसीं पश्चात्ताप पावाल ह्मणून ज्या एक्यानीच कारागिराच्या मुलाने तुह्मास सांगितलें होतें, त्यास तें भविष्यवाक्य सिद्धीस गेलें असें पाहून समाधान झालें आहे. कांतर अरे गर्विष्ठमानकऱ्या तुझ्या एकुलत्या पुत्रास दास्यापासून मुक्तकरणारा कोण ह्मणसील तर तो देशपार केलेला पुबर्री असें जाण.

मग तें पत्र आदोर्नोनें सोडून देऊन आपल्या हाताने आपलें मुख झांक

लें. इकडे याचा पुत्र पुबरेंचे सद्गुण, आणि आपण त्याजपासून अनुभविलेली जी केवळ पित्यासारिखी कृपा यांचा विस्तारकरून सांगूंलागला. नंतर जें ऋण झालें त्यावर खेका मारितां येत नाहीं ह्मणून आपला प्रयत्न चालेतोंपर्यंत त्याची फेड करावीअसाया आडोर्नेनें निश्चयकरून पुबरेंविर जोठराव झाला होता तोरद्द करण्याविषयीं जिनोआचे मानकऱ्यांस वळवावयाचा उद्योग चालविला. तेव्हां कालेंकरून त्यांच्या वृत्ति शांत झाल्या होत्या, त्यामुळें यानेजें मागितलें तें यास त्यांनी दिलें. मग तुह्मी पुनः जिनोआचे नगरकरी झालां असें वर्तमान पुबरेंला निवेदन करण्याविषयींचा आनंद यास लवकरच प्राप्त झाला. याने त्या पत्रांत आपल्या पुत्राची रक्षा केल्याविषयीं जो आपला उपकारिपणा तो प्रकटकरून पुबरेंचे वर्तणुकीचा थोरपणा उच्चारून त्याचे मित्रत्वाविषयीं विनंती केली. नंतर पुबरेंनें लौकरच आपल्या जन्मनगरींत येऊन सर्वांपासून सन्मान पावून त्याचा उपभोग करीत असतां त्यानें आपल्या आयुष्याचे बाकी राहिलेले दिवस क्रमिले.

## टोबीकाकावमाशी.

“ माझाकाका टोबी हा उपद्रवाविषयीं सहनशील मनुष्य असे. मर्दीबाहेर काढण्याचा योग्यप्रसंग येई तेव्हां याच्या आंगांत तिची उणीव होती यामुळें अथवा काहीं जडत्वामुळें अथवा आपल्या बुद्धीचे मंदतेमुळें तो तसा होता असें नाहीं. तो शांत सौम्यच स्वभावाचा होता, त्याच्याठायीं वैरभाव असूं नये असें अवघें मीतिकररीतीनें मिळून गेलें होतें. माशीवर सूड उगवावयास देखील माझा चुलता टोबी याचें मन होत नसे. एका दिवशीं भोजनसमयीं अवघावेळ एक मोठें वाडलेले माशीनें त्याच्या नाका भोंवतें गुणगुणून त्यास निष्ठुरतेनें पीडा केली. नंतर ती त्याचे जवळजवळ उडत असतां बहुतवेळ उद्योग करून तिला शेवटीं धरू

न तो ह्मणाला कीं "जा मी तुला दुखविणार नाहीं." मग ती माशी आपल्या हातीं असतां आपल्या खुर्चीवरून उठून व खोलीच्या आडवा जाऊन माझा चुलता तीवी बोलिला कीं, "मी तुझे डोईचा एक केशही दुखविणार नाहीं." नंतर त्याने जाळीची खिडकी वर उचलून ह्मटलें "जा तूं गरीब दुःखित प्राण्या तूं चालती हो, मी तुला काय ह्मणून दुखवूं? तुला आणि मला धारण करावयास हें जग निश्चयें करून विशाल आहे." असें बोलत असतां त्याने तिला सुटून जाण्याकरितां आपली मूठ उघडली.

---

आपल्या मनांतून सर्व दुष्ट व सूड उगवायाच्या कल्पना काढून टाक. जर तुझा सूड उगवला नसला तर तुला सांप्रतकाळीं दुःख होईल; उगवला असला तर पुढें अधिक होईल. आपल्या स्वभावाचें जें विष तें आपल्याच ठायीं योजिणारा असा जो द्वेषी व सूड उगविणार मनुष्य त्याजहून अधिक स्वपीडक दुसरा कोणी नाहीं. अस्या अवस्थेंत तुझ्या क्रोधावरून सूर्य अस्तास जाऊं देऊं नको ह्मणून ख्रिस्तीमताची आज्ञा आहे, आणि पुटार्क हा ग्रंथकर्ता सांगतो कीं या आज्ञेचा जसा अक्षरशः अर्थ आहे तसें पैथागोरी पंथी आचरण करीत. ते जर कोण्या समयीं क्रोधाने दुर्भाषण बोलिले तर सूर्यास्त होण्याच्या पूर्वीं ते एकमेकास हात देत, आणि त्या बरोबर सर्व विषाद सोडून देत. याप्रमाणें परस्परें पूर्ववत् स्नेह करून आपल्या मित्रांस सोडून जात.

मेसन कृत.

डायोजेनीस यास एका माणसाने विचारिलें कीं "आपल्या शत्रूचा सूड उगविण्याविषयीं मी कोणता मार्ग धरूं. त्या तत्वज्ञान्याने उत्तर केलें कीं तूं चांगला मनुष्य हो."

क्षमा करणें यांत काहीं असी दिव्यरीति आहेकीं हीज्या अपराध्याने तु
झ्याठायीं उत्पन्न केली त्यास आलिंगावयास सिद्ध व्हावेंसें तुला वाटेल.

लायटरकृत.

जोकोणी इतरांस क्षमाकरीत नाहीं, तो आपण ज्यापुलावरून जाणार
त्यासच मोडून टाकितो; कांतर आपली क्षमा व्हावी असी प्रत्येक मनुष्यास ग
रज आहे.

लार्डहर्बर्टकृत.

माझा असा नियम आहे कीं कोणाएकाच्या अंतःकरणीं दुष्टत्व नसतां त्या
पासूनअपराध घडलातर त्यासी पुनः स्नेहकरणें मी सहज कबूल करितों, परंतु दुष्ट-
त्वअसतां घडला असी माझी खात्री झालीतर मी माझ्याच हिताकरितां सूडउगवि
ण्याचे अवघे योग तसेच जाऊं देतों. माझे शत्रूंची व्यक्ति विसरावयास जितकें माझा
ने होईल तितकें मी करितों आणि त्यांच्याबद्दल माझ्या मित्रांचाजो विशेष आनंद
कारक आकार तो स्मरणांत आणितों. या नियमापासून जो स्वस्थपणाचा अंश म्या प्रा
प्तकरून घेतला तो काहीं अल्प नव्हे असी माझी खात्री झाली आहे.

जोन्स्तोनकृत.

हरकोण्या निष्कपट मनुष्याच्या अंतःकरणास अत्यंत गहन कळकळवा
टायासारिख्या दोन गोष्टी आहेत, त्या अश्याकीं, ज्यांस आपण अपकार केलेत्यां
पासून सुस्वभाव व उदारकर्मे होतात, आणिज्यांवर आपण फार कृपा व ममता
केली त्यांपासून कुस्वभाव, व दुष्टवर्तणूक घडती. प्रथमजे सांगितले त्यानी द्वेष
केलाअसतां तो सहन करावयास आपल्यास काहींतरी सबब काढितां येती, कां
तर त्या द्वेषास आपण आपल्यासपात्रकरून घेतलें असतें परंतु त्यांची प्रीति

आपल्यास सहन करवत नाहीं; तीआपल्यास अगदी भांबावून घहरघून रा

सीडरुत.

---

## सौम्यता.

सौम्यवर्त्तणुकीने बहुत्येक प्रसंगीं बहुतकरून आपल्यास मान मिळ
चा, आणि आपले अर्थ प्राप्त करून घेण्याचा संभव असतो, तसा कठोर अथ
गर्विष्ट अथवा धमकावणीचे चालीने होत नाहीं. याचें कारण असें आहे कीं अ
ल्याच सारिखीं जीं इतर मनुष्यें त्यांसीं बलात्कार करून आपण काहींकरून
घ्यायास पाहूं लागलों ह्मणजे त्यांच्याठायीं प्रतिकार वृत्तीची उठावणी अवश्य
रितों. त्यांस संकटकारक वाटायासारिखें असें करायास सांगितलें असतां आ
डत नाहीं. असे आज्ञेमुळें त्यांमध्यें अभिमानाचा उदय होतो, आणि मानण्यापे
नकार करायास ते विशेष प्रवृत्त होतात. जर आज्ञा मानणें प्राप्तच झालें तर ते जु
माने मानितात आणि जें करायाचें तें जितकें वाईट करवेल तितकें वाईट करिता
अथवा जो हुकूम करितो त्याजवर आपला सूड उगवा याकरितां त्यास नापसंत
टे असे तऱ्हेने करितात. जर असें न करितां आपण सौम्य उपाय करून पाहूं लाग
नर आपल्याकडून दुसऱ्या मनुष्याच्या अभिमानास दुखापत होत नाहीं अथ
त्याच्याठायीं काहीं इतर प्रतिकार वृत्तीची उठावणी होत नाहीं; मग आपल्यास जें
येतें तो चांगले आवडीने करितो ह्मणून तें पसंत रीतीने होतें.

---

## वायु, सूर्य आणि वाटसरू. कल्पित गोष्ट.

एकासमयीं उत्तर वायु आणि सूर्य यांजमध्यें आपआपल्या पराक्र

ऱ्या थोरपणाविषयीं वाद उत्पन्न झाला; तेव्हां वारसरूवरून घोंगडी लवकर कोणाच्याने काढवेल याविषयीं आपलें बळ त्यावारसरूवर अजमासून पहावें असें त्यांत ठरलें.

उत्तर वायूने आरंभ केला, व तीक्ष्ण व पिटून लावणारी असी दृष्टि समागमे घेऊन अति थंड अस्या झपाट्याने वाहूं लागला. परंतु हें व दुसरें जें काहीं याच्याने व्हावयाचें तें याने केलें असतां त्यामनुष्याने आपली घोंगडी टाकून द्यावी तर तसें नकरितां जितकी घट्ट आपल्या अंगासीं लपेटवेल तितकी लपेटावी असें त्यास भासझालें. नंतर सूर्य आला, त्यानें जीं दाटपाण्याचीं ढगें होतीं त्यांस फोडलें आणि बाहेर पडून आकाशांतील शीत तुषारांस एकीकडेस घालवून पावसाने झोडपलेला असा तो बापुडा वाटसरू त्याच्या डोकीवर आपले उष्ण किरण फेंकले. मग त्या मनुष्याने उष्णतेने म्लान होऊन आणि तीं सोसावयास असमर्थ असा होऊन, प्रथम आपली भारी घोंगडी काढून टाकली, नंतर तो जवळचे राईंत छायेच्या आश्रयास पळून जाता झाला.

## जोसेफ्‌होल्ट व अपराधी ठरलेले कैदी.

ब्रिटनांत अन्याय केल्यावरून न्यूसौथ वेलस्‌ एथें घालवून दिलेले जे मनुष्य त्यांच्या पायांत बिड्या घालून त्यांस तेथील स्वतंत्रपणें वसाहत करणारांच्या शेतांत खपावें लागतें. त्यांस त्यांच्या कामाबद्दल खाणें मात्र मिळतें आणि आळसी व अव्यवस्थित असे ते आढळले असतां त्यांचे पाठीवर फटके मारण्याचा दंड त्यांस नेहमी होतो.

कित्येक वर्षांवर फाक्स म्हणून एक धारेकरी याने आपल्या जमीनींत खपणारे जे कैदी त्यांची देखरेख करावयास जोसेफ होल्ट यास नेमिलें. हा चांगल्या विचाराचा व बराच परोपकार बुद्धीचा मनुष्य असे. याने फमचीचें भय

न दाखविता दुसऱ्या काहीं चांगल्या उपायाने त्या माणसांस वर्तवून पहाण्याचा निश्चय केला. मग हा त्यांचे, पूर्वीपेक्षां अमल चांगलें पोटास घालूं लागला. त्यांच्या नेमलेल्या कामापेक्षां त्यानी अधिक केलें असतां त्या अवघ्याचा याने त्यांस पैका द्यावा, आणि याजपासून कोणी काहीं चोरलें तर याने त्यांस एकत्र बोलवून सांगावें कीं. "तुह्मांमध्यें कोणी चोर आहे, तो सांपडेतोंपर्यंत मी तुमचा खेरीज मुशाहिरा बंद करीन. याजकरितां तो चोर शोधून काढिला असतां तुमचें हित आहे. यास्तव तुमच्याकडूनच त्याचा शोध लागावा आणि त्यास दंड व्हावा, कां तर कोण्या मनुष्यास फटके बसावे हें मी इच्छित नाहीं. त्याज वरून याजची आहे, आणि होतू हा आपल्यासीं चांगलेपणीं वर्तायास इच्छितो असें त्यां केद्यांचे दृष्टीस पडलें, ह्मणून ते आपल्या आपणांत चोराचा शोध लावून त्यास दंड करूं लागले. या उपायेंकरून चोरी व दुसऱ्या सर्व प्रकारची अयोग्य वर्तणूक त्यां केद्यांचे टोळींतून नाहीं असी झाली. मग त्यांच्यामध्यें कमचीचें अति अल्पही काम पडलें नाहीं. असले अवस्थेंत मनुष्य जसे स्वस्थ व सुखी असावयाचे तसेते अवघेजण असते झाले.

## सिसिलीचा व नेपल्सचा राजा आल्फोन्सो.

अधुनिक काळींजे अत्यंत भाग्यवान् राजे होऊन गेले त्यांतला एक होता, हा असा बहुधा याच्या सौम्य व परोपकारी स्वभावावरून झाला. हा एकट्या आरगोनच्या राजा असतां याचा आपल्या प्रजांच्या प्रेमावर सर्वभावें विश्वास असे, आणि त्यांमध्यें डौलावांचून आणि रखवालदारांवांचून हिंडत असे. कोणी यास सूचविलें कीं अस्या प्रकारें करून तुह्मी आपल्यास अरिष्टांत पाडून घेतां, तेव्हां हा ह्मणाला "बापास आपल्या मुलांमध्यें कशाचेंही भय नाहीं." याचा भाव असा कीं मी

लोकांस कुटुंबासारिखें मानितों व मी या कुटुंबाचा बाप आहें. एक लहानसें तारूं त्याजवरील खलाशी व कित्येक शिपाई यांसुद्धां बुडायास टेंकलें असें पाहून त्यांच्या रक्षणार्थ जावयास हा एका होडींत उडी घालून बोलला. "यांची विपत्ति पाहावी त्यापेक्षां त्या विपत्तीचें विभागी व्हावें हें मला बरें वाटतें." हा अपराध्यांस क्षमा करण्याविषयीं केवळ सिद्ध असे. याजवर कित्येक मानकऱ्यांनीं कट केला होता, त्यांचीं नांवें ज्यांत होतीं असा एक दस्तऐवज याच्या हातांत पडतांच यानें त्यांत पाहिल्यावांचून तोतत्क्षणींच फाडून त्याचे तुकडे केले. जे चांगले ते नीतीनें आपल्या स्वाधीन करून घेतां येतात आणि जे वाईट ते दयेनें जिंकिले जातात, असें याचें प्रमाण वाक्य असे.

सिसिली सुद्धां नेपल्सचें राज्य यास ठेवून पूर्वींचा राज्यकर्ता गत झाला, परंतु यास त्या देशांत आपली स्थापना करून घेण्याच्यापूर्वीं एक्या प्रतिस्पर्ध्यासीं भांडावें लागलें. त्या भांडणांत याच्या शस्त्रांनीं जितकें व्हायाचें तितकें याच्या कृपाळु स्वभावानें झालें. गाईटा म्हणून जें मोठें शहर तें तर यास केवळ याच्या उदारत्वाच्या कृत्यानेंच मिळालें. याचे शत्रु यासीं विरुद्ध होऊन तें शहर धरून बसले होते आणि तेथील राहणारांस उपोषणामुळें मोठें दुःखप्रास झालें होतें. अन्न कांहीं अधिक वेळ पुरावें म्हणून किल्ल्याच्या रखवालदार शिपायांनीं म्हातारीं माणसें, बायका, व मुलें, यां सर्वांस बाहेर टाकलें. त्यां सर्वांस शहरांत परत घालवून देण्याचें सामर्थ्य आल्फोन्सोच्या ठायीं होतें, तसें केल्यानें तें शहर तितकें लवकर याच्या स्वाधीन व्हावें असें जरूर झालें असतें, आणि तसें करायास याचे सर्दारांची सल्ला पडली. परंतु जो दुःखाचा परिणाम होणार त्याचा विचार करतांना तें यास सहन होईना. तेव्हां हा म्हणाला कीं हे माझ्यासारिखे बहुतजीव आहेत यां इतक्यांचा बचाव मी शंभर

गाईरापेक्षां अधिक मानितों." मग याने त्यांस आपल्या सैन्यामधून जाऊं दि
तेव्हां याची ही वर्त्तणूक वेडी असें ऐकून एक मोठ्याने बोलूं लागले, परंतु या
करणें परोपकारपर इतकेंच केवळ नव्हेतर शाहाणपणाचें असें थोडक्यांतच
द झालें. कांतर याच्या औदार्यावरून शहरवाल्यांस द्रव येऊन नंतर लवकर
तेआपलेखुशीने यास शरण आले.

आपण नेपलसूचा राजा अशीआपली संस्था करण्याचा आल्फोन्सो
चा उद्योग सन १८४२त सिद्ध झाला; त्या वेळापासून पुढें २६वर्षांनी याचा काल
ईतोंपर्यंत यास इटलीचा अत्यंत प्रतापी व वगदार राजा असें मानीत असत. इति
हासांत महात्मा आल्फान्सो यानावेंकरून हा प्रसिद्ध आहे.

---

## दुसऱ्याचे मालाविषयीं स्वानुभविकपणा.+

बहुधा सर्वलोकांजवळ काहींतरी वस्तु असतात. त्यांस ते किमतदार असें जा
णून त्या आपल्या उपयोगार्थ आपल्याजवळ ठेवूं इच्छितात. मुलांजवळ त्यांचीं खेळ
णीं, पोथ्या व कोठेकोठे त्यांस काहीं घ्यावयास दिलेले थोडेसेपैसे असीं असतात. ए
खाद्या मनुष्याजवळ फार पैका असतो; त्याच्याजवळ घर सामानासुद्धां असतें;
त्याच्याजवळ जमीन असती. जें काहीं कोणी न्यायाने मेळविलें तें त्याचा माल त्याज
वर दुसऱ्याची सत्ता नाहीं. जर कोणी मुलगा दुसऱ्याचीं खेळणीं अथवा काहीं दुसरी
वस्तु त्याचे इच्छे विरुद्ध घेईल, तर त्याने चोरीचा अपराध केला असें होतें. याचप्र
माणें जो मनुष्य दुसऱ्याचा पैका अथवा काहीं दुसरी वस्तु घेईल तर त्याने प्रसिद्ध
चोरीचा अपराध केला असें होतें. जो माल आपला नाहीं तो घेणें यांत अपराध क
स्याने होतो? तर त्याचें कारण प्राय: असें आहे कीं ज्याचा माल हरण होतो तो तेणें

+ ह्मणजे इतरांचे मालाची हानि करूंनये असें आपलेंच मन आपल्यास सांगतें.

करून दुःखित होतो. त्याने स्वतांजें कष्ट करून नीतीने मेळविलें असेल त्यासच कदाचित् तो मुकतो. याजकरित्तां त्याचे कष्ट व्यर्थ होतात, आणि ज्याने कांहीं कष्ट केले नसतील तो मिळविणारा होतो. ह्मणून जें कांहीं आपलें नाहीं तें कोणीही कदापि घेऊं नये ही थोर गोष्ट सर्वांस विचारणीय होय. आपण श्रम करावे त्यापासून आपल्यास प्राप्ति व्हावी ह्मणून प्रायः मनुष्यें उद्योग करितात. आपण जें मिळविलें त्यांतून बहुत्येक आपल्यापासून अनीतीने हरण होतें असें त्यांस जर आढळलें तर त्यांची श्रम करण्याविषयीं इच्छा उणी होती; दुसरेही उदास होतात; मग जगांत सुख ह्मणून उणें होतें. याजकरित्तां आपण आपल्या शेजाऱ्याच्या मालाची निगा ठेवावी हें उचित होय. आपण त्याच्या अत्यंत अल्प कण, अथवा भाकरीचा चुरा देखील घेऊं नये.

एखाद्या मुलास पहिल्याने कदाचित् अन्यरीतीने वाटेल. याने आपली नव्हे असी कांहीं वस्तु आपल्या हातीं लागायासारिखी पाहिली ह्मणजे यास वाटतें कीं ती वस्तु घेतली असत्तां तें कर्म किती आनंदकारक होईल. तर आपली कांहीं वस्तु दुसऱ्या मुलाने अथवा मुलीने अस्याच प्रकारें घेतली असतां यास कसें वाटेल, असा याने विचार करावा. तसें झालें असतां मज वर मोठा अन्याय घडला असें त्यास वाटेल किं नाहीं? आणि त्या चोराविषयीं तो फार वाईट कल्पील कीं नाहीं? याप्रकारें आपला नाहीं असा माल जो कोणी घेतो तो त्याच्या मालकाचा अन्याय करितो; तसेंच तो चोरासारिखा धिक्कारास पात्र होतो.

आणखी असें आहे दुसऱ्याचा माल घेणें हें उघडकीस आलें असतां दंडास पात्र होतें. जो चोरी करायास सवकला त्यास असें मानायाची सवई लागती कीं उघडीक न होतां मी पार पडेन आणि मला दंड होणार नाहीं. परंतु याविषयीं

याच्याने कृतनिश्चय कदापि होचत नाहीं. अपराध्यांस ज्याविषयीं कधीं कल्प नाहीं नसती अस्यारीतीने अपराधांची उघडीक प्रतिदिवसीं होतआहे. याकरितां जें आपलें नाहीं तें घेउन कोणीही कदापि बहुतकाल नांदत नाहीं. भलाई जी आहे तीच सर्वोत्कृष्ट शाहाणपण असें परिणामी सर्वदां आढळतें.

---

## चोरट्याचिमण्याचीगोष्ट.

एके खिडकीच्या वरल्या कोनांत एका लहान चिमणीने सुंदर कोटें करून त्यांतून बाहेर व आंत जायास त्याला एक दार ठेविलें होतें. त्या लहान चिमणीने तें मोठ्या मेहनतीने केलें याकरितां खऱ्या विचाराने पाहातां तें तिचा माल, तें दुसऱ्या कोण्या पाखराचें नाहीं, कां तर तें करायास दुसऱ्या कोणत्या पाखराने काहीं श्रम केले नव्हते. ती लहान चिमणी घरांतून बाहेर गेली होती तेवेळीं तिच्या घरांत झडकन शिरावें असें एका दुष्टस्वभावाच्या चिमण्याने मनांत आणिलें. ती लहान चिमणी घरीं आली तेव्हां आपली जागा चिमण्याने आरोपिली आहे असें तीस आढळलें. याने त्या गवाक्षांतून डोकावून तिला जलालीकरून रोंचिलें आणि तिला हा तीच्या घरांत काहीं केल्या जाऊं देईना. ती लहान चिमणी तर सौम्य पक्षी, तिचीव त्याचिमण्याची जोडी जमेना असें तीस आढळल्यावरून असें वाटतें कीं तिने आपल्या कितिएक मित्रांकडेस जाऊन आपली हकीकत जाहीर केली; कां तर थोड्याच्यावेळांतच कित्येक लहान लहान चिमण्या त्या ठिकाणीं येताना दिसल्या, जस्या कायतूं निघून जा असी त्याचिमण्याची समजूत करण्याच्या उद्योगास आल्या. परंतु असें होतअसतां आंत शिरणाराने आपलें तें स्थान धरून राहून त्यांसर्वजणींसीं विरुक्ष करून आपला सहज बचाव केला. मगत्या मागें जा

उन, एकएकजण आपले चोंचींत थोडा चिखल घेऊन परतल्या आणि त्यांनीं त्या कोट्याचें दार बुजावयाचा उद्योग आरंभिला. तेणेंकरून चारा व वायु यांच्या अनुपत्तीमुळें तो चिमणा लवकर मरण पावला असी त्याचे सोदेगिरीची व बलात्काराची त्यास शिक्षा मिळाली.

## मिलन् एथील द्वारपाळ.

जें काहीं कोण्हाएकाचें आहे तें तो आपले स्वेच्छेने सोडी तोंपर्यंत अथवा नीतिशास्त्रावरून ठराव होऊन तें दंडाबद्दल जाई तों पर्यंत तें सर्वदां त्याचेंच आहे. याजकरितां दुसऱ्या कोणापासून काहीं वस्तु हारवली आणि तीजर आपल्यास सांपडली, तर ती आपली नाहीं, ज्यापासून ती वस्तु हारवली असेल तो सांपडला असतां त्यास ती परत देणें आपल्यास जरूर आहे.

मिलन् एथें एके उतार घरीं कोणीएक गरीब मनुष्य दाराचे रखवालीवर असतां त्यास एक दोनशें क्रोन् ह्मणजे पांचशें रुपयांची थैली सांपडली, तेव्हां ती आपल्यासाठीं ठेवून घ्यावी असें त्याने मनांत आणावें तर तसें नकरितां ती मला सांपडली आहे असी जाहीर खबर शहरच्या हरकाऱ्याकडून देविली. तेव्हां ज्या ग्रहस्थापासून ती थैली सांपडली होती त्याने त्या द्वारपाळाजवळ येऊन ती थैली माझी असा पुरावा केला, त्यावरून ती त्यास परत मिळाली. मग ज्यास ती सांपडली होती त्याचा तो आभारी होऊन त्यागरिबास पन्नास रुपये देऊं लागला. त्याजवरून तो द्वारपाळ ह्मणाला कीं माझें जें कर्तव्य तेंच म्या केलें, व इनामाची इच्छा ठेविली नाहीं. तेव्हां पंचवीस रुपये घ्यावे ह्मणून त्या ग्रहस्थाने त्यास विनंती केली. मग तो त्याचे अर्धे देऊं लागला, परंतु मला जें करावयास उचित तें मात्र म्या केलें याजकरितां काहींच स्वीकारूं नये असा तो कृतनिश्चय आ

ढळला. तेव्हां याचा त्या थैलीच्या धन्यास फार खेद वाटून याने ती थैली भूमीवर टाकून ओरडून बोलला " नाहीनाहीं, मग ही माझी नाहीं तूं काहीं एकही स्वीकारण्याविषयीं नाकार करितोस त्यापेक्षां मलात्या थैलीसीं काहींएक करायाचें नाहीं "तेव्हां तो भला द्वारपाळ स्कमारें बारा रुपये घ्यावयास प्रवृत्त झाला, ते त्याने गरीबांस लवकरच देऊन टाकिले.

## लिओनार्ड.

लिओनार्ड बारावर्षांच्या वयांतअसतां त्याचें दुर्दैव ओढवून त्याचाबाप गमावला. त्याचा संभाळ करायास त्याच्या आईच्याने खपवत नसे, आणि ज्याच्या आश्रयाने राहवें असा त्यास कोणी दुसरा मित्र नसे. तेव्हां आपलें कोणास ओझें पडूं नये, आपणस्वतां आपला प्रपंच मार्ग काढावा असा निश्चय करून तो आपल्या जिवासीं बोलिला कीं मला बरेंच चांगलें वाचितां येतें, मला काहींसें लिहितांही येतें, आणि हिशोब करितां येतो. जर मी भला आणि उद्योगी असलोंतर माझें अन्न मला कां मिळवितां येऊं नये ? मग त्याने आपले आईचा निरोप घेतला, आणि एका जवळच्या शहरांत जाऊन त्याच्या बापाचा स्नेही कोणीएक व्यापारी होता, त्याचा शोध लाविला. बेन्सन् हें त्या व्यापाऱ्याचें नाव असे, त्याच्याजवळ त्याने विनंती केलीकीं मला आपल्याकडेस कामावर ठेवावें, मी आपली चाकरी होशीने व विश्वासाने करीन असें त्याने कबूल केलें. तेव्हां त्या व्यापाऱ्यास करारनाम्याने विद्यार्थी ठेवायाची गरज होती, म्हणून त्याने लिओनार्डास खुशीने आपल्या हिम्मतेस ठेविलें. मग हा आपल्या स्वामीचा संतोष होई असें अवघें आपल्या सामर्थ्यानुरूप करूं लागला. काहीं कामाचा विसरपडला अथवा याची लिहिण्यांत काहीं चुकी पडली

असें कधीं घडलें असतां याने तो आपला दोष मोकळ्या मनाने आपल्या पदरीं घ्यावा आणि साधलें तर पहिल्यापेक्षां विशेष हौस आणि उद्योगीपणा दाखवून सुधारून घेण्याविषयीं प्रवृत्त व्हावें. अस्या विश्वासू विद्यार्थ्यावर प्रसन्न झाल्यावांचून बेन्सनाच्याने अन्यथा राहवेना असें झालें. मग तो लवकरच त्याजवर फार भरवसा ठेवूं लागला.

जर बेन्सनाच्या घरांतील खबरदारी करणारीण जी होती तिच्या द्वेषाची उठावणी करण्याविषयीं लिओनार्ड दैवयोगें करून कारण झाला नसता तर हा त्या समयीं केवळ सुखी झाला असता. तिचीं कामें केवळ भलीं नसत म्हणून त्यांविषयीं हा हेरासारिखा जपतो असें यास ती पाहूं लागली. यास काढून टाकचावें या आशेने तिने याविषयीं आपल्या यजमानास खोट्या गोष्टी सांगितल्या परंतु या लिओनार्डाची अवघी वर्तणूक असी चांगली असे कीं तिनेजें पाजीपणाने दर्शविलें त्या अवघ्यावर बेन्सनाने काहीं विश्वास ठेविला नाहीं. त्या मुलाचे भलाईविषयीं आपण पुरतेपणी निःसंशय व्हायाकरितां ती भलाई कसोटीस लावून पहावी असा त्याने निर्धार केला. या कार्याकरितां त्याने असें केलें कीं जो ऐवज जरूर असायाचा त्यापेक्षां त्याने अधिक देऊन लिओनार्डाकडे स काहीं खरीदी सोपिली, तेव्हां जो ऐवज लागला त्याबाहेर राहिलेला सर्व पैका दमडीनदमडी सुद्धां लिओनार्डाने परत केला, त्याजवरून त्यास मोठा आनंद झाला. एका दिवसीं त्याने पैका मोजायाचे खोलींत एक मोहोर टाकिली ती त्याच्या मागें तसीच राहिली, आणि ती त्या घराची खबरदारी करणारणीचे समक्ष लिओनार्डास सांपडली. तेव्हां तिने यास विनंती केली कीं मला घेऊन इची वाटणी करावी. त्याजवरून याने क्षणएकही थानधा केल्यावांचून विदित केलें कीं ही माझ्या स्वामीची आहे, मी त्यास नेई

न देईन. मग ह्यातसें करावयास लागलाच प्रवर्तला. त्यावरून बेन्सन यामुला चें आचरण पाहून इतका प्रसन्न झाला कीं त्याने याला ती मोहर बक्षीस केली व त्याच्या पोटीं काहीं मुले नव्हतीं याकरितां त्याने लवकरच यालिओनार्डास आपला दत्तकपुत्र करून घेतला आणि आपली सर्व संपत्ति यास देऊन ठेविली.

## मुसारोथ्शिल्ड.

फ्रेञ्च राज्याची उलटापालट झाली, त्यावेळीं जर्मनी देशीं मेन नदीच्या तीरीं फ्रांक्फोर्टांत एक याहुदी सावकार राहत होता, त्याचें नाव मुसारोथ्शिल्ड त्याची संपत्ति तर मोजलेली असे, परंतु त्याचा लौकिक चांगला असे. फ्रेञ्चलोकां चे फौजेने जर्मनीवर चाल केली, तेव्हां तेथील हेसी कासेलच्या संस्थानिकास आपल्या राज्यांतून पळून जाणें प्राप्त झालें. त्याने फ्रांक्फोर्टांतून जात असतां मुसारोथ्शिल्ड यास विनंती केली कीं माझ्याजवळ द्रव्याची एक मोठी रकम व काहीं किमतदार जवाहीर आहे तें आपल्या हिम्मतीस घ्यावें, नाहींतर तें शत्रूच्या हातीं सांपडेल असें मला वाटतें. त्या याहुदी गृहस्थाने तर इतक्या मोठ्या जिम्याचा नाकार केला असता परंतु राजास आपली मिळकत रक्षून ठेवावयाच्या उपायाची फारच अनुपपत्ति म्हणून मुसाने शेवटीं होकार दिला. परंतु अशा प्राणसंकटप्रसंगीं तें द्रव्य सुरक्षितपणें परत करण्याचा जाब मजकडेस नाहीं असें सांगून त्या द्रव्याची पोंहोंच देण्याविषयीं त्याने नाकार केला.

मग तो पैका व जवाहीर मिळून कितीएक लाखांचीजी संपत्ति ती फ्रांक्फोर्टास पोंहचविली; ती फ्रेञ्चलोक शहरांत शिरत इतक्यांत रोथ्शिल्डाने आपल्या बागेच्या कोपऱ्यांत पुरून ठेवण्याचें कार्य साधिलें. त्याची मिळकत सुमारें साठ हजार रुपयांचीमात्र होती ती त्याने लपविण्याचा काहीं उद्योग केला नाहीं.

नंतर याच्या पदरीं काहीं त्याच्यापेक्षां मोठी रकम असेल असा त्यां फ्रेंच्यांस संदेह नयेतां त्यानीती मिळकत घेतली. असें नकरितां माझ्याजवळ पैका नाहीं असा जर तो बाहना करितातर त्यानी जसे इतर बहुत ठिकाणीं झाडे घेतले त्याप्रमाणें आवश्य झाडा घेतला असता, आणि त्यांस तें द्रव्य सांपडलें असतें आणि त्यानी तें अवघें घेतलें असतें, ते शहर सोडून गेल्यावर रोथ्शिल्ड राजाचें द्रव्य रवणून काढून त्याचा थोडासा अंश वापरूं लागला. मग तो आपल्या सावकारीच्या कामांत नांदूं लागला आणि त्याने लवकरच आपली स्वतांची पुष्कळ संपत्ति मिळविली.

पुढें थोडक्याच वर्षांनी स्वस्थता झाली, तेव्हां हेसीकासेल्च्या राजा आपल्या राज्यांत आला. तो तर फ्रान्कफोर्टच्या सावकाराकडेस मागणें करायास बहुत करून भ्याला होता, कांतर त्याने असा विचार केला होताकीं जरी तो पैका व जवाहीर फ्रेन्च्यांस मिळालें नसेल तरी तें त्यांस मिळालें असा मुसा बाहना करून तें अवघें आपल्यासाठीं ठेवून घेईल. असें असतां त्यास रोथशिल्डाने विदित केलें कीं आपली अवघी मिळकत सुरक्षित आहे, ती दर शेंकडा पांच टक्यां प्रमाणें जें पैक्याचें व्याज त्यासुद्धां परत करण्याजोगी आतां तयार आहे, त्याजवरून राजास मोठा चमत्कार वाटला. त्यावेळीं द्रव्याचें रक्षण कोणत्या उपायानें केलें तें त्यासावकाराने निवेदन करून जाहीर केलें कीं तें रक्षण करायासाठीं मला माझे सर्वस्वाची कुर्वंडी करावी लागली म्हणून मी जो पैका वहिवाटिला त्याबद्दल मला क्षमा असावी असें सांगितलें. रोथशिल्डावर इतका मोठा विश्वास टाकिला असतां त्यानेजो प्रमाणिकपणा दाखविला ती गोष्ट राजाच्या मनावर असी बिंबलीकीं त्यानेतोपैका कमती दराच्या व्याजाने त्याच्याकडेसच राहूं दिला. त्याने आपली उपकारज्ञता दाखविण्याकरितां पैका उसनवारीने दे

णारा ह्मणोन हा, असी त्याप्रमाणिक याहुदीगृहस्थाची शिफारस युरोपखंडां तील अनेकराजांजवळ केली. त्याजवरून उसणवारीने ऐवज काढावयाच्या कितिएक मोठ्याकामांत त्याची योजना झाली, तेणेंकरून त्याने महत्प्राप्तिक रून घेतली. मगतो काळेंकरून अतिधनाढ्य होऊन त्याने आपल्या तिघांपुत्रां स युरोपखंडांतील लंडन, पारिस, वियेन्नाअश्याज्या तीन मुख्य राजधानी तेथें आपण करीत होता त्याप्रकारच्या कामावर ठेविले. ते अवघे समृद्ध झाले. ज्यां सारिखे घरयुती खटलेदार मनुष्यांत दुसरे कोणी जगाच्या जाणण्यांत कधीं आलेच नाहींत असेते उत्कृष्ट संपत्तिमान् झाले. जो लंडनांत राहत असे तो सातकोटि रुपयाची संपत्ति ठेवून मरणपावला. दुसरे जे दोघे जे बारन् पदा रूढ झाले आहेत तेही कदाचित् त्याच्याहून संपत्तीने कमी नसतील. याप्रका रें ज्याचे थैलीच्या योगाने लढाई निभली आणि स्वस्थता साधली असें जें कुटुंब त्यास विश्वास सोंपिल्याच्याअंती अलौकिक प्रमाणिकपणाचें जें एक कृत्य घडलें तेणेंकरून हें अवघें महत्व प्राप्त झालें.

---

## दुसऱ्याचे लौकिकाविषयीं
## स्वानुभविकपणा.+

मनुष्येंज्यांस किमतदार असें मानितात अश्या वास्तविक मिळकती शिवाय दुसऱ्या बहुत वस्तु आहेत, यां अश्यांत चांगलें नावही एक अत्यंतथोर वस्तु होय. तो मनुष्य चांगला आहे असीजी कोणी एका मनुष्याविषयीं बहुधा स मजूत पडून राहिली असती हा चांगल्या नावाचा अर्थ. असीज्या कोणी एका म नुष्याविषयीं बहुधा समजूत पडली असती, त्याची लोकमान्यता राखिनात;

+ ह्मणजे दुसऱ्याचा दुर्लौकिक करूंनये असें आपलें वचन आपल्यास सांगते

त्याजवर विश्वास ठेवितात; त्यास कामधंदा सांगतात; त्याजविषयीं अनुकूल बोलतात; तो आपल्या चांगल्या नावेंकरून बहुतप्रकारें भाग्योदयास चढतो. आतां, जो कोणी चांगला मनुष्य तो चांगलें नाव पावण्यास अधिकारी होय. हीं एक त्याची सत्तेची वस्तु होय. हें त्यास मिळालें असतां त्याचे सदाचारास एक फळप्राप्त झालें असें होतें, तेणेंकरून भलेपणाने एकसारिखें वागायास त्यास प्रो - त्साहन होतें. परंतु हेंजर त्यास प्राप्त होऊं न दिलें अथवा वास्तविक कारणावाचून त्यापासून हरण केलें, तर त्याची हानि होती, वस्तुतः चांगलें होण्याविषयीं जें प्रोत्साहन तें नाहीं असें होतें, त्याचा सदाचार कदाचित् नष्ट होतो; असें त्याचे भलाईस वाईट फळ मिळालें तें इतरजन पाहून भले होण्याकरितां जो यत्न करावयाचा तो करण्याविषयीं कदाचित् श्रम करीत नाहींत.

याप्रमाणें पाहतां हरएक कोणाची जी योग्यता असेल ती प्रमाणें तंतोतंत त्याजविषयीं बोलावें अथवा त्याचा लौकिक करावा ही किती थोर गोष्ट आहे तें दिसून येतें.

दुसऱ्यांचे लौकिकाचा नाश करण्याच्या दोन रीति आहेत. एक ही कीं कोण्या एका शेजाऱ्याविषयीं काहीं परिछिन्न वाईट सांगणें; जसें, त्यानें काहीं वस्तुतः दुष्कर्म केलें असें बोलणें अथवा काहीं एक थोर कर्तव्य तें न करण्याविषयीं त्यास परिपाठ पडला आहे असें निश्चितपणें सांगणें. हा अपवाद होय. दुसरी अशी कीं त्याचे योग्यतेविषयीं हलकवटपणानें बोलणें अथवा तो जें दिसाया जोगें चांगलें करील त्या अवघ्याविषयीं खोटे हेतु कल्पिणें. ही असूया होय. यां दोहोंतून एका उपायानें आपल्याच सारिखा जो इतर मनुष्य त्याचें भलें नाव नष्ट करणें हें त्याचा माल हरण करण्यासारिखें दुष्टकर्म होय. याकरितां कोणी

एका शेजाऱ्याविषयीं आपल्यासजें काहीं बोलायाचें तें अवघें आपण अत्यंतसावधगिरीने बोलावें, हें विशेषेंकरून करावें, कांतर त्याच्या लौकिकास आपल्याकडून काहीं अपाय झालाअसतां त्याविषयीं रुधारणें प्रायः अशक्य आहे. एकवेळ आपल्या तोंडांतून शब्द निघाले ते परत आणितां येत नाहींत. ते एकाकडून दुसऱ्यास ज्याहीर होत जातात; त्यांचा जसा फैलावा होतो तसींतसीं त्यांचीं एकाचीं एकवीस होतात, मग मुळींजो भाव कल्पिला असेल त्याजहून फार वाईट असें काहीं त्यांजपासून निघतें. याप्रकारें आपल्या शेजाऱ्यास दुःख सहन करणें प्राप्त होतें आणि हें असें कां झालें हें कदाचित् त्यास कळल्याशिवाय राहतें. आपल्या सारिखीं जीं इतर मनुष्यें त्यांच्या लौकिकाविषयीं जो कोणी रत्यनिष्ठ होऊं इच्छितो तो कोण्याएकाविषयीं अपवादाने अथवा असूयेने कधीं बोलणार नाहीं आणि तस्याप्रकारचीं काहीं भाषणें त्यानें ऐकिलींतर तोबोलून दाखविणार नाही.

---

## सोक्रेटीसयास मारण्याविषयींकेलेलाकट.

युनानीलोकांत सोक्रेटीस ह्मणून एक तत्ववेत्ता होता, तोजे सर्वोत्कृष्ट ज्ञानी आणि चांगले पुरुष होऊन गेले त्यांतलाच एक होय. या विषयीं क्झेनोफेन लिहितो कीं "हा असा भक्तिमान् असे कीं याने देवांस मसलत पुसल्याविना काहींएक करावयाचें पत्कारूं नये; असा नीतिमान् असे कीं याने कोणास अतिअल्पही दुखापत देऊं नये, सर्वांची अवश्योपयोगी सेवाच करावी; असा मिताहार असे कीं यास सदाचार सोडून ख्यालीखुशाली कधीं आवडली नाहीं; आणि असा ज्ञानी असे कीं अत्यंत कठिण प्रकरणीं कोणाची अक्कल नघेतां जें उचित व यथार्थ तें याच्या लक्ष्यांत येई. याचाच सारिखीं जीं इतर मनुष्यें त्यांस चांगलें करावें

व स्करची करावें या उद्योगांत याने आपलें अवघें आयुष्य घालविलें, असी ही याची अवघी योग्यता असतां हा अपवादापासून स्कटला नाहीं.

याच्यासमयीं आथेन्स नगरांत शिक्षकांचा एक मेळा असे, जरी त्यांचें लक्ष सत्याकडेस नसे, आपलें बुद्धिकौशल्य प्रकट करावें याजकडेसच त्यांचा रोख असे, तरी त्यांच्या बाह्यात्कारें रमणीय दिसणाऱ्या वक्तृत्वावरून आथेन्स नगरांत त्यांचा फार लौकिक होऊन त्यांची चलती झाली असे. त्यांस स्रूफी असें ह्मणत. त्यांला सोक्रेटीस याचा वीट आला, कांतर त्यांचे चुक्यांची उघडीक करण्याविषयीं आणि जे नवे तरणे त्यांचें कुमार्गांत वर्तणें न होई अस्या रीतीने त्यांचें रक्षण करण्याविषयीं याने आपले प्रयत्न कसर न करितां चालविले होते. त्याचसमयीं असें झालें होतें कीं राज्यांत कित्येक गोष्टी बिघडल्या होत्या तेणें करून इतर बहुत मनुष्यें आपलें हित करून घेत. त्यां बिघाडांविरुद्ध बोलण्याची हा आपली आस्था दाखवी त्यामुळें त्यांस हा नावडता झाला होता. सारांश हा ज्यासमयीं च ज्या लोकांत राहात होता त्यांत हा असावा त्यापेक्षां अधिक प्रमाणिक असे.

मग सोक्रेटीस याचा नाश करावयास याच्या शत्रूंनी कट केला, आणि आपल्या त्या अभिप्रायाचे सिद्धीकरितां अपवाद ह्या साधनाची योजना केली. बहुत्येक प्राचीन लोकांसारिखे आथेन्सकरही फार प्रकारच्या देवांस भजत असत; परंतु सर्व वस्तूंच्या कर्त्ता असा जो एक सत्य ईश्वर त्याच्याठायीं विश्वास ठेवावा असें सोक्रेटीस याचें मत वळलें होतें. असें असतांही आपल्या शहरवाल्यांचा जो देवभोळेपणा त्यास काहींसें अनुसरुन असावें आणि आपलें जें वास्तविक मत तें छपवून ठेवावें हेंच उत्तम असें याने शाहाणपणाने मानलें असे. तेव्हां अज्ञानी जनसमुदायाचे जे देव त्यांजविषयीं याच्या मनांत अविश्वास अथवा तिरस्कार आहे अ

सी त्यां जनांची एकवेळ खात्री झाली ह्मणजे ते याविषयीं काय मानूं लागतील हें याच्या शत्रूंस चांगलें समजलें होतें. याकरितां ते उघडरीतीने असें दर्शवूं लागले कीं ज्यां देवांस राज्यांतील लोक मानितात त्यांस सोक्रेटीस् मानित नाहीं व हा आपल्या दुष्टमतें करून नव्येतरण्ये मंडळीस बिघडवितो. तेव्हां अस्या अपवादाच्या परिणामापासून याचें शुध्ध आचरण व सत्यज्ञान याला रक्षायास समर्थ झालें नाहीं. हा अभक्त दुरात्मा असी लोकांची खात्री होतांच ते यास जो पूर्वीं मान देत होते तो सर्व विसरून यास दंड करायास न्यावें असी त्यांस इच्छा झाली. असा याचे लौकिकाचा नाश होतांच याचे शत्रूंनी उघडरीतीने बाहेर पडून न्यायाधीशाकडेस येऊन यावर आरोप ठेविला, तो आरोप जरी सत्य झाला असता तरी तो काहीं अपराध असें ठरलें नसतें. सोक्रेटीस् याने स्वपक्षस्थापन कुशलतेने केले, परंतु न्यायाधीशांस याविषयीं दुराग्रह होता ह्मणून हा अपराधी असें त्यानी ठरवून याला विष पाजून मारून टाकावें असा यास दंड नेमला. याप्रकारें आजपर्यंत जगाच्या दृष्टीस जे सर्वोत्कृष्ट साधु पडले आहेत, त्यांतला हा एक पुरुष उण्या अपवादाच्यापायीं नाश पावला.

## हीलेन् प्रेम्

आपल्या सखींचे योग्यतेची उणीव करण्याच्या जोस्वभाव त्याविषयीं हीलेन् प्रेम ही खूण राखावयाजोगी आहे. आपल्यापेक्षां जी कोणी रूपाने व गुणाने व प्रपंचस्थितीने निश्चयेंकरून कमी त्यांचीमात्र ती स्तुति करिती. जी प्रायः आश्चर्य मानायासारिखी त्यां अग्रघ्यांच्या गुणाचा हरएक उपायाने अपकर्ष करायास ती पाहती, जसें काय जाणूं तिला त्यांचा थोरपणा समजल्यावरून असरवच होत असतें.

परोपकार बुधीविषयीं जो सर्वसंमत असुक एक पुरुष त्याची स्तुति तिने केली ह्मणजे ती असें ह्मणती कीं " तो परोपकारी आहे खचीत, परंतु मला वाटतें त्याच्या उजव्यां* हातानें जें घडतें तें सर्व त्याच्या डाव्या हातास समजतें, त्याचे गुप्त परोपकार बुधीविषयीं कोणी एकाच्याने मला सांगवेल काय ?

हिलेन प्रेम असें ह्मणती कीं " मारिया हाल इचा तर सर्व चांगलेपणाच दिसतो, परंतु लोक जसे आहेत तसे ते दिसावे हें माझ्या मतें बरें. ज्याचें बाहेरील आंग सुंदर आणि अंतरंग पोंफळ अस्या फळाचा मला वीट येतो."

"लिझी प्रेस तर आपल्या द्रव्यवान्, वृद्ध, मनास त्रास येण्याजोग्या चुलत्याचे सेवेंत तत्पर झाली आहे, पण ती वृद्ध, त्रासक आणि द्रव्यवान्, चुलत्याचे सेवेंत आहे.

हीलेनस असें वाटतें कीं ज्याजवर उत्तर झालें नाहीं तें सिद्ध झालें. आतां असुक एकाचा जो गुप्त उपकार त्याजविषयीं विशेषत्तेने सांगून देणे कठिण आहे. मारिया हालच्या चांगलेपणा तर सर्वांस दिसत्ता आहे. परंतु ती अंतरंगीं पोंफळ आहे असें जें ह्मणणें तें रद्द करणें सोपें नव्हे. लिझी प्रेसचा चुलता द्रव्यवान् आहे त्याजविषयीं नाकार करवत नाहीं, परंतु ती त्याच सबबेने त्याचे सेवेंत विशेष तत्पर झाली आहे हें हेलेन प्रेम वांचून दुसरे कोणाचा बोलायास कधीं हिय्या झाला नसेल, अथवा कधीं कोणाच्या मनांत आलें नसेल, असें मला वाटतें.

हा असा हीलेन प्रेमचा जो दुष्ट दोष तो टाळावा असी जर आपली इच्छा

---

* ख्रिस्ती शास्त्रांत असें वाक्य आहे कीं जें तुझा उजवा हात करितो तें डाव्या हातास कळूं देऊं नको. त्याचा अर्थ आपल्या चांगल्या करण्याचा लौकिक अथवा माहिती होण्याकरितां तीं लोकांस कळवूं नको.

आहे तर आपण आपल्या कल्पनांचा जो झरा तो निर्मळ ठेवावा, आपण घाई करूं नये. इतरांविषयीं थोर मन करून विश्वास धरणें याजपेक्षां हृदयास रक्षिंगत करणारें दुसरें कांहीं नाहीं.

साधारण पाहणारांस जे दोष स्पष्ट दिसत नाहींत ते पाहण्याचा गर्व आपल्याठायीं वागविण्याची कुशाग्र दृष्टि अथवा तीव्र बुद्धि लोकांस फार करून सवई झाली असती. असे तीव्रतेने कदाचित् बुद्धि कुशाग्र होईल पण तेणेंकरून अंतःकरण कठिण होतें आणि नम्रता ह्मणून जी मधुर खब तिचे वाढीस प्रतिबंध होतो. उत्तम गुण, उत्तम कर्में, आणि प्रीतीचे शब्द यांविषयीं जितकें कुशाग्र दृष्टीचें पाहणें ठेवेल तितकें तूं ठेव, परंतु सूर्यप्रकाश न अनुभवितां त्याच्या वरल्या लांछनाचें पहाणें ज्यांस अधिक आवडतें त्यांसारिखा होऊं नको.

जे लोक आपल्यास आपले कुशाग्र दृष्टीवरून थोर मोजितात, ते नेहेमी जपत असतात, नाहींतर ते ह्मणतात कीं आह्मी फसले जाऊं, अथवा पकडेंत सांपडूं. आपल्यासारिखीं जी इतर मनुष्यें त्यांविषयीं साशंक व अविश्वासू होणें त्यापेक्षां या आयुष्यांत ठकलें जाणें हें बरें. ज्या भोळेपणाचा विश्वास चांगलेपणाच्याठायीं असतो तो भोळेपणा चांगलेपणाचेंच एक लक्षण जाणावें.

मिससेज् चिफ् कन.

## इतरांचे स्वभाविक सत्तेविषयीं स्वानुभविकपणा.

आपल्या स्वकीय मोकळेपणावर प्रत्येक मनुष्याची स्वभावतः

सत्ता आहे. दुसऱ्यास अपराधकारक अथवा अपकारकारक नव्होई असेंजें त्याचे इच्छेस येईल तें करण्याविषयीं त्याची सत्ता आहे. त्याचे इच्छेस येईल तसा कोणत्याही प्रकरणीं विचारकरण्याविषयीं आणि आपल्या कल्पनाही बोलून दाखविण्याविषयीं त्याची सत्ता आहे, इतकेंच कीं तेणेंकरून लोकांमधील स्वस्थतेस भय होऊंनये. याकरितां कोणीएक आपलें वाईट करीत नसतां त्यासकोण्ही एका माणसाने आपला दास करून ठेवणें, अथवा त्याच्या कर्मांचें अथवा कल्पनांचें आवरण करण्याविषयीं उद्योग करणें हें जसी जबरीने त्याचीजमीन घेऊन अथवा त्याची थैली हरणकरून जसा आपले सत्यनिष्ठेचा मोठा भंग करून घेणें त्यासारिखें होय.

---

## फ्रान्सदेशांतील ज्याकेरीलोकांचें बंड.

राजे, मानकरी यानी व आपल्याच सारिखे प्राण्यावर ज्यांचा मोठा अधिकार अथवा दाब असेल या सर्वजणांनी तो अधिकार सौम्यतेने वर्नीतीने वागवावा, व यांच्या हाताखालीं जीं आहेत त्यांच्या कल्याणार्थ जितकी यांच्याठायीं शक्ति असेल तितकें यांनी करावें. यांनी अन्यथा केलें असतां त्याचे वारंवार भयंकर परिणाम होतात, कांतर नीतिकर्ते व कल्याण कर्ते असेजे अधिकारी त्यांस नमून असावें असा लोकांचा प्रायः जरी स्वभाव असतो, तथापि बलात्कार व अनीति झाली म्हणजे ते प्रकुपित होतात. याचें स्मरण राहच यासारिखें उदाहरण ज्याकेरीच्या लढाईंत आढळतें. त्या फ्रान्सदेशीं इश्वीसनाच्या चौदावे शतकांत झाल्या, त्याचें सरवाल्टरस्कार याने वर्णन केलें आहे तें असें.

या लढाईस ज्याकेरीची अथवा गांवढेकऱ्यांची लढाई असें ह्मणतात, याचें कारण असें आहेकीं, पांढरपेशानी त्यांसज्याकीस बोनहोमी अथवा गुडम्यान्‌जेम्स असें धिक्काराचें नाव ठेविलें होतें. ही लढाई एक अत्यंत भयंकर अनर्थजाला. एणेंकरून फ्रान्सदेशाचा जसा नाश जाहाला तसा अजूनपर्यंत झालाच नव्हता. मानकरी व पांढरपेशे गृहस्थ यांजपासून कुणब्यानी ह्मणजे जमिनीची राबणूक करणाऱ्यानी बलात्कार व हेलना व अपकार हीं बहुतदिवस सहन केलीं, त्यांजपासून ही लढाई उत्पन्न झाली. ते मानकरी आणि पांढरपेशे, कुणबीलोकांस असें मानूं लागलेकीं हे प्राणी आमच्यापेक्षां नीचजातीचे आहेत. मगते त्यांचे माल व शरीरें आपल्या हातांत आहेत असें समजूं लागले. साधारण लोकांचें काहींसे संरक्षण राजा करीत असे तेंही राजाचे कैदेमुळें व राज्यभर अव्यवस्था झाल्यामुळें होईनासें झालें. अस्याल्या दुःखाच्या दिवसांत प्रत्येक मानकरी अथवा नैट आपलेंजें वतन असे त्याचा अनावर व स्वतंत्र राजा झाला असें आणि स्वेच्छाधिकाराच्या प्राप्तीपासून जी उन्मत्तता येती तीणेंकरून बहुत्येकजण आपले सत्तेचा उपयोग निष्ठुर व स्वतंत्र रीतीने करायास प्रवर्तले असत, हरएकजण आपआपल्या सत्तेंतल्या लोकांवर अमर्याद बलात्कार करी. अस्या निरंकुश अधिकाराचा परिणाम हा झालाकीं शेवटीं हे कुणबीलोक निराश होउन गेले आणि यानी स्वतां भुके मरत असतां, यांच्या दुःखास जसेंकाय चिरडू येण्याकरितां ह्या वेंतरें याचे धनी अतिशय विलासाची आणि अकाळींच्या उधळेपणाची धणघेतां पाहिले. मगहे शेणजमवायाची दुबेळकीं, विळे, सोटे, छाणी करावयाचीं आउतें असींजीं गांवढळ शस्त्रें तीं घेउन आवेशाने उठावले आणि यांचे मोठेस मुदाय एकत्रजमून त्या राज्यांतील अवघ्यां मानकऱ्यांस व पांढरपेशांस नाहींसें

करून टाकावें असा निश्चय केला.

हें बंड कित्येक प्रांतीं झालें अशा प्रकारच्या लढाईंत बहुधा असें घडत असतें कीं ज्यांच्यावर बलात्कार झालेला आणि जे अज्ञानी असे लोक बंधनावस्थेपासून अकस्मात् सुटून बाहेर पडले असतात, त्यांस अज्ञान व सूड जेंजें स्वेच्छाचरण सुचवील तेंतें ते अमर्यादपणें करितात. त्याप्रमाणें यानीकरून त्या मानकऱ्यांचीं घरें कितीएक जाळलीं, कितीएक पाडून टाकिलीं, मोठ्या बळेंकरून त्यांच्या गडयांवर हल्ले केले, त्यांच्या स्त्रियांवर व कन्यांवर बळात्कार केले आणि क्रूरपणानें व फारवेळ हालहालकरून अनेक रीतीनें त्यांचा जीव घेतला. सारांश आपल्या सांखळांपासून अकस्मात् सुटलेले जे जाज्वल्य कुत्रे त्यांसारिखे ते वर्तले. विचार आणि दया यांविषयीं ज्यांच्या मनांत जागा राहिली नाहीं. असो या रोमांच उत्पन्न करणाऱ्या गोष्टींचा विसर पडावा हें बरें ह्मणूनही आह्मी आतां स्वसंतोषें सोडितों, याविषयीं आमचें ह्मणणें इतकेंच कीं दास्य व बलात्कार यांपासून दुष्पट अनिष्ट असें होतें कीं त्यांस जे पात्र झाले असतात त्यानीं आपलीं बंधनें तोडण्याविषयींचा उद्योग सिद्धीस नेला ह्मणजे ते मनुष्यासारिखा विचार करावयास कांहींकाळ शक्त असत नाहींत.

## टामस्क्लार्कसन्.

वेष्ट इंडीस देशीं गुलाम बाळगीत असत व त्यांची जी संख्या असे त्यांत दरसाल हजारो मिळवायाकरितां आफ्रिकाखंडांतून काफ्रीयांची पाठवणी करीत असत, त्याकामाचे योग्यपणाविषयीं इस्वीसन १७८५ च्यापूर्वी कोणे एकानें प्रसिद्ध रीतीनें शंका घेतली असा विरळा. नंतर त्याचसालीं केंम्ब्रिज्‌ एथील माग्डालेन नामक विद्याशाळेचे गुरूने त्या विद्याशाळेंतील एका बक्षिसाकरितां ते

थील विद्यार्थ्यांनी आपला विचार लिहावा, म्हणून एक विषय सांगितला, तो हा कीं इतरांस त्यांचे इच्छेविरुद्ध गुलाम करणें हें उचित आहे किंवा कसें? त्यावरून त्या विद्यार्थ्यांतिला एकजण टामस् क्लार्क्सन् याने त्या विषयाची माहितगारी संपादन करण्याविषयीं श्रम घेऊन जो निबंध लिहिला त्यास बक्षीस मिळालें. तो लोकांत वाचिला त्याच्या दुसरे दिवशीं क्लार्क्सन् घोड्यावर बसून लंडनास जायास निघाला. त्यासमयीं त्याच्या निबंधाने त्याच्या सकल कल्पना व्यापून टाकिल्या. तो मार्गक्रमीत असतां त्यास जेव्हां तेव्हां खराच कळवळा येऊं लागला. शेवटीं तो घोडा थांबवून मार्गाचे एकेकडेस उतरून बसला. त्या निबंधांतील मजकूर खरा नसावा असी आपली समजूत करायास तो पाहूं लागला, परंतु त्याचीं तीं प्रमाणें असीं होतीं कीं तें तसें होणें त्यास अशक्य असें वाटूं लागलें. मग हा असा निर्दयपणा ब्रिटिशलोक त्यां बापुड्यां काफ्रयांवर करितात असें याच्या मनाने कबूल करितांच त्या प्रकरणीं वास्तविक समजूत पाडायासारिखी लोकांची वृत्ति जागृत करण्याचें काम, कोणीएकाने पत्कारावें, हें उचित होय, असें यास वाटूं लागल्यावांचून राहवेनासें झालें. तो मोठी विव्हलता पावून लंडन शहरास पोंहचला. नंतर त्याने लवकरच तो निबंध छापविला, तेणेंकरून बहुतांचीं लक्ष्यें आकर्षित झालीं. तथापि काहीं दुसरें आवश्यक आहे असें त्याचे दृष्टीस पडलें. गुलामांचा व्यापार बंद करावयास एकट्या निबंधाचें प्रकटीकरण पुरेल असें नाहीं, तर या कार्याच्याठायीं कोण्याएकाने सर्वभावें तत्पर असलें पाहिजे असी त्याची खातरी झाली. तेव्हां हें असें करावयास मला स्वतःच आवश्यक आहे काय असा प्रश्न झाला? त्या प्रश्नाचें शेवटील उत्तर त्याने द्यावें हें त्याच्या समाधानार्थ प्राप्त झालें.

याजकरितां तो वारंवार एकांतीं जाऊं लागला. मग या कार्यास माझें अवघेंआयुष्य व्हावें असें झाल्यास तें म्या अर्पणकरावें असा त्याने केवळ पुरतेपणीं विचार करून परिणामीं निर्धार केला.

गुलामाच्या व्यापाराचा उच्छेद करण्याविषयीं क्लार्कसनाने एक मंडळी उत्पन्न केली, तेव्हां बहुत्येक वजनदारलोक त्यामंडळींतील हुद्देदार झाले. मग सभाकरून गुलामगिरीचें वर्णन व त्याविरुद्ध उपपत्ति छापवून त्यामंडळीने लोकांच्या मोठ्या समुदायाच्याठायीं त्या व्यापारास विरुध असल्यासंतापाचा लवकर प्रादुर्भाव केला. क्लार्कसन् विरणीस झाला होता ह्मणून त्यापुरुषास कायती बहुत्येक मेहनत पडे. सहावर्षेपर्यंत याने आपल्या कामाची इतकी सख्त मेहनन केलीकीं शेवटीं याची शरीरप्रकृति निभेना असें दिसूं लागलें. याचें ऐकणें, शब्द, स्मृति हीं बहुधा नाहींसीं झालीं. तेव्हां आपल्याजीवाकरितां यास आपला उद्योग आटोपणें जरूर झालें. पुढें आठवर्षानंतर यास पूर्ववत् आरोग्य झालें असें आढळल्यावरून याचेजे उदारवृत्तीचे उद्योग त्यांजवर हा पुनः आला. हे असे उद्योग चाललेअसतां ज्यांस गुलामाच्या व्यापारांत स्वार्थ असे त्यां अवघ्यांपासून याने फारहेलना सहनकरूनघेतली, आणि एकवेळतरकाय पण बहुतवेळ याच्या जीवास अनरिष्ट घडायासारिखें झालें, तरीही याने आपला उद्योग सन १८०७ पर्यंत एकसारिखा चालविला, तेव्हां गुलामांच्या व्यापाराची बंदी करण्याविषयीं पार्लमेंट सभेस एक कायदा ठरला. यागोष्टीचें भाकीत जरकोणी त्याकाळाच्यापूर्वीं वीसवर्षांवर सांगितलेंअसतें तर तेणेंकरून त्या भविष्यकरणाराची गणना भ्रांतपुरुषांत झाली असती.

मग ब्रिटन् देशाने जो कित्ता घातला त्याप्रमाणें थोडक्याच वर्षांत

युरोपखंडांतील बहुत्येक दुसरीं राज्यें चालूं लागलीं. मग सन१८३४सांत ब्रिटिशराज्यांत खुद्द गुलामगिरीच नाहीसी झाली, त्याबद्दल वीसकोटीरुपयांची हानि झाली. जेणेंकरून इतकें मनुष्यांचें दुःख मिटलें असेजेहे थोर परिणाम यांच्या मुळाचा थांग लावितां यांस एका मनुष्याची परोपकार बुध्दि कारण होय. ज्यापासून साधारण मनाचे सर्वजन संकोच पावून गेलेअसते असेंजें कृत्य त्याकृत्याच्याठायीं तो मनुष्य एकटेंजन प्रीतीमुळें, आणि नीतीविषयीं दृढ समजुत झाल्यामुळें स्वतां तत्पर झाला.

---

## आपल्यासजें कर्तव्य तें करण्याविषयीं स्वानुभविकपणा.

मी तुमच्याघरीं चाकरीकरीन, अथवा शेतांत खणीन, अथवा दुकानांत अथवा कारखान्यांत काम करीन, अथवा आरोग्याविषयींजपेन, अथवा दरबारीं तुमच्यास्वार्थाचें रक्षण करीन याप्रकारें काहींएक उद्योग दुसऱ्याच्यासाठीं पैक्याकरितां अथवा दुसऱ्याफळाकरितां करण्याविषयीं कोणीएकजण जेव्हां करार करितो, तेव्हां माझें काम चांगलें होईलअसात्या दुसऱ्या माणसास विश्वास असतो. काम पत्कारणारा असामी जर आपलें कर्तव्य प्रमाणिकपणें न करील तर तो काम सांगणारास ठकवितो आणित्यानें मिळविलेला नाहीं असा पैका घेतो, हें जसें चोरून घ्यावें त्यासारिखें प्रायः आहे. मी तुमच्यासाठीं प्रतिदिवसीं अमुककाळपर्यंत अथवा दहा तास काम करून अमुक ऐवज घेईन असाही कोणीएक करारकरितो. याकरितां त्यानें एक तास आळस केलाअसतां तो आपल्या त्या कामकरविणारापासून

जें मिळवणार त्याचा दाहवा हिसा चोरून घेतो असें त्यास ह्मणावें.

प्रत्येकाने मान्यतेस योग्य व्हावें याकरितां अवश्य आहेकीं दुसऱ्याचें जें काहीं काम पत्कारिलें असेल तें पत्कारलेलें अवघें काम प्रमाणिकपणें व काळजीने करावें. जर त्याचा करारवेळेविषयीं असलातर त्याने एकपळ ही आळसांत व्यर्थ घालवूं नये.

मनुष्यांच्या ज्यामोठ्या मंडळ्या अथवा आपल्या देशाचे लोक यां विषयींही आपल्यास कर्तव्यें असतात; एथेंतरी आपल्यावर जोविश्वास टाकिला असेल त्याविषयीं आपण प्रमाणिक असावें ह्मणून आपल्यास तसेंच हाकामारून सांगितलें आहे. सर्कारी चाकर अथवा सर्दार यांची नेमणूक करितानां ज्या कडेस निवडून काढण्याचे सत्तेची वहिवाट असती त्यांस असी आज्ञा आहेकीं त्यांनी दुसरे कशाचा विचार करूं नये, तर तीं कामें चांगलेपणीं करायास उमेदवाराची योग्यताच पहावी. कोतवाल किंवा दुसरा कोणी अधिकारी याने फक्त लोकांचें चांगलें करावें. न्यायाधीशाने माणसां माणसांच्या न्याय करण्याविषयीं अवघा प्रयत्न करावा. हीं सर्कारी कामें विश्वासाने बजवावयास आपल्याला भयामुळें अथवा कृपेमुळें अटकाव होउं न द्यावा.

कोणीएक मित्र आपल्यास सल्ला पुसूं लागलातर त्याच्यास्वार्थास जें सर्वोत्कृष्ट असायाजोगें आपल्या स्वानुभवास वाटेल ती सल्ला देणेंहा आपला पूर्वोक्तप्रमाणेंच धर्म आहे. त्याचा कोण्याएकास चाकरीस ठेवायाचा अथवा त्याजवर विश्वास ठेवायाचा बेत असेल आणि तो त्याजविषयीं आपलें अनुमत समजून घ्यायास इच्छित असेल तर आपण आपलें अनुमत सत्य बुद्धीने द्यावें. ज्याविषयीं आपल्यास चांगलें वाटत नसेल त्याची आपणाचां

गल्यास्वभावामुळें अथवा त्यास नाखुश करण्याच्या भयामुळें शिफारस करूंनये, केलीअसतां आपण आपल्या मित्राची वंचना केली आणि अधिक वंचनाकरणारा अश्याच्याठायींविश्वास ठेवविण्याविषयीं त्यास प्रवृत्त केलें असें होईल. अस्याप्रसंगीं सत्य सांगणें जरी किती दुःखकारक असलें तरी आपण अवघी सत्यच गोष्ट सांगावी.

---

## एक आंधळा भिकारी व कुत्रा.

गरीब आंधळ्या ह्मातान्यास भीक मागून वांचणें प्राप्त झालें ह्मणजे तो कोण्यासमयीं आपल्यास जिकडे तिकडे नेण्याचें काम कुत्र्याकडून घेतो. तो त्याजनावरास दोरीने धरितो, आणि हा आपल्यास नीट मार्गानें नेईल, आपल्याजीवास अरिष्ट प्राप्त व्हायासारिखा ओंड पाण्यांत अथवा कडयावर नेणार नाहीं असा त्याचे समजुतीवर व प्रमाणिकपणावर विश्वास ठेवितो. एके वेळीं रोमनगरांत एक आंधळा भिकारी होता, त्यास कुत्रा चालवून नेत असे. त्या कुत्र्याचें चातुर्य असाधारण असे, व त्याचा आपल्या धन्यासीं व्यवहार अति मायाळू, व रास्त असे. तो ह्मातारा मनुष्य दरएक आठवड्यांत दोनवेळां कित्येक गल्ह्यांतून जाई आणि मला नेमलेल्या घरीं भीक मिळेल असा जेथें रूमार असे तेथें हांक मारी. ज्यांतून आपल्या धन्यास न्यावयाचें त्या आवघ्या वहिवाटीच्या गल्ह्या व ज्या दारीं बहुतकरून कांहीं मिळावयाचें असीं त्या गल्ह्यांतील प्रत्येक घरें तींही त्या कुत्र्यास ठाउक असत. तो ह्मातारा दार ठोकून भीक मागूं लागला ह्मणजे त्या कुत्र्याने खालीं बसून विसावाघ्यावा. त्यास भीक मिळाली अथवा तिचा नाकार झाला ह्मणजे त्या प्राण्याने उ

ठावें, आणि आपला धनी बहुधा जेथें मागत असे असें जें दुसरें घर तेथें जावें. कोणी खिडकींतून पैसा टाकिला असतां त्या आंधळ्या भिकाऱ्याच्यानें त्याचा शोध करववत नसे, परंतु तो कुत्रा तो शोधून काढावयास कधीं दळत नसे. तो तें नाणें हरहमेशा आपल्या तोंडांत धरी आणि नेऊन त्या आंधळ्याच्या टोपींत टाकी. कोण्या समयीं खिडकींतून भाकरी टाकीत असतां एथें कोणास असें वाटेल कीं घरीं या प्राण्याचें कमीं पोषण होत असेल म्हणून तो तुकडा स्वतां घेण्याविषयीं याची इच्छा होईल, परंतु हा कसाही भुकेला असला तथापि याच्या धन्यानें यास दिलें नसल्यास याने अन्नाचा अतिअल्प अंशही कधीं चाखूं नये. असी मनुष्याची वर्तणूक असली आणि ती यथार्थ हेतूने घडत असली तर फार स्तुतीस योग्य होईल.

## सेनापति वाशिंग्टन्.

अमेरिकाखंडीं युनैटेड स्टेट्स् म्हणून संस्थाने आहेत तेथील प्रमुख जनरेल वाशिंग्टन् याचा एक मित्र होता, तो ब्रिटीशलोकांसीं लढाई झाली त्या लढाईंत याजबरोबर लढला आणि सख्य झाला तेव्हां तो याचा बहुधा नित्याचा सोबती होऊन राहिला होता. तो मित्र आनंदकारी व सहवासास योग्य, पुढेंपुढें न जाणारा असा असे, परंतु कारभाराचे जे गुण ते त्याच्या आंगांत नव्हते. तेव्हां जी देण्याविषयींचा अधिकार या प्रमुखाकडे होता असी एक मिळकतीची जागा दैववशात् रिकामी पडली, त्याजवरून बहुत्येकांस वाटलें कीं ती त्या गृहस्थास मिळण्याविषयीं काहीं अवघड पडणार नाहीं. ज्याने शिपायगिरीच्या पेश्याने संस्थानाची चांगली चाकरी केली इतकेंच नाहीं तर जो वाशिंग्टनाला गृहस्थ होण्याविषयीं बहुतकरून आवश्यक, अस्या मनुष्यावर वाशिंग्टन कृपा करावयास नाकार करणार नाहीं असें ते कल्पूं लागले.

त्याकाळीं त्याजागेविषयीं एक दुसरा उमेदवार प्रगट झाला. हा राज
नीतिप्रकरणी वाशिंग्टनाच्या प्रतिपक्षी असे, परंतु यामनुष्याच्याठायीं निख
लस प्रमाणिकपणा व कारभाराविषयीं मोठी बुधि कुशलता असे. तेव्हांसर्व
स वाटूं लागलें कीं या दुसऱ्या मनुष्याच्या अर्जाविषयीं निराशा होईल. वाशिं
ग्टनाच्या नेत्रास लकलकीत वाटायासारिखें याचे योग्यतेचें एकही पत्र याज
वळ सादर करण्याविषयीं नव्हतें. हा त्या प्रमुखाच्या करण्यास फार आ
डवाआला होता आणि वाशिंग्टनाने ज्यास आपला अत्यंत प्रियमित्र असें
मानिलें होतें तोयास प्रतिकुळ होता. मगकाय परिणाम झाला, असें पुसालर
त्याजागेवर वाशिंग्टनाच्या शत्रूची नेमणूक झाली.

नंतर त्याकामाचें अगत्य वागविणारा असाएक परस्परांचा मित्र
होता, यानेती नेमणूक करिताना अनीति घडली असें त्याप्रमुखास युक्तिपू
र्वक सांगण्याविषयीं हिय्या केला. तेव्हां त्या थोर मनुष्याने उत्तर दिलें तें अ
सें "मी आपल्यामित्रास मनपुरस्सर आगतस्वागतपूर्वक भेटलों, त्याचे
आगतस्वागत माझ्याघरीं व अंतरीं होत असतें; परंतु त्यामध्यें ते अवघे
उत्तमगुण असतांही तो कारभार करायासारिखा मनुष्य आहे असें नाहीं. त्य
चाजो प्रतिपक्षी त्याचें शत्रुत्व मजसीं राज्यनीतिप्रकरणीं आहेखरें, पण तो
कारभार करायासारिखा मनुष्य आहे; याप्रकरणांत माझे खासगत जे म
नोभाव त्यांचा संबंध नाहीं. मी जार्जवाशिंग्टन नव्हे, मी या युनेटेड संस्थानी
चा प्रमुख आहें. मी जार्ज वाशिंग्टन असें समजून माझ्या सामर्थ्यानुरूप जी
काहीं कृपा करायाची तीमी त्या मनुष्यावर करीन परंतु मी युनेटेड् संस्थानी
चा प्रमुख असें समजून माझ्याने काहीं करवणार नाहीं."

# गासकोईन् न्यायाधीश.

इंग्लंडाचाराजा चौथा हेन्री याचा पुत्र प्रीन्स् अफ् वेल्स, हा कांहीं खरें समजायास अयोग्य नसे, परंतु त्याचा स्वभाव तापट असून तो कोडग्यां मनुष्यांचे सोबतीस लागला असे. त्याच्या एका सोबत्यावर एका अपराधाचा आरोप येऊन त्याची चौकशी सरविलियमगासकोइन् या पुढें झाली, तेव्हां त्याराजपुत्राने त्याजविषयीं रदबदली केली, तथापि त्यावर अपराध ठरला. मग आपल्या मित्रावर जो दंडाचा ठराव झाला त्यावरून राजपुत्रास इतका कोप आला कीं तो न्यायाधीश न्यायासनावर बसला असतां त्यास त्याने ताडन केलें. हें असें करणें मोठें दांडगेपणाचें आणि दुष्ट कर्म होय, तथापि त्याविषयीं गिल्ला सांगायास अथवा शिक्षा करायास, राजपुत्राचें अथवा त्याच्या पित्याचे भीतिस्तव बहुतेकांस अवसान झालें नसतें. परंतु आपलेंजें कर्तव्य तें सरविलियम् गासकोईन् यास कळत होतें म्हणून कसेंहीं जोखीम झालें तरी आपल्यास जें कर्तव्य तें करावें असा त्याने निश्चय करून राजपुत्राची कैदेंत निरवणूक करण्याकरितां तत्क्षणीं हुकूम केला.

त्यासमयीं त्या अपराध्यानें आपली चुकी समजून तो हुकूम मानिला, कां तर कोणाचे पदवीमुळें त्याजवर इनसाफांत कृपा होऊं नये असें जाणायापुरती त्याच्याठायीं समजूत होती.

ही हकीकत राजास विदित झाल्यानंतर जी त्याने वागणूक केली तीतरी थोडे आश्चर्य पावावयाजोगी नाहीं "कायदे बजाविण्याविषयीं धैर्य करून युक्त असा न्यायाधीश माझ्याकडे आहे तस्मात् मी सुखी, आणि असली शिक्षा कबूल करून घेणारा पुत्र मला आहे तस्मात् मी विशे

ष स्करवी," असें तो मोठ्याने बोलिला.

## आपल्या सत्यनिष्ठेने निवडून नेमणूक करणारा.

स्कादलांडांत राजसंबंधी नगरें असतात, त्यांकडून पार्लमेंट सभेंत प्रतिनिधींची नेमणूक करायासाठीं च्यारच्यार पांच पांच असीं एकत्र मिळविलेलीं असतात. प्रत्येक च्यार अथवा पांच नगरें एकएक प्रतिनिधी निवडून नेमितात. पूर्वीं दरएक नगरांतील निवडून नेमणूक करणारे अथवा अनुमत देणारे नगरसभेचे गृहस्थ असत. हे दरएक प्रकरणांत सोळा किंवा अठरा असत. जर निवडून नेमणारीं नगरें च्यार असलीं आणि दोघांचें अनुमत एका उमेदवाराविषयीं आणि दोघांचें दुसऱ्याविषयीं पडलें तर त्यांतून जड अथवा द्विगुण अनुमत देऊन त्या नेमणुकीविषयीं उलगडा करून घेत. असा हा द्विगुण अनुमत देण्याचा अधिकार दरएकास पाळीप्रमाणें प्राप्त होई.

सन १८०७ तांत पार्लमेंटाच्या सभासदांची साधारण नेमणूक होऊं लागली त्यासमयीं असें घडून आलें, कीं ज्या नगराकडेस जड अनुमत देण्याचा अधिकार होता, त्या नगरांत दोघां उमेदवाराविषयीं सभेच्या गृहस्थांचे समविभाग झाले म्हणून त्यां दोघांतून कोणास निवडून नेमावें हें एका मनुष्याच्या अनुमतावर राहिलें. तो मनुष्य एक गरीब लोहार होता. तेव्हां त्यां दोघां उमेदवारांतून एकाचे कारभारी या गरीब कारागिराचें अनुमत संपादन करण्याचा उद्योग करायास याजकडेस गेले. तेव्हां याने निष्कपटाने त्यांस विदित केलें कीं दुसऱ्या उमेदवाराविषयीं म्या संमत देण्याचा निश्चय केला आहे. त्यावरून याच्या त्या निश्चयाचा पालट करण्याविषयीं

यास प्रवृत्त करायास त्यांस जीजी सबब सुचली तीती ते बोलिले, पण कांहीं होईना. तेव्हां ते यास सूचना करूं लागले कीं जर तूं आमच्या मित्राविषयीं संमत देसील तर त्याचें बक्षीस तुला चांगला रोजगार मिळेल, आणिखी तुझ्या मुलांबाळांची सोय केली जाईल. असेंही असतां हा आपल्या अभिप्राया विषयीं सुस्थिर राहून याने ह्मटलें कीं अनुमत देण्याचा अधिकार हा एक ठेवा होय. हा माझ्या गांवकऱ्यांच्या हिता करितां मजकडे सोपिला आहे. याजकरितां त्यांचा सर्वोत्कृष्ट फायदा व्हायासारिखी जी रीत माझें अंतःकरण मला सांगेल त्या रीतीने त्या अनुमताची योजना करणें मला प्राप्त आहे. माझ्या स्वतांच्या लाभाकरितां अथवा कोण्याएकाद्या मनुष्यास संतोषवायाकरितां ही गोष्ट आहे असें नाहीं; ह्मणून तुह्मी सांगतां तसी योजना मी करणार नाहीं. असें तो बोलिला तथापि ते कारभारी आग्रहच करूं लागले आणि त्यानी पुढील मेहेरबानीविषयीं जीं आपलीं वचने दिलीं होतीं त्या शिवाय ते रोख पैक्याची एक मोठी रकम यास देऊं लागले, परंतु त्यांस पूर्वींसारिखेंच अपयश मिळालें. मग त्यानी ती पांचहजार रुपयांची रकम दहा हजारां पर्यंत वाढविली आणि दहा हजारांपासून पंधरा हजारांपर्यंत वाढविली, पण सर्व व्यर्थ झालें. पाहिलें असतां या गरीब मनुष्याने आपलें अवघें आयुष्य प्रमाणिकपणें उद्योगांत घालवून जें जमविण्याविषयीं आशा धरिली असेल त्यापेक्षां यांतून लहान रकमही फार मोठी होती. नंतर ते निरोप घेऊन गेले, मग जो आपलें सत्य स्मरून याला कांहीं लांच कबूल केल्याशिवाय राहिला होता असा जो प्रतिपक्षी उमेदवार त्याजविषयीं याने दुसऱ्या दिवसीं आपलें संमत दिलें.

---

जो कोणी प्रमाणिक तोच ज्ञानी अथवा निर्भय या मोठ्या खरेगे
ष्टीचा जर मनुष्य विच्यार करितील, तर उभयतास ह्मणजे जनास व स्व
तां त्यांस अनिर्वचनीय हित होईल. म्या आपल्या देशास कायती स्वस्थ
च संकल्पिली आहे, आणि माझा अंश माझे रारवाडीपेक्षां विशेष राहण
र नाहीं तेव्हांही तें कल्याण इंग्लांड अनुभवो.

सरवाल्टर स्कत.

---

## कर्जाविषयींस्वानुभविकपणा.

कोणीएक लवकर पैका दिल्यावांचून दुसऱ्यापासून काहीं चाक
घेतो अथवा काहीं विकत घेतो, तरजी पैक्याची रकम देणें राहिली ती कर्ज
होतें; आणिजो कोणी चाकरी घेतो अथवा विकत घेतो तोकर्जदार होतो; अ
णि तो दुसरा असामी घेणेदार होतो.

व्यवहारांत दोघां असामीस सोईची गोष्ट घडावी ह्मणून एके असा
मीस दुसऱ्याचें देणेदार वारंवार होणें अवश्य आहे. गृहसंबंधी जें आपलें अ
पुष्य त्याचे व्यवहार चालावे ह्मणून तरी लोकांस कोण्यासमयीं एकमेकाचें देणे
दार व घेणेदार व्हावें लागतें. परस्परांस सोय पडत असल्यास, व ऋण घेण
ऱ्याच्याने मुदतींत त्याऋणाच्या उलगडा होईल त्याविषयीं शंकाकरायाचे
काहींकारण नसल्यास एका मनुष्याने दुसऱ्याचे पतीवर नजर ठेवावी, आ
णि त्या दुसऱ्याने कर्जकाढावें हें केवळ नीट व योग्य आहे. परंतु कर्जाची फेड
करायाची थोडकी उमेद असेल अथवा अगदी उमेद राहिली नसेल अस्या
कोणीएकाने ऋण काढणें हें खोटें आहे. यारीतीने तोमनुष्य दुसऱ्याचें द्र

व्य आपल्या स्वार्थाकरितां वापरीतो. तो दुसऱ्याच्या कष्टावर वांचतो असें होतें. हें वस्तुतः एक नीच चोरीचाच प्रकार होय.

आवश्यक असलें व घेणेदाराचा उलगडा आपल्या हातून होईल असा पूर्ण भरवसा असलातरच भला मनुष्य कर्ज काढितो. तो आपलें ऋण विसरत नाहीं. त्याचें तो काळजीनें स्मरण ठेवितो; आणि त्यास जर ऋणाचें निवारण करण्याविषयीं अकस्मात् अडचण येऊन पडलीतर, तर त्यास त्याबाबद् अंतरीं मोठा खेद होतो. मग शेवटीं एक दमडी राहूं नये अशी साफी करायासारिखा उपाय प्राप्त होईतोंपर्यंत तो आपले प्रयत्न आटोपीत नाहीं.

---

## बारेथचा मार्ग्रेव.

बारेथ म्हणून एक जर्मनी देशीं लहानसें संस्थान आहे, तेथील मार्ग्रेव म्हणजे सांस्थानिक राजा जार्ज लुईस पूर्वी सुमारें शंभर वर्षांमागें होता, त्यास फार ऋण होऊन त्याचें भांडार रितें पडलें. तेव्हां त्यास कोणी सूचविलें कीं आपल्या प्रजांवर नवीन कर बसवावा हाच अडचणीतून आपल्यास मोकळें करून घेण्याचा योग्य मार्ग. यापेक्षां जर कमनेकीचा राजा असतातर नीयायुक्तीचा स्वीकार करण्याविषयीं आशंकला नसता, आपल्या महत्वास व स्वरूपास अनुसरून असायासारिखी हीच एक युक्ति असें त्यास वाटलें असतें. परंतु आपल्यास ऋण होण्याविषयीं आपले लोक कारण नव्हत असायारामानें विच्यार करून त्या कर्जाची फेड करायास त्यांजवर ओझें घालूं नये म्हणून निर्धार केला. मग त्यानें आपल्याकडेस जो सेवकांचा व घोड्यांचा समुदाय निरुपयोगी असून खर्चास कारण असे, त्यास लवकर दूर केलें, आणि तो काटकसरीनें राहण्याकरितां जिनीवा एथें आऊन आ

पल्या नित्याच्या खर्चांतून जो ऐवज साचवूं लागला, त्याची योजना त्या कर्जाची फेड करण्याकरितां करवूं लागला. अवघ्या कर्जाचा आदा झाला तेव्हां तो आपल्या पूर्वस्थितीचा आणि आपल्या लोकांचे द्विगुणित प्रीतीचा अनुभव घेण्याकरितां आपल्या देशीं परत आला.

## डेन्हाम् प्रमाणिक देणेदार.

कोणीसमयीं असें घडतेंकीं कोण्या व्यापाऱ्यास अथवा उद्म्यास व्यापारांत आशाभंग व तोटा झाल्यामुळें आपल्या कर्जाचे एकंदर जमेपेक्षां आपल्याजवळ फार उणा पैका आहे असें अढळतें, मग तें कर्ज देण्याविषयीं मी कधीं समर्थ होणार नाहीं असा तो निराश होऊन आपल्या घेणेदारांस मिळवून आपल्याजवळ जें असेल तें सर्व त्यांस वांटून देतो, त्याजवरून ते बहुत करून त्यास अवघ्याची सूट देतात. असें जो व्यापारी करितो त्यास दिवाळेदार असें ह्मणतात, आणि जो प्रमाणिक दिवाळेदार असेल तो दोषासपात्र होण्यापेक्षां दया करण्यास विशेष योग्य होतो. परंतु असी त्याची इनसाफाचे रीतीनें कर्जापासून साफी झाली तथापि इमानाचे रीतीनें तर जेव्हां त्याच्या अंगीं सामर्थ्य येईल तेव्हां तें अवघें त्यानें द्यावें, हें त्यास जरूर आहे. हें असें करण्याविषयीं समर्थ होणारे दैववान् थोडकेच आहेत, आणि हें असें ज्यांनी केलें असे तर फारच थोडके, परंतु असें जे करितात ते आपल्या त्या आचरणावरून मोठ्या मान्यतेस योग्य होतात.

डेनहाम् ह्मणून एक अमेरिकेचा व्यापारी होता त्याविषयीं डाकूटर फ्रांक्लिन पुढील अपूर्वगोष्ट सांगतो, ती असीकीं, पूर्वीं ब्रिस्तल एथें तो व्यवहार करीत होता, तेव्हां त्याजवर कितीएक लोकांचें देणें थकलें, तेव्हां तोडमोड करून तो अमेरिकेस गेला. तेथें त्यानें व्यापाऱ्याचें जें काम त्याच्याठायीं आपली एकसारि

रवी योजनाकरून थोडक्यां वर्षांत पुष्कळ द्रव्य मिळविलें. मगतो माझ्या बरोबरग लवतांमध्यें इंग्लंडास परत येऊन त्याचेजे पूर्वींचे घेणेदारहोते त्यांस त्याने मेजवानीस आमंत्रण देऊन बोलाविलें, आणि सांगितलेंकीं आपण मजवर कृपा करून माझ्याबरोबर हलकी तोडमोड केली हामी तुमचा उपकार मानितों. नंतर मेजवानीशिवाय दुसरी कशाचीही ते प्रतीक्षा करीत नसतां प्रत्येकजणास पहिल्याने बशीसारतांच तीचेखालीं नदेतां राहिलेले बाकीची अवघी रकम व्याजासुद्धां द्यावी ह्मणून सावकारावर लिहिलेली हुंडी सांपडली.

## मार्किस् वेलेस्ली.

मार्किस् वेलेस्ली, वडयुक् आफ् वेलिंग्टन, यांचा बाप मोर्निंगटन एथील आर्ल याजवर कित्तीएक हजार रुपयांचें कर्ज असतां हा मरण पावला. तेव्हां एका विलक्षण कायद्याच्या बळाने असें झालेंकीं मार्किस वेलस्ली ह्मणून जो याचा जेष्ठपुत्र त्याजवर याचें कर्ज देण्याकरितां काहीं दावा नचालतां तो याचे मालाचा वारिसदार झाला. असें असतांही त्याने आपलें सत्य स्मरून परोटीचे मालाचा पूर्ण उपभोग करण्याचे पूर्वीं सर्व ऋणाची फेड करावी असा निर्धार केला. मग त्याने थोडकीं वर्षें तंतोतंत काटकसरेने आपला निर्वाह करून बापाने केलेल्या कर्जाची एकदमडी नराही अशी त्याची फेड करायापुरता पैका सांचविला.

त्या मयत मानकऱ्याचे घेणेदारांपैकीं एकाने १५०० रुपयांविषयीं मागणें केलें. तेव्हां शोधकरितां या अल्पवयी मानकऱ्यास असें आढळलेंकीं पहिल्याने हाऐवज एका गरीब ज्ञात्यास द्यायाचा होता, त्याने तो कर्जाचा रोखा पांचशें रुपयां इतक्या लहान रकमेकरितां हालीचे मालकाच्या स्वाधीन केला. त्याजवरून हा मानकरी ह्मणालाकीं "तुझ्याबरोबर मी वास्तविकरीतीने

व्यवहारकरीन त्याजपेक्षां मी काहीं अधिक करणार नाहीं." खताचे जे त्यां लेले ते हे पांच शें रुपये आणि तें तुझ्या कबज्यांत आलेल्या मुदतीपासून शि त्याप्रमाणें व्याजाचे हे रुपये. तेव्हां बरोबर पाहतां एका अर्ध्या रुपायावरही अ पल्यास दाबाकरवणार नाहीं असें तो खत बाळगिणारा समजून आपण काहीं गमाविलें नाहीं ह्मणून संतुष्ट झाला. याच्याकडेस अत्यंत मोठ्या विश्वासाचीं में असतां यानेजो थोरपणा व प्रमाणिकपणा विशेषेंकरून दाखविला त्याचें च भाव्याठायीं पूर्व वयांत लक्षण दिसलें; असाहा प्रौढ मानकरी हा इतक्या वरच राहिला असें नाहींतर जो पहिला रोखेवाला त्यास याने शोधून का ढिलें, आणि तो गरीब असें अरळल्यावरून त्यास तो अवघा ऐवज जें मे ठें व्याज चढलें होतें त्या सुद्धां दिला.

---

## नीचरीतीने आपलें हितकरून घेऊंनये याविषयीं स्वानुभविकपणा.

वारंवार असें घडतें कीं जेणेंकरून पैका, अथवा बढती अथवा आ पलें हित आपल्यास प्राप्त करून घेतांयावें आणि ज्यांविषयीं कोणतेंही नी ति शास्त्र मना करीत नाहीं असे उपाय असतात, असेंही असतां ते आपल्य सारिखीजी इतर मनुष्यें त्यांच्या वृत्तींस अथवा स्वाधीस आपकारक अथ वा वस्तुतः नीच व अयोग्य असतात. अश्यां अवस्थांत तर जोकोणी इतरां नी आपल्यासीं अमुकरीतीने चालावें असें पाहायाची इच्छा धरून त्याच प्रमाणें त्यांसीं चालायास अंतःकरणपूर्वक इच्छितो अथवा, आपला स्व त्या काहींतरी मान राखावा असें ज्यास वाटतें, त्याला आपलेंजें कर्तव्य तें

जाणण्याविषयीं उणीव असणार नाहीं. आपल्यास खोटेपणाने सधन करून घेण्याचीजी मोहक संधि तिजपासून तो तत्क्षणीच परतेल.

---

## ज्यार्जडेड.

ज्यार्जडेड ह्मणून एक नाटिंगह्यामशैर गांवीं गरीब मुलगा होता, त्यास एके वृद्धस्त्रीच्या परोपकारेंकरून विद्याभ्यास झाला. नंतर तो चाकरींत असतां आपल्याकडून असा झटला कीं तो एका गृहस्थाकडेस चाकनीस असतां घरांतल्या कारभाऱ्याचे जागेविषयीं याची शिफारस झाली. तेथें हा धन्याच्या मोठ्या विश्वासाच्या जागेवर असतां याचा तंतोतंत प्रमाणिकपणा व कामाकडेस लक्ष्य असे, त्याजवरून हा आपल्या धन्यास कृपापात्र झाला. त्यासमयीं याचें रमणीय स्वरूप व रीतभात यांजवरून तर याच्या धन्याची एक उपवर बहीण होती तिला हा फारच प्रीतिपात्र झाला. ती याजविषयीं आपला भर अस्यारीतीने दाखवूं लागली कीं तिच्या मनांतील भाव कोणता याविषयीं गैर समजूत होउं नये.

जर डेडाने या तरूण स्त्रीच्या अविचारास दिलासा देउंन तिसीं गुप्तरूपें लग्न केलें असतें तर याचे मोठी हिताची गोष्ट झाली असती. तिचे गुणाचेंजें यास ज्ञान झालें होतें व प्रपंचांत आपली उठावणी करण्याविषयीं जी यास इच्छा होती तीणेंकरून तेंतसें करावें असा यास मोह प्राप्त झाला; परंतु पुनः याने विचार केला कीं प्रपंचांत आपला उदय करण्याविषयीं हा सरळमार्ग नव्हे आणि म्या त्या कुलीनस्त्रीसीं लग्न केलें असतां तें आपल्या यजमानास व तीच्या इतर सर्व सोयऱ्यांस मोठें दुःखाचें कारण होईल, कारण कीं अस्या सोयरीकीमुळें आत्मीमानहीन झालों असें त्यांस वाटेल. याजकरितां ही गोष्ट आपल्या यजमानास कळवावी, आणि त्या कुलीनस्त्री

ने प्रीतीसमीपजो असाअयोग्य त्यामजपासून तिचें मन फिरविण्याच्या उपाय करण्या विषयीं त्यास विनंती करावी हा आपला धर्म होय असें त्यास त्याने स्वानुभवाने दर्शविलें. असाजो थोरपणास उचित मनाचा निग्रह, व प्रमाणिकपणा, तेणेंकरून चमत्कार वाटून त्यागृहस्थाने आपले बहिणीस तेथून दूर पाठविलें आणि डेउयास प्रसिद्ध कारखान्यांत इच्छिण्याजोगी एक असामी लौकरच मिळवून दिली. तेथें हाआपल्या बुद्धिसामर्थ्याने व उद्योगाने लौकर वाढला. बहुतवर्षे गुजरली नाहीं तंवत्यास आपण कमी असें न वाटतां त्याने त्याकुलीनस्त्रीचें पाणिग्रहण करावें अशेस्थितींत तो आला. मग त्या एक्याविषयीं तिच्या भावाने तत्क्षणीच आपलें अनुमत दिलें, आणि तें सर्वजणास सुखकारक झालें.

---

## चोरव्यवहार करण्याविषयीं स्वानुभविकपणा.

विकत घेतां, विकत देतां व इतर सर्वप्रकारच्या व्यवहार करितां, आपण परस्परें कोणत्याही प्रकारें ठकवूं नये अथवा प्रतारणा करूं नये.

व्यापारी ज्या वजनानी आणि मापानी व्यवहार करितात तीं भाराने कणा इतकीं अथवा रुंदीने केशाइतकीही उणी असूं नयेत. मालाचें वास्तविक स्वरूप आच्छादूं नये. मालाचें स्वरूप असेल त्याप्रमाणेच त्याची किंमत मागावी, आणि त्यापेक्षां काहीं उणें घेऊं नये.

आणखी असें आहे कीं विकत घेणारास अढळलें कीं विकणार चुकून ठरलेल्याहून अधिक माल अथवा चांगला माल देत आहे तर ती चुकी त्याने त्यास कळवावी; जर विकत घेणाराच्या घरीं माल पाठवून दिल्यानंतर ती चुकी

त्यास अढळलीतर त्याने अधिक पाठविलेला माल परत करावा, अथवा ती चुकी नीट होईसें करावें.

कित्येकांस असेंवाटतेंकीं सौदा ठरवितेवेळेस दुसरेअसामीस साधलेंअसतां ठकवावें हें नीट आहे. आपण असें कल्पावेंकीं अ आणि ब हे दोघे व्यवहार करणारे असामी त्यांतून अला असेंवाटतेंकीं माल चांगल्याप्रकारचा आणि त्याचें मान पुरतेपणी आहे किंवा नाहीं अथवा दुसराकाहीं जिन्नस जसा दाखविला होता तसाच किंमत ठरावून दिला किंवा नाहीं याची चौकशी करणें हें बचें काम होय. याकरितां बला ठकविण्याविषयीं आपल्यास मोकळीक आहे आणि ब आपल्यास ठकवून घेईलतर त्याचा ठपका त्याच्याच कडेस लागेल. आणखी बला ठकवावें हें नीट असें समजायास तो अविशेषेंकरून प्रवृत्त झाला असतो, कांतर त्या बला साधलेंअसतां तो आपल्यावर आपला दशक चढवील. हा असा तर्क करणें हें अवघें दुष्टकर्म होय. आपल्या शेजाऱ्यास भुलवून, ठकवून अथवा प्रतारणाकरून कोणी मनुष्य रास्त ठरणार नाहीं. जर अला ब ठकवील तर अने ठकवावें त्यापेक्षां आपण ठकलें जावें हें बरें. मालाचे वास्तविक किमतीचा खचीतपणें ठराव होत असलातर त्यापुरतीमात्र सौद्याबद्दल तकरार करणें नीट आहे.

ठकविण्याने कोणीएक कधीं नांदतो असा विरळा. जर त्यास कायद्याप्रमाणें पक्षतचार शिक्षा नझालीतर त्यास त्याचे शेजाऱ्यांपासून शिक्षा होती. ज्याने एकदां त्यांस ठकविलें, त्यासीं ते पुनः व्यवहार करायास भितात. ते त्यासीं व्यवहार करणें टाळितात, त्याचा धिक्कार करितात, शेवटीं त्यास असें अढळतेंकीं कार्यसिद्धिप्रत निश्चयेंकरून नेणारा असा एक प्रमाणिकपणाचा मार्गमात्र होय.

## दुकानाधरला एक प्रमाणिक मुलगा.

खेड्यांत राहणाऱ्या एका ग्रहस्थाने आपल्या लेंकास न्यूयोर्क एथें कोरड्या जिनसांच्या एका व्यापाऱ्याकडेस ठेविलें. तेथें त्याचें काहीं दिवस नीट चाललें. शेवटीं कोणीएक कुलीनस्त्री रेशमीपोशाक विकत घ्यावयास वखारींत आली, तेव्हां तो मुलगा तिच्याजवळ उभाराहिला. मागितलेलें मोल कबूल झाल्यानंतर तो तें कापड उघडूं लागला. तें काम पुरें झालें नाहीं तंव त्या रेशमी वस्त्रास छिद्र होतें तें त्याचे दृष्टीस पडलें. तें त्यास्त्रीस दाखवून तो बोलिला बाईसाहेब या रेशमीकापडास हें एथें छिद्र पडलें आहे हें आपल्यास सांगावें हा माझा धर्म होय असें मी समजतों. मग सहजच तिनेतें घेतलें नाहीं.

त्या व्यापाऱ्याने तें बोलणें ऐकून तत्क्षणींच त्यामुलाच्या बापास लिहिलें कीं तुह्मी येऊन आपल्या मुलास घरीं घेऊन जावें, कांतर याचे हातून व्यापार कदापि व्हायाचा नाहीं.

बापाचा आपल्या पुत्रावर पहिल्यापासून विश्वास असे. तो फार खिन्न होऊन आपल्या पुत्राच्याठायीं काय उणीव आहे तें समजून घ्यायाकरितां त्वरेने शहरांत आला. आणि "याचे हातून व्यापार कां व्हायाचा नाहीं." असें पुसूं लागला.

याचें असें उत्तर झालें कीं यास दुसऱ्याचें धोरण ठेवण्याची हातोटीच नाहीं. तुक्के दोन दिवसावर एक कुलीनस्त्री यापासून रेशमी कापड घेत होती, तिला याने माल बिघडलेला आहे असें आपल्या आपणच सांगितलें; त्यावरून मासा सौदा फुकट गेला. माल विकत घेणारानी आपली आपण चोकशी करावी. खोड असेल ती जर त्यानी शोधून न काढली तर खोड आहे असें म्यां त्यांस सांगणें हा माझा मूर्खपणा होय.

पित्याने पुसलें कीं हाच काय तो त्याचा अपराध? त्याचें व्यापाऱ्याने उत्तर दिलें होय हाच. दुसऱ्या गोष्टींनी तो फार चांगला आहे.

तर मग पूर्वीपेक्षां आतां मी आपल्या पुत्रावर अधिक प्रीति करीन. तु ह्मी हें वर्तमान मला सांगितलें त्याजवरून मी तुमचा उपकार मानितों. मला दुन या मिळाली तरी मी त्यास तुमचे चरवारीत आणरची एक दिवसही ठेवणार नाहीं.

## बंदुकीचे दारूचें पीक.

उत्तर अमेरिकेंतील मिसोरी नदीजवळ राहणारे जे लोक त्यांचा युरोपांतील लोकांसी थोडाच व्यवहार असे, तेव्हां शंभरापेक्षां जाजती वर्षांवर एक व्यापारी, त्यांच्या देशीं जाऊन त्याने त्यांस अग्न्यस्त्रांची वोळख करून देऊन कितीएक बंदुकी व बंदुकीची दारू त्यांस देऊन त्याबद्दल त्यांपासून लोंकरीचीं कातडीं घेतलीं. तसाच व्यापार करावयास काहीं काळाने एक फेन्च, बंदुकीचे दारूचें भांडवल घेऊन त्यांच्या देशीं गेला, तेव्हां त्यास अढळलें कीं त्या लोकांच्याजवळ अजून दारू पुष्कळ आहे ह्मणून जाजती दारू घ्यावयास त्याच्याने त्यांस प्रवृत्त करवेना असें झालें. तेव्हां या असे अडचणींत त्यां गरीब लोकांसीं नीच वंचना करावी असा यास मोह प्राप्त झाला. ही बंदुकीची दारू एक बीं आहे, हें जमीनींत पेरिलें ह्मणजे हें बाजरी सारिखें उगवेल, असी याने त्यांची समजूत केली. त्यावरून त्या लोकांनीं आपल्याजवळ जी दारू होती ती अवघी पेरली आणि त्याजवळून दुसरीही जाजती घेऊन त्याबद्दल त्यास कातडीं, व लोंकरीचीं कातडीं असीं दिलीं.

मग वनपशूंपासून त्या शेताचें रक्षण व्हावें ह्मणून त्यां लोकांनीं राखण बसविली आणि दारू उगवली किं नाहीं ह्मणून ते वारंवार जाऊन पाहूं लागले. नंतर त्यांसीं जी ठकबाजी केली होती त्याविषयीं बहुत काळ न होण्याच्या पूर्वींच

संशयवाटूं लागला, आणि काहीं शेतिक दृष्टीस पडल्यावांचून अवघा ऋतु निघून गेला त्याजवरून ती प्रतारणा निस्संशयेंकरून त्यांच्यामनांत राहिली. ते इंदियन् लोक झालेतरी ते बहुत्येक लोकांसारिखे एकदांच फसले जातील. नंतर काहींकाळाने त्यांस आपण दुसरी भेट द्यावी असें तर त्या वंचनाकर्त्याच्या मनास आलें नाहीं पण त्याने आपल्या भागीदारास उत्तमप्रकारच्या व मत्तवार लाविलेल्या अस्या मालाच्या प्रती लाऊन देऊन मिसोरीस पाठविलें. तेव्हां त्या लोकांस कोण्याएकाद्वारें शोध लागला कीं ज्यामनुष्याने आमची प्रतारणा केली होती त्याचा या फ्रेंच्यासीं सहवास आहे, परंतु याचे मित्राने जो विश्वासघात केला होता त्याविषयीं तेयास काहींच बोलिले नाहीं. त्यानी गावांच्या मध्यभागीं एक सर्व सत्तेची झोंपडी होती ती यास गट्ठे ठेवायास दिली, तेथें याने ते सर्व जिनसाबद्दल जिन्नस देण्यासाठीं मोठ्या डोलाने मांडून ठेविले. इतक्यांत बंदुकीचे दारूची पेरणी करावी असी ठकबाजी ज्यांमनुष्यासीं केली होती ते सर्व जमून एक्याच धांदलीने त्या फ्रेन्च्याचे वखारींत शिरले आणि जें ज्याचे मर्जीस चांगलें वाटलें तें तो आपल्याकरितां घेत रुरला. असें एक्यानिमेषांत अवघाभरणा दिसेनासा झाला. तेव्हां तो फ्रेन्च पाकामाविषयीं मोठ्याने गिल्ला सांगून मोठ्या मुख्याजवळ दाद मागायास गेला. मुख्याने मोठ्या गंभीरपणाने उत्तर दिलें कीं तुझ्या इन्साफासाठीं बंदुकीचे दारूस पीक येईतोंपर्यंत तुला थांबावें लागेल. तें पीक आलें म्हणजे तुझा इन्साफ होईल. आणखी तो असें म्हणाला कीं माझे रयतेस एका फ्रेंच्याने तो जिन्नस पेरायास सल्ला दिला. त्याची कापणी झाली म्हणजे सर्वजण एक मोठी शिकार आरंभितील आणि जीं कातडीं मिळतील तीं अवघीं तुह्मी जे हालीं त्यांस भेरायास आलां आहां त्या तुह्मांस तुमच्या मालाबद्दल व तुमच्या गांवकऱ्याने जी सल्ला दिली त्याबद्दल देतील. त्याजवरून

तो फ्रेन्च निश्चयाने बोलूं लागला कीं फ्रान्सदेशीं तर बंदुकीची दारू उगवून वाढती परंतु या मिसोरीदेशीं दारू उत्पन्न व्हायासारिखी भूमि नव्हे ह्मणून यादेशीं कापणी करायासारिखें तें पीक कधीं होणार नाहीं. असल्या त्याने ज्या उपपत्ति सांगितल्या त्या सर्व व्यर्थ झाल्या. मग तो आला होता त्यापेक्षां फार हलका होऊन परत गेला. आणि नीतिप्रकरणी जें आपल्यास कर्तव्य त्याविषयीं रानटीलोकांनी आपल्यास शिक्षा लाविली ह्मणून मोठा लज्जित झाला.

फ्रेन्चाच्या अप्रमाणिकपणाचा परिणाम एथेंच थांबून राहिला नाहीं, तर ते इंदियान् फ्रान्स देशींच्या कोणीएकासीं पुनः कदापि व्यवहार करीतना असें झालें, त्यामुळें त्यां लोकांचा फ्रान्सदेशासीं व्यापार होणें अगदीं नाहींसा झाला. असे परिणाम असत्य व्यवहारापासून वारंवार होत असतात. इंग्लंडांत एका ग्रांतीं एक कलाबतू करीत, त्याची कित्येक वर्षें झालीं अखेरी होऊन गेली. कां तर हा जिन्नस दिसण्यांत चांगला दिसावा परंतु वस्तुतः पाहतां तो बगर किमतीचा, असा सहजांत करितां येत असे ह्मणून फार करून तसा करीत असत. त्याणेकरून लोक वारंवार फसूं लागले ह्मणून शेवटीं त्यानी हें कलाबतू वापरायाचें अगदीं सोडून दिलें. होस अफ्कामनू यास भेमध्यें थोडक्या वर्षांपर असें बोलणें झालें कीं अवघ्या ब्रिटन देशीं जितक्या चाकाची गरज आहे तितका सर्व ऐर्लंडांत उत्पन्न होईल, असें असतां ही तेथें बहुत्येक चाक बाहेरून येऊं लागला, आणि ऐर्लंडाचे चाकापेक्षां त्याची किमत जाजती देऊं लागले. याचें कारण असें आहे कीं ऐर्लंड चा चाक वजनांत अधिक भरावा ह्मणून त्याच्या गुंडया पाण्याने भिजवीत अथवा त्यांत चिखल भरीत. त्या ओलसरपणामुळें असें होई कीं तो पदार्थ तापून त्यास विकार होई. व्यापारासीं ज्यांचा संबंध असे कोणी थोडके असल्याने

चालूं लागले ह्मणजे विकत घेणारानी प्रत्येक जिन्नस विकत घेण्याच्यापूर्वी पाहून घेणें जरूर होतें, असे पाहणीस अवकाश आणि मेहनत लागती, हीं व्यवहारांत पैक्याचसारिखीं आहेत. याजकरितां जो माल चांगला साबूत असी ज्याविषयीं खात्री आहे त्याविषयीं व्यापारी जितके देईल तितकें ज्याविषयीं त्याला संशय वाटतो त्याविषयीं तो देणार नाहीं, आणि व्यापाऱ्यांतून आपल्या पसंतीस येईल त्यासीं व्यवहार करावा असें घडूं आल्यास जो प्रमाणिक असेल त्यासीं तो व्यवहार करायास इच्छील. कलाबतू करण्याच्या कामासारिख्या कित्तीएक प्रकरणांत फसविल्यामुळें असा मोठा अनर्थ होतो कीं लोक तो व्यापार अगदी सोडून देतात. सारांश अवघा व्यवहार रास्त असावा ही कित्ती थोर गोष्ट आहे हें आपल्या लक्ष्यांत सहजांत येतें.

तुह्मी आपल्या द्वारांतून बाहेर पहा, त्या मनुष्याकडेस अवलोकन करा, पहावें तो कित्ती तळमळ, कपट, चुकवाचुकव करीत आहे. हा मनुष्य साध्याव्यवहाराचा असें यास मानावें या इतक्याच करितां तें तसें करून घेण्याविषयीं समाधान मानितो. तीन कणा इतक्या प्रमाणिकपणाने अवघ्या श्रमापासून याचें रक्षण होईल.

स्तुर्न कृत.

खरें मन आणि उदार प्रीति यांच्याठायीं जगांतील सर्व रुघटितपणापेक्षां विशेष सौंदर्य आणि मोहकत्व आहे आणि एका कणा इतका प्रमाणिकपणा व स्वाभाविक योग्यता यांची किंमत दैवयोगाने प्राप्त जीं सर्व भूषणें, वतनें, व प्रतिष्ठा यांच्यापेक्षां अधिक आहे. ज्यांच्याकरितां कितिएकजण चांगल्या

प्रकारचे असतां वारंवार वंचक होतात,आणि नीच, भित्री, चुकवाचुकव करणारी जी देखणाऊ दास्याची स्थिति तिच्याकरितां आपले वागुणुकीचें धोरण सोडून आपली प्रतिष्ठा व आपला मोकळेपणा टाकून देतात.

शाफ्ट्स्बरी कृत.

---

## आपलें वचन राखण्याविषयीं स्वानुभविकपणा.

बहुतकरून सर्वदा असें घडतें कीं कोणी एकाने वचन दिलें असतां त्या त्यात्या शब्द पाळण्यासीं दुसऱ्या कोणा एकाचा अथवा अनेकांचा संबंध असतो. हा बोलल्यासारिखें करील असी ते दुसरे जण त्याजविषयीं प्रतीक्षा करून ते त्याप्रमाणें आपल्या व्यवहाराची बहुधा योजना करून ठेवितात. याकरितां हा त्यांचे प्रतीक्षेस कारण होत असतां याने तसें तंतोतंत न केलें तर त्यांचा आशाभंग होतो, आणि त्यांचे कामाची मोठी अव्यवस्था होती. लहानपणीं असें असावें कीं आपण जो करार केला असेल तो जर दुष्ट कर्मपर नसला, आणि तो जरी आपल्यास अहितकारक असा वारत असला तथापि तो काळजीने पुरा करावा; कां तर एखादें वचन कितीही हलके गोष्टीविषयीं कां असेना पण तें जर आपण आपल्या आयुष्याच्या त्याकाळीं तुच्छ मानीत गेलों तर पुढें विशेष मोठे करार मोडण्याची आपल्यास सवई लागेल. याप्रमाणें आपल्यास जे ओढवितात त्यां अवघ्यांच्या क्षोभ व धिक्कार आपण आपल्यावर ओढून आणूं.

---

## मूर आणि स्पानियार्ड.

वर्षांच्या कितिएक शेंकड्यामागें मोरोको देशींचे जे मूरलोक त्यांकडेस स्पेनदेशाचा कांहींभाग असे. तेव्हां एकास्पानीश ग्रहस्थाचा एका उतल्मचयी मूराशीं अकस्मात् कज्या होऊन हा त्यामूरासजीवें मारून तत्क्षणींच पळाला. यास धरायास याच्यामागें जे धांवत होते त्यांस समजूं नदेतां याने एक बाग पाहून हा त्या बागेचे भिंतीवरून पलीकडेस उडाला, आणि त्या बागेच्या धनी कोणी मूर तेथें होता त्यासपाहून मला लपवून ठेवावें असे त्याच्याजवळ मागणें केलें.

मूरलोकांची असी चालअसेकीं ज्याने त्यांच्या बरोबर कधीं खाल्लें असेल त्याचें त्यानी रक्षण करावें. तेव्हां यास्पानीयार्डाची याच्या निर्भयाविषयीं खात्री करण्याकरितां त्यास त्या बागेच्या धन्याने पीच ह्मणून एक गोड फळ खायास देऊन आंधार पडतांच विशेष निर्भयस्थानी निसटून जाण्याची तुह्मी आपली सोय करा असें यास सांगून ग्रीष्म ग्रहांत यास ठेवून कुलूप घातलें.

मग तो भला मूर आपल्या घरीं जाऊन बसला आहे इतक्यांत स्पानियार्डानें नुकाच मारिलेलाजो त्याचा पुत्र त्याचें प्रेत घेऊन लोकांचा एक मोठा रगडा मोठ्याने आक्रोशकरीत त्याच्या दरवाज्याजवळ आला. तेव्हां माझ्या पुत्राचा ज्याने जीव घेतला त्याच मनुष्यास रक्षणाविषयीं म्या नुक्ता दिलासा दिला, असा त्या मूरास लवकरच शोधलागला, तथापि त्याने आपल्या वचनांत अंतर पडूं दिलें नाहीं. मग त्यासमयीं तो कोणह्मासीं कांहीं न बोलतां संध्याकाळीं आपल्या बागेंतील बंगल्यांत जाऊन त्यास्पानियार्डास आरामकरून आपला एक अत्यंत पळणारा घोडाहोता त्यावर बसवून ह्मणाला "अरे ख्रिस्ती ज्यामनुष्यास त्वां मारिलें तो मा

झापुत्र. याबद्दलत्वां भोगावें हें नीट आहे, परंतु त्वां माझ्या बरोबर रचिलें आहे, त्यापेक्षां मला माझें वचन पाळणें अवश्य आहे. तुजवर जों पर्यंत रात्रीचें आवरण आहे तों तूं पळून दूर जा, प्रातःकाळापूर्वींच तूं निर्भय होसील. तुजवर तर माझ्या मुलाचें हत्येचा दोष आहे, परंतु तुझे हत्येविषयीं मी निर्दोष आहें. म्या ज्या विश्वासाचा तुसीं करार केला होता त्याचें रक्षण झालें ही मजवर ईश्वराची कृपा आहे.

## फ्रान्सदेशींचा ज्यान् राजा.

फ्रान्सदेशींचा ज्यान् म्हणून राजा होता, यास एड्वर्ड धि ब्लाक् प्रिन्स याने लढाईंत धरून कैद करून इंग्लंडास आणिलें. तेथें हा च्यार वर्षें कैदेंत राहिल्यानंतर असें झालें कीं इंग्लंडच्या राजाच्या बोलण्याप्रमाणें सल्ला करण्यास याच्या प्रजा कबूल करीत असें त्यांस प्रवृत्त करण्याविषयीं प्रयत्न करावयास यास आपल्या देशीं जाऊं दिलें. इंग्लिश राजाकडून कितीएक गोष्टीविषयीं बोलणीं गेलीं त्यांत एक होतें कीं फ्रेन्च राजाच्या सोडवणुकेबद्दल चाळीस लक्ष स्वर्णमुद्रा याव्या, परंतु हीं बोलणीं फ्रान्स देशीं स्वप्रसन्नतेने कबूल न झाल्यामुळें सल्ल्याप्रमाणें वहिवाट घडून आली नाहीं.

आपली मोकळीक व्हायाकरितां जो ऐवज पाहिजे तो आपले लोक देत नाहींत असें ज्यान् राजास जेव्हां अटळलें तेव्हां त्याने फ्रान्सदेशीं राहण्याचा निश्चय केला नाहीं. पाहिलें असतां असें बहुत्येकानी केलें असतें. तेव्हां याने इंग्लंडदेशीं लौकर परतून आपला देह पुनः एड्वर्ड राजाच्या स्वाधीन करावा, असा ठराव केला. त्याजवरून याचे जे मंत्री होते त्यांतून कितिएकानी त्या मार्गास विरुद्ध असी यास सल्ला दिली, परंतु त्यांची मसलत याजकडे चालली नाहीं. तेव्हां हा असें म्हणाला "अहो विश्वास आणि शास्त्रानुसरण हीं जरी पृथ्वी

तील सर्वजागून हांकून लाविली तथापि त्यांस राजांच्या अंतःकरणीं राहण्याविषयीं आसन असावें."

मग तो आपल्या ठरावाप्रमाणें इंग्लंड देशीं परत जाऊन पुनः बंदिवान् झाला. नंतर तो लवकरच लंडन शहरांत मरण पावला.

## स्वैच्छिक अपकार वर्जण्याविषयीं स्वानुभविकपणा.

कित्येकजण आपल्या हलक्या अथवा स्वच्छंदी स्वभावामुळें असीं कामें करितातकीं किंचित् विचाराने पाहिलेंतर तीं मोठीं दुष्ट असें दिसून येईल. त्यानी एक चांगलें कुपण पाहिलेंतर ते त्याचा एक तुकडा मोडून काढावयास कांकूं करणार नाहींत. त्यानी नवीन रंगलेली एकादी काहीं खुण पाहिली आणि तेथें हात पोहचला तर तीते आपल्या बोटानी खराब करतील. त्यांस एका गृहस्थाचे बागेंत येऊं दिलें तरते झाडें आणि बसका मोडितील अथवा त्यांजवर काहीं कोरितील. जेथें पहावयासारिखीं चांगलीं चित्रें अथवा दुसरे दुमदार पदार्थ अस्या घरांत त्यास जाऊं दिलें आणि त्यानी जमीन घाणीने भरली आणि सामान व्यस्ताव्यस्त करून राखिलें तथापि त्यांस त्याची काहीं काळजी वाटणार नाहीं. जर ते चांगला मळा पहावयास गेले आणि तेथें रखवाली नसली तर खोदलेली जमीन पायांखालीं तुडवायास आणि फुलें व फळें तोडायास त्यांस शंका वाटणार नाहीं. जो दुसऱ्याचा माल व ज्यापासून त्याला नित्य आनंद होत आहे, त्याची असी नासाडी करणें हें मोठें नीच दुष्टकर्म होय. बहुतकरून आणखी असें पडतेंकीं उतारवाड्यांत उपहाराकरितां कोणी खायाप्यायाचे पदार्थांतून काहीं खिस्यांत उतरितात. यका-

हीं खराबकरून टाकितात. हीं असीं दोन्हीं कर्मेंहीं हलक्यागोष्टी असें कोणी बोलो परंतु हाएक चोरीचाच प्रकार आहे, कांतर आल्यागेल्याची जी योग्यवासना ती त्याकाळीं तृप्त करायास जें काय पाहिजे तें पुरविण्याविषयींमात्र त्या दुकानदाराने पत्कारिलें असतें.

आपलें असो अथवा आपल्या शेजाऱ्याचें असो पणजें खराब झालें तितकी प्रजा गरीब झाली, कांतर जीवस्तु खराब झाली तिजपासून कोणाएकासतरी आनंद झालाअसता. काहींएक वस्तु स्वच्छंदपणाने बाहेर टाकून देतां येई इतकें हें जग उपभोगाने भरलेलें नाहीं.

दुसऱ्याप्रकारचा एकस्वेच्छिकअपकार आहे. तोकोणतातर परस्परांसीं अथवा अनपकाऱ्या प्राण्यासीं निर्दयपणें विनोद करणें. यास उदाहरण, कित्येक मुलगे एकमतकरून आपल्या एखाद्या सोबत्यास आंधार असेल असल्याठिकाणी भेडावितात, आणि हाविनोद असें समजतात, परंतु हामोठा दुष्टपणाचा विनोद. कांतर ज्यामुलासीं विनोद केला त्यासतो निश्चयेंकरून फार दुःखकारक व उपद्रवकारक होतो. अस्यारीतीने भेडसाविलेल्या मुलग्यांची कित्येकसमयीं बुद्धि नष्ट झाली आहे. एखाद्या भोळसर मुलास अगदी खोटें सांगून फसविणें यासही कोण्यासमयीं चांगली मोज असें समजतात परंतु हातरीएक करमणुकेचा वाईटप्रकार आहे. आपल्यास कोणी भेडाविलें अथवा फसविलें तरतें आवडत नाहीं म्हणून इत्तरांस भेडावणें अथवा फसविणें हें नीट नव्हे. कुऱ्यांच्या शेपुटांस कथली डबा बांधणें अथवा माजरांसपीडाकरायास त्यांजवर कुत्रे घालणें अथवा पाखरांवर दगड मारणें त्या अवघ्या वाईटप्रकारच्या मौजा होत. कांतर हींकरून अनपकारी जीवांस दुःख होतें, आणि आपल्यास काहीं वास्तविक हित होत नाहीं.

आणखीएक फारच वाईट प्रकारचा स्वेच्छिक अपकार आहे परंतु तो आचरणारे फार थोडकेच दुष्ट असतील. बहुधा असें घडतेंकीं दुसऱ्याविषयीं एका मनुष्यानें आपल्यामनांत वैर धरिलें ह्मणजे तो रात्रीस त्याचीजी राई असेल तेथेंजाऊन त्याचीं लहानलहान झाडेंकापून टाकितो, अथवा त्याचे शेतांत जाऊन त्याचे गुरांस, घोड्यांस मारून लंगडें करितो, अथवा त्याचे कुरणांतली जमीन उखळून टाकितो. असें दुष्टकर्में जे अधम करितात, त्यांचा सर्व सज्जनास वीट येतो आणि ते त्याचा द्वेष करितात.

---

## मधमाशीआणिगांधिलमाशी. कल्पित गोष्ट.

एके गांधील माशीची मधमाशीसीं भेटझाली, तेव्हां ती मधमाशीस बोलिली कीं माझ्याविषयीं मनुष्यांचा इतका दुष्टस्वभाव कां आणि तुझ्याविषयीं तीं इतकीं ममताळू कां याचें कारण आपण कृपाकरून मला सांगाल काय? आपण उभयतां बहुधा सारिख्याच आहों, इतकेंच कीं माझ्याशरीराभोंवते सोन्याचे रुंद घेरे आहेत तेणेंकरून मी तुझ्यापेक्षां फार सुंदर आहें, आपण दोघीजणी पाख चालविणारे जंतु आहों, आपल्या दोघींस मध आवडती व आपल्यास राग आला ह्मणजे आपण दोघीजणी उसतों. असेंअसतां मनुष्यें माझा नित्य द्वेष करितात आणि मला जीवें मारायास यत्न करितात. पाहिलें असतां तुझ्यापेक्षां मीत्यांसी अधिक परिचित आहें. मी त्यांच्या घरीं, व त्यांच्या च्याहा प्यायाच्या मेजावर व त्यांच्या अवघ्या जेवणांत त्यांस भेटतें: तूं फार संकुचित आहेस आणि बहूतकरून कधीं त्यांच्याजवळ येत नाहींस. तथापि बहुतकरून हिमऋतूंत तीं तुला पेट्याने शिवलेलीं असीं टुमदार घरें बांधून तुझी जतनकरून तुला पोषितात, याचें कारण काय? याचें मला आश्चर्य वाटतें.

मधमाशी बोलिली " याचें कारण हेंकीं तुझ्याहातून त्यांचें कांहीं बरें होतना हीं, उलटी तूं त्यांस श्रमकारक च अपकारक आहेस ह्मणून तुला पहावें हें त्यांस आवडत नाहीं. मीतर त्यांच्याकरितां मध करण्यांत अवघादिवस गुंतली असत्यें असें तीं जाणतात. ज्यांत स्वागत होत नाहीं अस्या भेटीदेण्यांत तूं थोडकाच वेळ घालविशील, आणि आपला दुसऱ्यास उपयोग होई असा यत्न करण्यांत अधिक काळ घालविशील तर बरें होईल.

## हत्तीआणिशिंपी.

हिंदुस्थानांत कोणीएक शिंपी एक लहानसें छप्पर घालून व खिडकी रस्त्याकडेस उघडी ठेवून आपला धंदा चालवितो एकादिवसीं फारचांगलीं वस्त्रें शिवण्याचे कामांत होता. तेव्हां एक हत्ती त्यामार्गानें पाणी प्यावयास जातअसतां त्यानेंकाहीं अपकार कराचा असा भाव नधरितां त्याशिंप्याचे खिडकींत आपली सोंड घातली, इतक्यांत त्या शिंप्यानें उगीच आपल्या स्वेच्छिकपणानें सोंडेस सुई टोंचली. त्याजवरून त्या हत्तीनें आपली सोंड त्वरेनें मागें ओढून तो पाण्याकडेस सरकन गेला. आपल्यास न खिजवितां केलेलें व दुष्ट असें हें शिंप्याचें कर्म यास कसा दंड झाला तो तुह्मी पाहाल. तो हत्ती आपले सोंडेंत व तोंडांत पुष्कळ पाणी घेऊन त्या शिंप्याचे खिडकीजवळ पुनः लौकरच प्रकटला, आणि त्यानें त्याजवर तें अवघें पाणी उडवून त्यास अगदी भिजवून तोजीं चांगलीं कापडें शिवींत होता, तीं खराब केलीं, तेणेंकरून तो आपल्या अवघ्या शेजाऱ्यांच्या उपहासास पात्र झाला.

---

## सत्य.

सर्वप्रसंगीं व सर्वप्रकरणीं सत्य पाळणें व त्यास दृढ धरून असणें हीफार

मोठी गोष्ट होय.

मार्गाने जातअसतां दिवसभर चालल्यामुळें श्रमित झालेल्या कोणी मनुष्यास गावांतील एक मुलगा भेटला, त्यास त्याणें पुसलेंकीं तें पुढचें शहर किती दूर आहे, आणि त्यामुलाने तें तीनकोसअसतां एक कोस आहे असें सांगितलें, आणि त्यावर्तमानावरून उत्साह पावून जर तो मनुष्य पुढें चालला, तरत्या मुलाच्या हातून त्यास मोठी दुरवापत पोंहचेल हें प्रसिद्ध आहे. कारणतो जरतसें नसांगता तर तो मनुष्य मागील गावीं मुकाम करून राहता. कदाचित् तो बापुडा वाटसरू शहरास पोचण्याच्यापूर्वींच श्रमाने थकून पडेल, किंवाज्यापासून बरें होणें कठिण अस्या दुखण्यात तोत्या विशेष कष्टामुळें पडेल. जें काय खोटें तें बोलल्यावरून तो एकटामुलगा याअपकारास कारण होईल.

जर गोविंद आणि गोपाळ यांचे जवळ परस्परें सारिखे दोन चेंडू असले, त्यांतून गोविंदाचा गोपाळाच्या चेंडवापेक्षां किंचित् चांगला असला, वजर गोपाळ खोटा दावा सांगूं लागला कीं गोविंदाकडेस चेंडू आहेतो माझा, आणि गोपाळ ज्यास कोण्यासमयीं मारीत असेल असाजो महादू म्हणून एक तिसरा लहान मुलगा त्यास तिन्हाइतादाखल गोपाळाने पुसलेंकीं मीजें बोलिलों तें खरें किंवा कसें, त्याजवरून तो चेंडू गोविंदाचा असें महादू चांगलेपणीं जाणतअसतां गोपाळाचा आहे असें माराच्या भयाने सांगूं लागला, तर त्या चेंडूचा जो वास्तविक धनी गोविंद त्यास महादूने मोठें नुकसानीचें काम केलें असें होईल. अस्या प्रसंगीं गोविंद बहुत करून आपला तो चेंडू आपल्याकडेस ठेवण्याविषयीं यत्न करील आणि गोपाळतर तो चेंडू त्यापासून बळानेच घेऊं पाहील आणितो गोविंदास कदाचित् मारीलही खरा. तेव्हां त्यांची मारामारी होऊं लागेल, त्याक्षणीं जर पंतोजी बाहेर निघून पुसूं लागलेकीं हाण

मार कोणी आरंभिली. त्यावरून महादू गोपाळाच्याच भयाने बोलिला कीं गोविंदाने, तर महादू मोठ्या दुष्टप्रकारचेंही काही बोलिला असें होईल, कांतर पंतोजीची बहुतकरून गोविंदावर फार गैरमर्जी होईल अथवा ते कदाचित् त्यास काहीं वास्तविक शिक्षा करितील. असा तो महादू आपल्यास त्याएका थोंराच्या धमकीपासून रक्षायाकरितां दोनलबाड्या सांगितल्यावरून मोठ्या अपकारास कारण होईल.

लोकांत प्रपंचाच्या व्यवहारांत लबाडीपासून फार मोठें वाईट होतें. शेजाऱ्याने खोटीसाक्षी दिल्यावरून बहुत्येकांचे जीव गेले आहेत. आतां असें बहुतकरून होत नाहीं, पण कपटी, व दुसऱ्याचें वाईट इच्छिणारे अशा मनुष्यांनी बहुतांविषयीं खोटें सांगितल्यावरून त्यांच्या चांगल्या नावांस, जिनगीस व अनेक स्वार्थांस अझूनही अपाय होत आहेत. याप्रकारें जो कोणी पाजगांत वाईट न करितां बरें करावें असी इच्छा धरितो, त्याने बाळपणापासून सत्यच बोलण्याची आपल्यास सवई लावून घ्यावीही किती थोर गोष्ट आहे हें सहज आपल्या पाहाण्यांत येतें.

खोट्या बोलण्याचे कित्येक प्रकार आहेत; ते अवघे दुष्टपणाविषयीं अथवा अपायाविषयीं एकसारिखेच आहेत असें नाहीं, तथापि ते सर्व सदोष जाणून वर्जावे. प्रायः असें असतें कीं काहीं वाईट अथवा आपल्या आईबापास असंतोषकारक असें वागायासारिखें एखाद्या मुलाने केलें ह्मणजे त्याचा त्याजवर आरोप आला असतां तो नाकबूल जातो. याचें कारण असें आहे कीं टपका अथवा शिक्षा कसी चुकवावी यावांचून तो दुसरा कशाचा विचार करीत नाहीं. तो जर विवेक करील तर काहीं

थोडकें जोखीम होत असतांही सत्य बोलावें हें फार बरें असें त्यास कळेल. कां तर एक लबाडी दुसरे लबाडीकडेस नेती, बहुत झाल्याह्मणजे सवई लागती आणि ज्या कोणास लबाडीची सवई लागली तो पुरुष केवळ अति द्वेष्य होतो. मग तो बोलतो त्यांतला एक शब्द कोणी खरा मानीत नाही.

जसें आपल्यावरला टपका चुकवावयाकरितां लबाडी बोलणें वाईट आहे, तसेंच काहीं वस्तु मिळवायाकरितां लबाडी बोलणें वाईट आहे. यास दृष्टांत, एका लहान मुलास बहुतकरून प्रति शनिवारीं आई एक पैसा देत असतां तिच्यापासून त्यास पैसा मिळाल्यानंतर तो दुसरा पैसा आपल्या बापापासून मिळावा याहेतूने बापाजवळ येऊन जर खोटें बोलूं लागला कीं आईपासीं एक दुगाणी नाहीं आणि मला जो पैसा द्यायाचा तो तिच्याने देववला नाहीं तर तो फजीती व्हायाजोगी लबाडी बोलला आणि त्याने दुसऱ्या पैस्याची केवळ चोरी केली असें होईल.

आपलें रक्षण व्हावें ह्मणोन अथवा शेजाऱ्यासीं आपला द्वेष आहे ह्मणोन खोटें बोलणें हें तर फारच दुष्ट व लाजिरवाणें कर्म आहे.

लोक जें बुद्धिपूर्वक असत्य बोलतात त्याहून दुसऱ्या प्रकारचें एक असत्य आहे, तें प्रमाद, त्वरा अथवा शीघ्र कल्पना शक्ति यांपासून उत्पन्न होतें. ज्यानसन् याच्या मतें असें आहे कीं खरेपणाविषयीं जो अनादर त्यामुळें जसीं बहुत्येक खोटीं बोलणीं होतात तसीं इतरांस ठकवायाचे इच्छेने होत नाहींत. वास्तविक बोलावें याविषयीं लोक पुरतेपणीं चिंता वागवीत नसतात, हें केवळ खरें आहे किंवा खरें नाहीं असा विचार न करितां जें जो घास येईल अथवा जेणेंकरून इतरांस आनंद वाटेल असेंजें त्यांस वाटतें

तें ते बोलतात. आपल्यास करण्याच्या सामर्थ्याविषयीं खात्री नसतां अथवा आपण शक्तिमान् नाहीं असें खचीत कळत असतां दुसऱ्यास खुष करावें या इच्छेने अथवा त्यापेक्षां वाईट हेतूने अमूक मुदतीस काम केलें जाईल असें जें कबूल करणें ती उद्मी लोकांची सर्व साधारण चुकी होय.

आमच्याकडून काहीं अपाय होईल असें मनांत आणिल्याशिवाय बहुत्येक मनुष्यें असें समजतात कीं आमच्या सांगण्याने चमत्कार वाटेल मग तें तसें गाफलपणाने अथवा मतलबानेही बोलतात. तीं जें सांगतात त्यांत कदाचित् काहीं खरेपणा असतो परंतु आश्चर्य वाटावें या हेतूने तें असें फुगवून अथवा अतिशयोक्तीने सांगतात कीं त्यास असत्याचें स्वरूप व फळ प्राप्त होतें. अश्यां लोकांनी साधारण अर्थाचे शब्द बोलण्यांत योजावे तर त्यांत अतिशय, अगणित, महान्, देदीप्यमान, विराजमान, सर्वोत्कृष्ट, अकटोविकट असे व यांच्याच जातीचे दुसरे शब्द बोलण्याचीसवई असती.

कोणीएक मुलगा एकादिवसीं आपल्या बापास सांगूं लागला कीं कालचे रात्रीस मार्गांत उमोप कुत्रीं पाहिलीं, तीं पांचशें होतीं असी माझी खात्री आहे. बाप ह्मणाला इतकीं तर निश्चयेंकरून नसतील. लेंक बोलिला पण तीं शंभरतर खचीत असतील. पिता ह्मणाला अरे तितकीं कोठून असतील, शंभर कुत्रीं या गांवांत आहेत असें मला वाटत नाहीं. पण बाबा तीं दाहापेक्षां कमी नव्हतीं याविषयींतर माझी पुरतेपणी खात्री आहे. तेव्हां बाप ह्मणाला त्वां दहा कुत्रीं पाहिलींस हेंही मला खरें वाटत नाहीं, कांतर जसें तूं पांचशेंपाहिल्याविषयीं खातरजमेने सांगत होतास तसेंच ही लहान संख्या पाहिल्याविषयीं सांगतोस, तुझे बोलण्याचें त्वां अर्धींच दोनदां खंडन केलें. आतां तुला

खरें ह्मणावें हें माझ्या हातून होत नाहीं. मग तो गोंधळलेला मुलगा बोलिला कीं बाबा पण मी किमानपक्षीं आपला सपाट्या व दुसरा एक कुत्रा पाहिला खरा. चमत्कारिक गोष्ट करून दाखविण्याची जी होस तीमुळें कोणी खोटें वर्तमान ज्याहीर करितात त्याचें हें उदाहरण. याच कारणामुळें असें ह्मालें कीं एक अनधीत पुरुष पूर्वीं वेष्टइन्डीस देशास गेला होता, तो ग्रीष्मऋतूमध्यें सूर्योदय प्रातःकाळीं चार तासाच्या सुमाराने होतो असें कोण्या एकास बोलतां ऐकिल्यावरून ह्मणाला कीं "अंः जमेकाद्वीपांत जो सूर्योदय होतो, त्यापुढें हें काहींच नाहीं. दोन व तीन तासामध्यें म्यां त्यास तेथें उगवतां पाहिला आहे." हें असें घडणें अशक्य, आणि सूर्योदय फारच पहाटेस होतांना पहावयाचा असल्यास पृथ्वीच्या ध्रुवांकडेस गेलें पाहिजे, अयनवृत्तांकडेस जाऊं नये हें या मनुष्यास ठाऊक नव्हतें. आमच्या अवघ्या जन्मांत आह्मास असा उष्मा झाला नाहीं – अमुक्याचा झगा अत्यंत नीटनेटका आहे तसा आह्मी कधीं पाहिला नाहीं – अमुक बाईकडेस मेजवानी झाली तेथें जसें आह्मास समाधान वाटलें तसें कधींच वाटलें नव्हतें – असें लोकांचें बोलणें बहुधा ऐकण्यांत येतें. पाहिलें असतां हें उघड आहे कीं ज्याविषयीं त्यांची पुरतेपणीं खातरी होणें अगदी अशक्य असलें ते निश्चयपूर्वक बोलतात. आपल्याठायीं सत्याविषयीं किंचित् वास्तविक आदर असला, आणि जे शब्द बोला याचे त्यांच्या अर्थाचा थोडासा विचार करून त्याच्या सात्याने सर्वकाळ सत्यास अनुसरून असण्याची इच्छा असली, तर या अश्याप्रकारच्या असत्यापासून आपलें रक्षण होईल.

असत्याचा आणखी एक दुसरा प्रकार आहे तो असा कीं मनांत भाव

एक असावा आणि बोलण्यांत दुसरा दाखवाचा, हेंही निरवालस लबाडीसारिखें सर्वदा वर्जावें. जीं मनुष्यें ही असी नीच वृत्ति धरितात त्यांस असें वाटतें कीं आह्मी जे शब्द बोलतों त्यांत लबाडी नसती ह्मणून आह्मी काहीं वास्तविक पाप अथवा अपराध करीत नाहींत. परंतु हा केवळ भ्रम. ठकवावयाच्या उद्देशानें खोट्या अथवा विपरीत अर्थाचा बोधकरण्याविषयीं जोयत्न करणें तेणेंकरून लबाडी केली असें होतें ह्मणून असीही बोलण्याची युक्ति ठकावू आणि पापरूप होय.

दुनियेच्या अवघ्या व्यवहारांत सत्य हा एक मोठा श्रेष्ट पदार्थ होय. आपल्याविषयीं आणि आपल्या शेजाऱ्याविषयीं जी काहीं गोष्ट असेल त्यांतच सत्याकडेस लक्ष ठेवावें असें नव्हे, तर सर्वगोष्टीविषयीं सत्याचा निर्णय करण्याकरितां तें पहात असावें आणि तें दृढ धरावें. इतिहास पठणेंझालेंतर याप्रकरणी जेउत्तम प्रमाण सिध्द ग्रंथ ते मिळविण्याविषयीं यत्न करावा. शास्त्रांत श्रम करणें झालेंतर समाधानपूर्वकजें सिद्ध झालें नसेल त्याचा स्वीकार आपल्याकडून होतनाहीं असी आपली खातरी असावी. एखादे गोष्टीचा खरेपणा चांगल्या प्रमाणावांचून दुसरा कश्याने सिध्द होणारना हीं आणि झालेल्या कार्याचा प्रयोग आणि आस्थेवाईक अवलोकन केल्यावांचून विद्याशास्त्रांतील कोणे एके गोष्टीचा खरेपणा दुसरा कशानें सिद्ध होणार नाहीं. हें खरें आहे, भ्रमानें संस्थापित नव्हे, असा आपला निश्चय झाल्यावांचून, आणि तो निश्चय सत्यनिष्ठापूर्वक करून घेण्याविषयीं श्रम केल्यावांचून कोणतेंही मत आपल्यामनांत आपण राहूंदेऊं नये. हरएक भ्रांतीचें मत अथवा जें काहीं खोटें असेल त्याजविषयीं कल्पना

करणें याजपासून जगांत वाईटाची प्रवृत्ति होती, परंतु जें काहीं खरें असें आपल्यास कळलें तें, आणि खरेपणानें संस्थापित झालेलें जें प्रत्येक मत आणि जी कल्पना आपल्यास समजती, त्यांजपासून लोकांत चांगल्याची प्रवृत्ति होती.

## लांडगा लांडगा असें ओरडणारा एक मेंढक्याचा मुलगा.

आपल्या बराबरीच्या गोचकन्यांस मेहनत देऊन आपली कर्मणूक करावी असी एक मेंढक्याचा मुलगा इच्छा धरून जसा काय त्याच्या कळपावर खादाड जनावरांतून एकानें घाला घातला, अस्याप्रकारें लांडगा लांडगा असें एकादिवसीं ओरडून धांवत आला. तेव्हां मेंढरांच्या रक्षणाविषयीं उत्सुक असे जे ते लोक त्यांनी तिकडे चाल केली, पण ते त्याजागेस आले तेव्हां तेथें त्यांस लांडगा आढळला नाहीं. त्याजवरून ते त्या लहान मेंढक्यास चांगलें रागकाढून आपल्या घरीं गेले. थोडक्यादिवसानी असें झालें कीं एक लांडगा येऊन त्या पोरग्याच्या कळपावर खरोखर पडला, त्याजरून लांडगा लांडगा असें आपल्या अवघ्या प्राणानें तो ओरडून धांवत गांवांत आला. तेव्हां लोकांनी त्यास सांगितलें कीं आम्ही आतां दुसऱ्यानें फसणार नाहीं, मग त्याच्या ओरडण्याकडेस आपण लक्ष्य देऊं नये असा त्यांनी निश्चय केला. तेव्हां मी यावेळेस खरोखर सांगतों असें त्यानें निश्चित सांगितलें पण तें फुकट गेलें. तो जें काहीं बोलिला त्यांतल्या एका शब्दाकडेस ते आपला कान देतनासे झाले. त्याचा परिणाम असा झाला कीं

त्या लांडग्याने त्याचीं कित्येक मेंढरें मारून टाकिलीं, त्यावरून त्याच्या धन्याने त्यास लवकर निरोप दिला. याप्रकारें या मूर्खमुलग्याने एक लबाडी जरी विनोदार्थ सांगितली तथापि तो आपले चाकरीस मुकला.

## राघू आणि विसू.

राघू विसूस ह्मणतो, अरे विसू आपला मोत्या चुलीजवळ निजला आहे, चल आपण जाऊन त्याला जागा करूं ह्मणजे तो आपल्या बरोबर खेळूं लागेल. विसू बोलतो, होय, होय, चल आपण जाऊं. मग त्या कुत्र्यास जागें करायास ते उभयतां चुल्याजवळ धांवत गेले.

त्या चुल्यावर दुधाचें भांडें होतें तें तेथें ठेविलें आहे असें त्या लहान मुलांनी न पाहतां ते दोघेजण कुत्र्याबरोबर खेळतांखेळतां त्यांचा भांड्यास पाय लागून तें उडून खालीं पडलें व फुटलें आणि अवघें दूध वाहून गेलें. मग आपल्याकडून जें कर्म झालें तें ते लहान मूलपाहून फार दुःखित होऊन भिऊन गेले. तेव्हां राघू प्रथम बोलला तर मग आपल्यास आज संध्याकाळीच्या जेवणास दूध मिळणार नाहीं, असें बोलून त्याने उच्छ्वास टाकिला. इतक्यांत विसू बोलतो संध्याकाळीच्या जेवणास दूध मिळणार नाहीं, कां मिळणार नाहीं, परंतु काय दूध नाहीं ? राघू सांगतो दूध आहे, पण त्यांतून आपल्यास अगदी मिळणार नाहीं. मागल्या सोमवारीं आपण दूध खालीं लवंडून टाकिलें तेव्हां बया ह्मणाली, कीं तुह्मी मोठे निकाळजी, आतां केलें तसें दुसऱ्यावेळीं केल्यास तुह्मास संध्याकाळीच्या जेवणास दूध मिळणार नाहीं त्याचें तुला स्मरण नाहीं काय ? विसू ह्मणाला तर आपण दुधावांचून चालवावें ह्मणजे त्यांत अवघें आलें. दुसरेवेळीं अधिक हुशारी ठेवा

ची, चल आपण धांवत जाऊन हें आईस सांगू. तुह्मी काहीं फोडलें ह्मणजे उजू मला सांगावें असी तीने आज्ञा दिली आहे कळलें. त्याजवरून राघू ह्मणाला तर मी आत्तांच येतों, विसू इतकी घाई करूं नको. तुझ्याने क्षणभर थांबवत नाहीं काय ? त्यावरून विसू थांबला, नंतर ह्मणाला आतां ये राघू, पण राघूने उत्तर दिलें अमळ थांब कांतर अजून मला जाण्याविषयीं हिय्या होत नाहीं, मी भयभीत झालों आहें.

धाकट्या मुलानो माझी तुह्मास असी सल्ला आहे कीं तुह्मी खरें बोलायास कधीं भिऊं नका, तुमच्या हातून जें काहीं वाईट झालें असेल तें उजू धांवत जाऊन सांगा, क्षणभर थांब, अमळ थांब असें कधीं ह्मणूं नका. जसे जसे तुह्मी अधिक थांबाल, तसें तसें तुह्मास अधिक भय वाटेल. शेवटीं कदाचित् असें होईल कीं सत्य बोलायास तुह्मास अवसानच होणार नाहीं. राघूस काय झालें तें ऐका. तो जसा जसा थांबत गेला, तसा तसा तो म्या दूध खालीं लंवडून टाकिलें असें आपल्या आईजवळ सांगण्याविषयीं अधिक अनमान करूं लागला. शेवटीं त्यास सोडून विसू आपले आईस पाहत गेला.

विसू गेला त्यासमयीं राघू आपल्या आपणच खोलींत राहिला. मग असा एकटाच राहून आपल्या आईजवळ दोषपरिहारक भाषण कोणतें करावें याविषयीं अवघा वेळ विचार करूं लागला. तो आपल्या जिवासीं असें बोलूं लागला कीं विसू आणि मी अस्या उभयतांनी आईस सांगितलें कीं आह्मी दूधाचें भांडें लंवडून पाडिलें नाहीं, ह्मणजे आमचें सांगणें तिला खरें वाटेल, आणि आह्मास संध्याकाळच्या जेवणास दूध मि

ळेल. पण विसू त्याविषयीं तिचाजवळ सांगायास जाईल याजरून मलाघाईट वाटतें असें तो आपण आपल्यासीं बोलतांच त्याची आई जीन्यावरून उतरत होती तें त्याने ऐकिलें. तेव्हां आपला आपल्यासींच ह्मणाला अं: एकून विसूची आणि आईची भेट झाली नाहीं, तेव्हां त्याला तिच्याजवळ सागवलें नसेल ह्मणून माझे मर्जीस येईल तेंमी बोलेन. शेवटीं ह्या भित्र्यामुळ ग्याने आपले आईजवळ लबाडी सांगण्याचा निश्चय केला.

ती खोलींत आलीपण तें फुटलेलें भांडें आणि सांडलेलें दूध तीच्या दृष्टीस पडलें तेंतसमयीं तीउगीच थांबून राहिली. मग ओरडून ह्मणाली असेंना, असेंना, कायकरण्याचा हाप्रकार, राघू हें कोणी केलें? तेव्हां राघू हलक्या शब्दाने ह्मणाला बये मला ठाऊक नाहीं. तुला ठाऊक नाहीं, राघू! मला खरें सांग. मीतुजवर रागें भरत नाहीं. एक लबाडी बोलण्यापेक्षां माझ्याजवळ जींभांडींआहेत तींत्यां अवघीं फोडलींअसतां ही चालेल. मी तुलापुसत्यें राघू त्वांतें भांडें फोडिलेंकींनाहीं? आई म्या फोडिलें नाहीं असें ह्मणून तो अग्नीसारिखा लाल झाला. तर मग विसू कोठेआहे. विसूने हें फोडलें नाहीं? आई त्यानेही फोडलें नाहीं. असें राघू बोलिला, कारणकीं विसू आला ह्मणजे म्यातें फोडिलें नाहीं असें बोलावयास त्याचीस मज्जूत करीन असी राघूस आशा होती. मग आई ह्मणूं लागली विसूने फोडिलें नाहीं हें तूं कसें जाणतोस? तेव्हां लबाड जसें दोषपरिहारक भाषणाकरितां गुरमळतात तसें गुरमळून, राघू बोलिला, कांतर, कांतर, कांतर, बये, कांतर, मी अवघावेळ याखोलींत होतोंपण म्यात्यास तें फोडताना पाहिलें नाहीं. तूं अवघावेळ खोलींत होतास त्यापेक्षां तें भांडें कसें लवंडून खालीं पडलें तें

तुला सांगतां यावें ? त्यासमयीं राघूने एक लबाडीसोडून दुसरीलबाडी बोलावी असें समजून उत्तर दिलेंकीं, मला वाटतें तें कुत्र्याने लवंडिलें असेल. आई ह्मणाली त्यास लंवडितां त्वां पाहिलें काय ? तेव्हांतो दुष्टमुलगा ह्मणाला होय. त्याजवरून आई मागेंफिरून ह्मणाली मोत्या, मोत्या छी, छी, छि, छि, मोत्या; राघू,मला बागेंतून एकफोकाटी आणून दे. याकरितां मोत्यास मार दिला पाहिजे. राघू फोकाटीसाठीं धांवला, तो बागेंत याची याच्या भावासीं गांठ पडली. तेव्हां याने त्यास थांबवून आईलाजें सांगितलें होतें तें अवघें त्यास मोठ्या तांतडीने सांगून त्यास विनंती केलीकीं जें खरें आहे तें तूं सागूंनको, म्याजें सांगितलें आहे तेंच सांग. त्यावरून विसू बोलिला, मीतर लबाडी बोलणार नाहीं, कायहें मोत्याने मार खावा काय ? त्यानेतर दूध लवंडलें नाहीं ह्मणून त्यास मार मिळणार नाहीं. मला माझे आईजवळ जाऊंदे. मगते दोघेजण घराकडेस धांवले. राघूने पहिल्यानेच घरांत शिरून विसू आंत येऊं नये ह्मणून दारास कुलूप घातलें, आणितीफोकाटी त्याने आपले आईस दिली. ती फोकाटी त्या मोत्याच्या आंगावर मारायास उचलली तोंतो गरीब मोत्या फोकाटीकडेस पाहूं लागला, परंतु जें काहीं खरें तें सांगाया करितां त्यास बोलतां येईना. मग त्याचे आंगावर फटकावरे इतक्यांत खिडकीजवळ विसूचा शब्द ऐकायास आला. त्याच्याने जितकें मोठ्याने ओरडवेल तितकें ओरडून तो ह्मणालाकीं थांबगे, थांबगे, जिवलगेआई, मोत्यानें तें केलें नाहीं, तें म्याच राघूने केलें, पण राघूला मारूं नको. इतक्यांत आह्मास आंत येऊं द्यावें, आह्मास आंत येऊं द्यावें ह्मणून कोणी दुसऱ्या शब्दाने

ओरडलें. तेव्हां तो शब्द आपल्या बाबाचा असें राघूने जाणलें; कां तर राघूने लबाडी केली ह्मणजे त्यास त्याचा बाप नेहमी कोरड्याचा मार देई. तों आईने दाराजवळ जाऊन त्याचें कुलूप काढिलें. बाप आंत येतांच ओरडून ह्मणाला हें काय त्याजवरून जें झालें होतें तें अवघें त्या त्याजवळ राघूचे आईने सांगितलें. तेव्हां त्याचा बाप ह्मणाला तूं ज्या फोकाटीने मोत्यास मारणार होतीस ती कोठे आहे? त्यासमयीं बाप आपल्यास आतां मारतो असें राघू त्याचे नजरेवरून जाणून त्याच्या पाया पडला व रडून बोलूं लागला कीं दया करावी, यावेळीं मला क्षमा करावी, मी पुनः कधीं लबाडी बोलणार नाहीं. पण बाप त्याचा हात धरून ह्मणाला कीं मी तुला आतां झोडितों ह्मणजे तूं मला वाटतें असें करणार नाहींस, मग अवघ्या शेजारचे लोक ऐकत अशा वेदनेने तो माळ्याने किंकाळ्या फोडी तोंपर्यंत त्याला बापाने झोडपिलें. मग तो ह्मणाला, जा तुला संध्याकाळचें जेवण मिळणार नाहीं, आणि आजरात्रीस दूध मिळणार नाहीं, तुला मार बसला. पहा लबाडाचें कसें पारिपत्य होतें. मग तो विरूकडेस फिरून ह्मणाला इकडे विरू ये आणि माझा हात हालीच. तुला संध्याकाळीं जेवणास दूध मिळणार नाहीं पण त्याची चिंता नाहीं, तूं खरें बोलिलास, तुला मार बसला नाहीं, तुजविषयीं सर्वजणें संतुष्ट झालीं. आतां मी तुजकरितां काय करितों तें पहा. हा लहाना मोत्या कुत्रा मी तुला देतों, हा तुझा कुत्रा. त्वां यास मारापासून रक्षिलें, तूं याचा चांगला धनी होशील याविषयीं जाब माझाकडेस. उद्यां मी पितळवाल्याकडेस जाऊन त्याच्यासाठीं एक नवा गळ्याचा पट्टा आणीन, आजपासून पुढें याला वि

सू असी तुझ्यानावाने हांक मारीत जावी. नंतर त्याने बायकोस सांगित
लें असे जेव्हां कोणी शेजारचीं मुलें तुला पुसतील कीं या मोत्यास विरडू अ
सी कां हाक मारावी तर त्यांस या आपल्या दोघां मुलांची गोष्ट सांग. लबा
ड आणि खरें बोलणारा मुलगा यांत कायजें अंतर तें त्यांस समजूं दे.

## आमीलियाबर्फोर्ड.

जेम्स बर्फोर्ड ह्मणून एक ब्रिस्टलचा व्यापारी होता, त्यास अकल्पि
त अनर्थ प्राप्तझाल्यामुळें तो दिवाळ्या झाला. मग त्याच्या खटल्याविष
यीं बंदोबस्त होत असतां तो वेल्स प्रांतीं गेला आणि आपल्यास आपल्या
घेणेंदारांपासून सूट मिळाली ह्मणजे लंडनचा व्यापारी सरजेम्स आंब
री आपल्यास आपला भागीदार करील असी अशा धरून आपल्या
स्त्रीच्या धनाचें जें थोडेसें उत्पन्न होत असे त्याजवर तेथें काहीं काळपर्यंत
अत्यंत काटकसर करून आपला निर्वाह करूं लागला. त्या व्यापाराची
आमीलिया ह्मणून सोळावर्षांचे वयाची एक कन्या होती. तिचें आजी
चे घरीं मोठ्या लाडाने पालनपोषण झालें असे. माझा बाप व इतर सम्बंधी
आतां गरीब झालीं आहेत असें तिच्या मनांत येईना. ती डांकेचे गाडींत
बसून आपल्या बापाचें जेथें झोपडें होतें तेथें जात असतां सोबतीस ति
घे गृहस्थ होते. तेव्हां जसी कोणी अजून विपुल संपत्तीमध्यें वागत आहे
असें ती स्वतांविषयीं बोलूं लागली आणि आपली दासी, आपली लहान
सी गाडी, आपल्या बापाचें रहावयाचें चांगलें घर यांच्या तिने गोष्टी सां
गितल्या. तेव्हां दैवगत्या असें झालें कीं त्यां गृहस्थांपैकीं दोघेजण इच्या
बापाचे घेणेंदार होते, आणि याने आपल्या पूर्वीच्या द्रव्यापैकीं बहुत्येक

आपल्या गांठी ठेविलें असेल असा त्यांस याजविषयीं नेहमी संशयवा टून त्यानी याचे करीविषयीं सहीकरायास नाकार केला होता. त्यानी या चे लेंकीच्या त्याअस्या गोष्टी ऐकिल्यावरून त्यांचातो संशय दूर झाला. परंतु आपली खात्रीकरून घेण्याकरितां त्यानी तिला पुसलेंकीं ज्याचेंदिवाळें निघालें, ज्याचें नाव बर्फोर्ड असाजोव्यापारी तोच तुमचाबापकाय, तोतुह्मी बोलिलां तस्या डौलदारस्थितीनें वस्तुतः वागतोकाय ? तेव्हां मी फुशारकीसां गणारी वलबाडपोरगी असें आपण होऊन कबूल केल्यावांचून जर नकार करितांयेता तरती पूर्वींजें बोलिलीहोती त्याचा तिने नकारकेला असता, परं तु तसें कबूल करण्याजोगें तिच्याठायीं मन प्राशस्त्य नव्हतें ह्मणून ती जें बोलिली होती तें तिने पुनः बोलून दाखविलें. याप्रमाणें तिने आपल्या बापाच्या अप्रमाणिकपणाविषयीं त्यां दोघां गृहस्थांची असी पुरतेपणे खा त्री केलीकीं यास सूट देण्याकरितां आपलें अनुमत देण्याविषयीं त्यानी नाकार केला. इतकेंच नाहींतर त्यानींजें ऐकिलें होतें तें सर्व सरजम्स आ म्बरीसास सांगितलें. त्याजवरून त्याने बर्फोर्डास पत्र लिहिलेंकीं आ ह्मी तुह्मासीं भाग ठेवणें वर्जिलें असे आणि असें विदित केलेंकीं तुमच्या पेक्षांविशेष प्रमाणिक वाटलेल्या अस्या एका दुसऱ्या मनुष्यास आह्मी प संत केला आहे.

या प्रकारें त्याअभिमानी मुलीने बडिवार व खोटेपणा इहींकरून आपल्या बापाचे उमेदीच्या भंग केला. तेव्हां बर्फोर्डास बरें वाटत नव्हतें तथा पि तो आपल्या अबरूच्या खुलासा करायास्तव लवकर लंडनास जायास निघाला आणि गाडींत बसण्याबद्दलचा ऐवज द्यायास त्यास सामर्थ्य

नव्हतें ह्मणून त्यास चालून जाणे प्राप्त झालें. त्याश्रमाने त्याचें दुखणें वाढून तोमार्गाचेकडेस एका उतारवाड्यांत मोठ्या जबरतापाने पडला. इतक्यांत सरजेम्स् आम्बरी व त्याचीस्त्री हीं वेल्सप्रांती जात होतीं, तींत्याच उतारवाड्यांत रात्रीस उतरलीं, त्यांस शोधलागलाकीं एक गरीब वाटसरू अति दुखणाईत होऊन एथें पडला आहे. त्याजवरून तीं परोपकार बुद्धीने त्यास पहायास गेलींतों तो दैवहीन बर्फोर्ड, असें आढळल्यावरून सरजेम्साला आश्चर्य वाटलें परंतु त्याची लेक डांकेचे गाडींत जें बोलिली तेणेकरून जें त्याचें वाईट झालें त्याविषयीं हा दुखणाईत मनुष्य बरळत आहे असें त्याने ऐकिल्यावरून त्याचेंतें आश्चर्य अधिक झालें. सारांश सरजेम्स आंबरीची याप्रकारें समजाविशी झाली व या बर्फोर्डाचे निर्दोषितेविषयीं त्याची खात्री होऊन त्याने यास आरोग्यकरण्याकरितां खर्चाकडेस पाहिलें नाहीं. मग बर्फोर्ड पुरतेपणीं बरा होऊन लवकरच आपल्या कुटुंबांत गेला. परंतु व्यापाऱ्याप्रमाणें पुनः धंदा करण्याचा जोयोग आला होता तो त्याच्या दुष्ट मुलीच्यामुळें नाहींअसा झाला. नंतर त्यास एके कमी मिळकतीच्या धंद्यावर संतुष्ट होऊन राहणे प्राप्त झालें.

याप्रमाणें सत्यापासून अत्यंत अल्प ढळण्याविषयीं आपण हिय्याकेलाअसतां कायकाय अरिष्टें आपल्याभोंवतीं दबा धरून राहतील तें याजवरून आपल्यास दिसून येतें.

## हीलेन् पाकर.

हीलेनपाकर ह्मणून एक स्त्री डुंफ्रीस शाहराजवळ रहात होती.

हीआपल्या नित्याच्या अभ्यासाकरितां शेतांत खपत असे, इला स्कात्लंडां तील बहुत्येक दुसऱ्यां गरीबलोकांसारिखी विशेषेंकरून बैबल वाचण्या ची सवई लागली असे, व धर्मसम्बंधी व नीतिसम्बंधी जें कर्तव्य त्याज-विषयीं ही दृढबुद्धि धरून असे. इची आईबापें निवर्तलीं ह्मणून इचे धा कटेबहिणीची निरवणूक फक्त इजकडेसच आली. तेव्हां इनेकेवळ ति चा सांभाळ केला इतकेंच नव्हे, तर ती आपल्यासारिखी चांगली व्हावी याविषयीं इने यत्न केला. असी इची खबरदारी असे तथापि त्या अल्पव यी जीवाने एक अपराध केला. तेव्हां तिने आपल्या अपराधाविषयीं को ण्याएकास सांगितलें होतें असें साबीत न झालेंतर तिने मरण पावावें असें तिच्या देशींच्या कायद्यावरून बहुतकरून ठरावें असें झालें. त्यासमयीं माझ्या बहिणीने मला आपली एकांत मैत्रीण केली आहे असें हीलेन इला ह्मणण्याविषयीं सोपें होतें, परंतु तिनेतसें केलें नाहीं याकरितां कीं इणें तसें ह्मटलें असतेंतर खोटें सांगितलें असें झालें असतें. सत्याचा भंग करणें ह्मटलें ह्मणजे हीलेन वाकर इने त्यापासून भिउन मागें सरावें असें असे. इच्याने प्रियकर बहिणीचा प्राण वांचवायास ही असत्य बोलण्या विषयीं आपल्या मनास प्रवृत्त करवेना असें झालें. याजकरितां चौकशी करितां इलापुसलें तेव्हांही कबूल झाली, कीं माझे बहिणीने आपण चुकी केल्याच्या प्रकरणीं मला काहीं सूचना केली नाहीं, त्यामुळें त्या दैव हीन मुलगीने मरण पावावें असा दंड ठरला.

मगआपल्या बहिणीच्या जीवाविषयीं हीलेन् इच्याठायीं अनास्था होती व त्यामुळें इने असत्याने तिचा जीव वांचवावयास नाकार केला

असें नाहीं हें इने दाखवून दिलें. ही सरकाराजवळ आपल्या बहिणीस जीवदान मागण्याकरितां लंडन शहरांत पायीं चालत गेली. असी इने दीडशें कोसापेक्षां अधिक मजल करून, आणि तिची हकीकत वास्तविकरीतीनें राणीस ज्याहीर करून इने आपल्या कार्याविषयीं यश मिळविलें. तिचे बहिणीचा अपराध क्षमा झाला.

सरवाल्टर स्काट याने हीलेनवाकर इची गोष्ट ऐकून इची सत्याविषयीं एकनिष्ठाव आपले बहिणीविषयीं उद्योग पाहून यास इतकें आश्चर्य वाटलें कीं याने या शूरस्त्रीवर एक कल्पित ग्रंथ केला आणि कर्कडब्रेटच्या अधिकाराचे हद्दींत ऐरनग्रेच्या देवळाच्या परसांत इची शवगर्ता होती तिचाहि याने शोध लाविला, आणि इचे गुण प्रकट करायाजोगी स्मरणार्थ एक सुंदर रचना त्या शवगर्तेवर करवली. ज्याची बुद्धि महत्व पावलेली, व जगांत ज्याची पदवी मोठी असा मनुष्य असून तो शेतांत खपणारी दीन असीजी तिचे गुणास आदर रूप करभार देतो हें असें पाहाण्यावरून निश्चयेंकरून आनंद होतो.

---

## महात्मता.

कित्येक लोकांचीं मनें लहान आहेत असें ह्मणतात. ते अल्प गोष्टींविषयीं दोष काढितात; वाईट करावें याभावानें काहीं न करितां जरी अत्यंत अल्प वाईट झालें असलें तर ते त्याजवरून देखील रुष्ट होतात; ते जो व्यापार अथवा उद्योग करितात तो करणारे जे कोणी असतील त्याविषयीं ते मत्सर करितात; कोण्या एकाची एखाद्या गोष्टीवि

षयीं कार्यसिद्धि झाली ह्मणजे ते त्याचा हेवा करितात; ते अल्प अपराधा विषयीं बहुतकाळपर्यंत वैर बाळगितात, आणि त्यांचा अपराध केला होता असें दुसरे सर्वलोक विसरून बहुत मुदत झाल्यानंतर ही त्यांस चांगली संधी सांपडली ह्मणजे ते तें वैर प्रकट करितात. महात्मे जे असतात त्यांची गोष्ट वेगळी असती. आमचा अपराध केला असें त्यांस सहजरित्या वाटत नाहीं, ते क्रोधास लौकर दूर करितात, आणि आपली कार्यसिद्धि होत नसली तथापि दुसऱ्याची कार्यसिद्धि पहाण्याविषयीं त्यांस आनंद वाटतो. ते कदाचित् ईर्षा करितील ह्मणजे शेजाऱ्याची बरोबरी करण्याविषयीं यत्न करितील परंतु ती त्यांची स्पर्धा थोरपणाचे जातीची होय. इतरांस जे हेतु प्रवृत्त करितात, त्यां हेतूंस ते कबूल करितात आणि गफलतीमुळें चूक झाली असली आणि ती त्यांस मोठी अपायकारक असली तथापि ते सहजरित्या क्षमा करितात. असले मनुष्य आपला अभिप्राय साध्य करण्याचे हेतू करितां छक्केपंजे, पावडाव अथवा दुसरी काहीं नीचकवाईत आपला थोरपणा सोडून करीत नाहींत. कोणी प्रमाणिक असून किती दीन असला तथापि त्याचा धिक्कार करीत नाहींत. ते द्वेष बाळगीत नाहींत. दुसऱ्याचा गुणापकर्ष अथवा त्याचें वाईट होण्याविषयीं लक्ष ठेवणाऱ्या ज्या कल्पना त्या ज्यांचेकरून मनात न याव्या इतकें विशेष समाधान त्यांस आपल्याठायीं झालें असतें. महात्मता जीती अशी आहे. साधारण दुनयेंत हा गुण विरळा असतो, परंतु हा पाहिला असतां आपल्यास अत्यंत आनंद आणि आश्चर्य झाल्यावाचून कदापि राहवत नाहीं.

---

## मासिडोनियाचा फिलिप् व त्याचे असूयाकर्ते

मासिडोनियाचा फिलिपराजास विदित झालें कीं आथेन्स एथील वक्त्यांनी आपल्यास विरुध्द असे कितिएक अपवाद लोकांत प्रकट केले परंतु हाराजा एतकामहात्मा होताकीं याने याचेजे असूया कर्ते होते त्यांसविरुद्ध द्वेषाचें भाषण केलें नाहीं. ते लबाड असें माझें आचरण आणि कर्में रहीं करून सिध्दकरण्याविषयीं मी काळजी वागवीन इतकेंमात्र हा ह्मणाला.

याचे प्रजेतून एकाने याजविषयीं उपरोधिक भाषण केल्यावरून त्यास देशपार करावें ह्मणून यास कोणी सल्ला दिली तेव्हां हा ह्मणाला त्याने तसें बोलावें असा प्रसंग मजकडून घडला आहे किंकाय हें आपण प्रथम पाहवें. तेव्हां चौकशी केल्यावर असें आढळलेंकीं त्यामनुष्याने याची चाकरी केली त्याबद्दल त्यास इनाम मिळालें नाहीं. त्याजवरून हा तत्क्षणींच कबूल झालाकीं हा अपराध माझा स्वतांचा आहे. नंतर यानें त्यास योग्य बक्षीस देण्याकरितां लौकरच हुकूम केला.

## विलियमराजा आणि गोडाल्फिन् याचाअर्ल.

इंग्लंडांत दुसरा जेम्स राजा सिंहासनावरून च्युत होउन, आणि तिसरा विलियम राजा होउन राज्यांतर झालें त्यानंतर देशपार केलेल्या राजासीं कागदपत्राची वहिवाट ठेवणें मोठी सरकार गुन्हेगारी होय असें झालें. असें असतां बहुत्येक मोठमोठ्या मानकऱ्यानी जेम्सराजासीं कागदपत्राची वहिवाट ठेविली. असेजे इतर वहिवाट ठेवणारे त्यांतलाच गोडाल्फिन् याचा अर्ल होता. हा मोठा सुज

न असे. या अर्लास शिक्षा करण्याविषयीं विलियमराजाने महात्मे पणाचा मार्ग धरिला. यास त्याने आपल्या एकांताचे खोलींत बोलाचून जीं पत्रें उघडकीस आली होतीं तीं यास दाखवून याचा आवेश आपल्या पूर्वीच्या स्वामीविषयीं अविचारीही असतां त्याची स्तुति केली, आणि हा अर्ल आपला मित्र व्हावा ह्मणून आपली इच्छा आहे असें बोलून दाखविलें, आणि या अर्लास काहीं आडकाठी नसावी ह्मणून तीं तत्क्षणीच आगींत टाकिलीं. तेव्हां हा अर्ल त्या राजाच्या थोरपणाने पराजित होऊन त्याचे जे अत्यंत स्थिर निश्चय मित्र होते तसाच हा एक झाला आणि पुढें सर्वकाळ हा तसाच होऊन राहिला.

## माडामविलासेर्फ.

माडामविलासेर्फ ह्मणून एक फ्रांन्सदेशीं तरुण व मोठी स्वरूपवती स्त्री होती, आणि पारिस एथें फेस्ता ह्मणून एक प्रसिद्ध शस्त्रवैद्य होता. हीं परस्परांस मान्यता राखून मानूं लागलीं परंतु यांच्या पदवीच्या अंतरामुळें यांच्या लग्नाची मनाई झाली. तेव्हां त्याने तिची संगत वर्जिली व तिजविषयक प्रीति विसरायाचा अभ्यास केला. या रखालींकितिएक वर्षें गुजरून गेलीं. मग त्या स्त्रीस हलकेंसें दुखणें होऊन रक्त काढविण्याचा प्रसंग प्राप्त झाला; तेव्हां तें काम करायास फेस्तो यास नेमिलें, त्याने व्यग्र मनेंकरून तीच्याजवळ येऊन शीर टोंचायाची ती धमनी टोंचिली. असी गोष्ट झाली असतां जीव बहुधा जोखमांत पडतो. ती स्त्री तर शांत पडून राहिली. नंतर तिचा तो हात कापून टाकणें जरूर असें तीन दिवसानी ठरलें. त्याकाळीं त्या शस्त्रवैद्यास तिने कोणत्या

ही कठोरपणानें अगदी न बोलतां जरूर पडल्यास आपण मदत करावया स व सल्ला द्यावयास हजीर असावें असी त्यास विनंती केली. नंतर लौ करच चिन्हें दिसूं लागलीं त्याजवरून माडामफिलासेर्फ चोवीसतासां पेक्षां ज्यास्ती यांचत नाहीं असी फेस्तोयाची खात्री झाली आणि तिला आपलें दैवत्याच्याचेहऱ्यावरून विदित झालें. परंतु अत्यंत यातना कारक वृत्तीनीं त्याचें मन झुरडत असतां ती स्वस्थ व सावधअसून ल वकरच आपलें मृत्युपत्र करण्याच्या कामास लागली. तेसमयीं तिने फेस्तोयास समक्ष बोलावून आणि बाकीचे जे तिचे हुजरे होते त्यांस दूर करून ती त्यास ह्मणाली. "मी आतां ही दुनया सोडणार याकरि तां ज्यानें आपल्या साधारणवृत्ति टाकून दिल्या आहेत त्यासारिखी वृत्ति धरणें मला उचित आहे. तुमचे चुकीकरितां तुह्मावर किंचित्ही रुसवा मी ध रीत नाहीं. ती चुकी झाली त्याजवरून तर मी आपल्यास खरी समजतें, कीं तर ती मला उत्तम लोकांत लौकर प्रविष्ट करीत आहे, परंतु मी तुह्मास या वि षयीं जसें मानितें तसें इतर कदाचित् मानणार नाहींत. तुमच्या रोजगारा विषयींच्या ज्या तुमच्या उमेदी त्यांचा भंग होण्यास तुमची चुकी कदाचित् कारण होईल, ह्मणून या कारणापासून कोणेएकेगोष्टीचें भय तुह्मास न व्हावें या विषयीं मी आपल्या मृत्युपत्रांत बंदोबस्त करून ठेविला आहे. तुमचें कल्याण असो."

ह्या उत्तम प्राण्याच्या मरणास जो दैवहीन परंतु निर्दोषी मनुष्य कारण झाला होता त्याच्याकरितां तिणे आपल्या संपत्तीचा मोठा विभाग खरोखर नेमून ठेविला, असें मागाहून कळलें.

इटाली देशांत एक चित्रविद्येची नामांकित शाळा असे. तेथील गेदोत्तो नामक एक अल्पवयी विद्यार्थी होता, त्याने एक चित्र असें चांगलें रंगून तयार केलें कीं त्याविद्येंत जे गुरु त्यांस वरील आनंद व आश्चर्य वाटून त्यांनी साफ सांगितलें कीं जसा याने आरंभ केला आहे तसाच हा चालला तर हा आपल्या कुद्याच्या शिखरीं चढेल, यांत अंतर होऊं देणार नाहीं, असें आमच्या नजरेस येतें.

याच्या बरोबरीचे दोन विद्यार्थी होते त्यांनीतर हीयाची कृति फार भिन्न दृष्टीने पाहिली. त्यांतून ब्रुनेलो वडील असे आणि त्याने त्याविद्येविषयीं काहीं प्रतिष्ठा मिळविली असे. गेदोत्तोस श्रेष्ठपणा मिळाल्यावरून त्यास फारच मोठें मरणप्राय दुःख जालें, आणि आपल्या प्रतिस्पर्ध्याने जितका मान मेळविला तितका आपला हरण झाला असें मानून त्याने अत्यंत द्वेषबुद्धीने त्याची नावड धरली, आणि त्याने जें नाव मेळविलें होतें तें नष्ट झालेलें आपण पहावें याविषयीं त्यास जसी उत्कंठा लागली तसी कत्याविषयीं लागली नाहीं. उत्तम परीक्षकांच्या पसंतीस उतरली जी कृति तिच्या गुणास उघडपणीं नाव ठेवायास त्यास भय वाटलें म्हणून तो गुप्तार्थ व्यंगोक्ति बोलूं लागला कीं गेदोत्तोने तें आपल्या कोणत्यातरी शिक्षकाच्या साह्याने केलें, आणि तो एक दैवयोगाने लाग साधल्याचा प्रकार झाला, त्यासारिखें त्या कीर्तिमान् कर्त्यास बहुधा कधीं व्हायाचें नाहीं असें बोलून दाखविण्याविषयीं त्याने डौल घातला.

लोरेन्झोने असें केलें नाहीं. हा त्याविद्येंत अति नवशीक विद्यार्थी होता तथापि याने गेदोत्तोचे कृतीचा उत्कर्ष पूर्ण मानाने ध्यानांत आणून

जे त्याची केवळ अंतःकरणपूर्वक वाहवा करणारे त्यांतलाच आपण एक झाला. त्यांचीसर्वांकडून प्रशंसा झाली तीऐकून यास उत्तेजन आलें. मग त्याच्यासारिखें प्रशंसेस आपण एकादिवसीं पात्र व्हावें असी हा हौसेने उत्कंठा धरूं लागला. याने त्याची कृति उत्तम कित्ता असें समजून त्यास आपल्या दृष्टीपुढें ठेवून घेतलें आणि त्याचे बरोबरीस येण्याविषयीं फारच हौस धरली. त्याजवर चढ करणें ही साध्यगोष्ट असेंतर त्याकाळीं याच्या ध्यानांतही आलें नाहीं. याने त्याजविषयीं हर्षावेशावांचून कधीं बोलूंच नये आणि ब्रुनेलाने त्याचा गुणापकर्ष केलाअसतां तोऐकणें याससहन होऊंनये असें झालें.

लोरेन्झो शब्दबोलूनच संतुष्टझाला असें नाहींतर गुणसंवृद्धीचाजो क्रम त्यांतहा आपल्या अवघ्या जिवानशीं शिरला आणि चित्रें काढण्याच्या वेत ज्यारवोलींत होत असे तेथें हा सर्व विद्यार्थ्यांच्या अगोदर आणि सर्वांच्यामागें असूं लागला आणि घरीं जोकाळ इतर मुलगे मनोरंजनांत घालवीत, तोहा अभ्यासाकडेस लावूं लागला. याने आपणजें करून पहावें त्यांतून एखाद्याने हाखुशी झाला असेंतर बहुतकाळाने घडूं लागलें. अहाहा, यांत गेदोत्तोच्या कृतीपेक्षां अजून फारच उणें आहे असें याने वारंवार ह्मणत असावें. शेवटीं आपला अभ्यासपुढें होत आहे असेंयास समजूं लागल्यावरून समाधान वाटूं लागलें. मग याचे एकेकृतिविषयीं बरीच प्रशंसा झाली तेव्हां याने आपल्या जिवासीं बोलण्याविषयीं हिंम्याकेलाकीं, "मीही एक दुसरा गेदोत्तो कां होऊंनये ?"

इकडे गेदोत्तोचेजे प्रतिस्पर्धी होते त्यां अवघ्यांपासून तो जय हिरावून नेऊं लागला. ब्रुनेल्लोनेतर त्यासीं बरोबरी करण्याकरितां कांहींएक

वेळ प्रयत्न केला. परंतु शेवटीं त्यानेही ती गोष्ट सोडून दिली आणि दुष्ट स्वभावाचें छद्म भाषण आणि स्वैच्छिक गुणदोष उद्घाटन इत्यादिकरून आपल्या नीचपणाविषयीं समाधान करून घेऊं लागला. लोरेन्झोनेंतर मुकाट्यानें उद्योग चालविला, आणि गेदोत्तोचें चित्र ज्यासमयीं दिसाव याचें त्याच समयीं त्याजबरोबर आपलें एखादें चित्र दृष्टीस पडावें असें यास याचे संकोचवृत्तीनें बहुतकाळ गेल्यानंतर करूं दिलें.

प्रतिवर्षी एकानेमलेल्यादिवसीं सर्व विद्यार्थ्यांनी आपआपलीं उत्तमप्रकारें काढलेलीं चित्रें एका प्रसिद्ध दिवाणखान्यांत दारवव्याचीं असाशि रस्ताअसे. तेथें निवडून नेमलेलेजे कित्येक परीक्षक असत तेत्याचित्रांचे लायकीविषयीं गंभीरतेनें ठराव करून जें सर्वोत्कृष्ट चांगलें असेल त्याबद्दल अमुक इनाम द्यावें याविषयीं निवाडा करीत. गेदोत्तोनें पूर्वीजीं चित्रें काढिलीं होतीं त्यां सर्वांस मागें पाडी असें एक चित्र याप्रतिवार्षिक दिवसाकरितां सिद्ध केलें. तें दारववायाचें त्या अगोदर संध्याकाळीं तयार झालें. त्यांत काहीं कमी राहिलें नव्हतें, स्वच्छ झिलाईनें रंग खुलवायाचा मात्र होता. तें काम गेदोत्तोनें करून तें चित्र दुसऱ्यादिवसीं दारववायाकरितां त्या प्रसिद्ध दिवाणखान्यांत मोठ्या संतोषानें टांगून ठेविलें. परंतु तो परतआल्यानंतर त्या अनिष्टकारी ब्रुनेलानें त्यारवोलींत शिरून एक नाशक पदार्थाचा रस त्याचित्रावर पसरला. त्यापासून असें कार्य उत्पन्न झालें कीं त्या चित्राचा आविर्भाव बहुतकरून नष्ट झाला.

लोरेन्झोयानेंही त्या दिवसाकरितां सिद्धता केली होती त्यानें आपला फार व्यासंग करून एकचित्र सिद्धीस नेलें होतें तें गेदोत्तोच्या ज्या पहिल्या

कित्येक कृति त्यांजपेक्षा फारकनिष्टप्रतीचें असें दिसणार नाहीं ह्मणून नम्रतेने त्याने आशा धरली होती.

मग तो थोर दिवस आला तेव्हां ती मंडळी मिळून त्या मोठे खोलींत गेली. तेथें पडदा वर ओढून प्रकाश पुरतेपणीं पडे इतका तुक्तांच आंत घेत ला होता. त्यासमयीं सर्वजण उत्कंठायुक्त आशेने गेदोत्तोचें चित्र पहावया स गेले, तेथें पहातात तों जें त्यानी सतेज सौंदर्य कल्पिलें होतें तें तर का-हींच नाहीं पण त्याच्यास्थानी अस्तव्यस्त वचकदीं पडलेलीं अस्या रं गाचा एक निस्तेज पसारा अढळला. तेव्हां ते ओरडून ह्मणाले कीं हें निश्च य गेदोत्तोचें नव्हे इतक्यांत तो देवहीन मुलगा स्वतां आला, आणि आप ल्या त्या आवडत्या चित्राचा शून्याकार परिणाम पाहून दुःखाची अतिव्यथा प्रकट करून मोठ्याने बोलिला कीं कोणी माझा विश्वास घात केला, माझा ना शकेला. तेव्हां तो अधम भुनेलो कोनांत राहून त्याच्या त्यादुःखाचें रुख मानूं लागला. परंतु गेदोत्तोच्यापेक्षां लोरेन्झोचा कंठ विशेष अल्प भरून आलाहोता असें नाहीं. मग तो ओरडून ह्मणाला, अरे कपट! अरे दगल बाजी! महाराज, हें गेदोत्तोचें काम नव्हे हें सत्य. तें त्याने निमे संपविलें होतें तेव्हां म्या पाहिलें, तें एक अत्यंत रमणीय कृति असें होतें. त्यामर्या दारेषा पहा आणि हें कोणी असें पाजीपणाने नासून टाकल्याच्या पूर्वी कसें असेल याचा विचार करा.

तेव्हां अवघे अवलोकन करणारे लोरेन्झोच्या उदारपणाच्याआ वेशावरून आश्चर्ययुक्त झाले व गेदोत्तोचा बदरंग झाल्यावरून कळ वळले, परंतु त्याच्या चित्राची जी स्थिति त्यानी पाहिली त्यावरून त्यावि

षयीं निवाडाकरून इनामदेणें हें घडूं सकेना. त्यानी इतर सर्व चित्रें लक्ष लावून पाहिलीं तेव्हां तोंपर्यंत कोणास ठाऊक नव्हता असा कसबी जो लोरेन्झो त्याविषयीं बहुतांचीं अनुमोदनें पडलीं म्हणून त्यानी त्यास इनाम ठरवून दिलें, परंतु लोरेन्झो तें घेऊन गेदोत्तोजवळ जाऊन त्यास अर्पून बोलिलाकीं "अत्यंत पाजीपणाच्या द्वेषाने व मत्सराने तुह्मास दगा केला नसतातर तुमचेगुणाने निःसंशय मेळवून दिलें असतें जें, तें हें बक्षीस तुह्मी घ्यावें. तुमच्या खालचे प्रतीचा मी, असी माझी गणना झालीअसतां तोमान मला पुरे. मी केव्हां पुढें आपल्याबरोबरीस येण्याविषयीं हांव धरलीतर प्रमाणिक ईर्षेच्या योगाने धरीन, याप्रमाणें विश्वासघाताच्या साह्याने धरणार नाहीं."

लोरेन्झोचे थोरपणाचे वर्तणुकीविषयीं त्यागुणपरिक्षकांनी मनापासून अत्यंत प्रशंसा केली. शेवटींत्यानी असानिर्धारकेलाकीं यासमयीं दोनसारिखीं इनामें द्यावीं, कांतरजसागेदोत्तो चित्र कौशल्याविषयींच्या इनामास योग्य आहे तसाच लोरेन्झो सद्गुणाविषयींच्याइनामास अधिकारी आहे.

## दांडगे.

फ्रान्सिस मुलगा वत्याचा शिक्षक असे दोघेजण एका गावांतून चालूनजातअसतां, तेथें दोनतीन कुत्तरीं होतीं त्यानी यांस उपद्रव दिला. तीं अत्यंत आवेशाचे डोळेकरीत, गुरगुरत, भुंकत, आणिक्षणोक्षणी यांजवर उडून पडिल्यासारिखें दाखवीत, असीं तीं यांच्या मागें धांवत येत. तेव्हां फ्रान्सीस वारंवार थांबे व त्यांकडेस आपली

काठी हालवी अथवा दगड उचलावयास ओणवा होई ह्मणजे तीं जरीं त्वरेने आलीं असत, तसींच त्वरेने मागें हटत, परंतु हा तिकडून फिरून पुढें होतांच तीं पुनः यांच्या टांचाच्या मागें येत. हें एक्या शेताच्या वाड्यापासीं ते येत तोंपर्यंत असें चाललें. त्या वाड्यांतून यांची वाट होती, तेथें एक मोठा कुत्रा उनांत स्वस्थपणाने बसला होता. त्याच्याजवळून जावयास फ्रान्सिस तर प्रायः भ्याला आणि आपल्या शिक्षकाच्या जितकें जवळ राहवेल तितका जवळ राहिला, परंतु त्या कुत्र्याने यांजकडेस किंचित् अवलोकनही केलें नाहीं.

नंतर हे एका गोपचारांत लवकरच आले. तेथें एक हंसांचा कळप होता, त्याच्याजवळ हे जातांच ते फुत्कारून यांवर चालून आले, आणि आपल्या लांब लांब माना पुढें काढून अति उपहास्य आकृति धरून त्यां वेडगळ पक्षांनी कितीएक वाटेंत यांचा पाठलाग केला. ते व्हां पुढच्या चेमानेवर एक आडवी कमची मारावी असी फ्रान्सिसास खुरखुरी आली तथापि हा त्यांजकडेस पाहून उगाच हांसला. मग अमळ पलिकडेस गाईंचा कळप एका बेला रक्षांत होता, त्याकडेस फ्रान्सिसाने काहीं शंकेने पाहिलें, परंतु तीं मुकाट्याने चरत राहिलीं, आणि हा जात असतां, त्यांनी जमिनीवरून आपलीं डोकीं उचललीं नाहीं. तेव्हां फ्रान्सिस आपल्या शिक्षकासी ह्मणाला कीं मोठे कुत्रे, व बैल, लहान लहान कुत्रीं, व हंस यांसारिखे भांडखोर नव्हत, ही एक दैवाची गोष्ट होय. बरें याचें कारण काय असावें.?

शिक्षकाने उत्तर केलें, याचें कारण असें आहे, हलक्या आणि

अवगणनीय जीवांच्याठायीं आपल्यास्वकीय बळाची व धैर्याची खातरी नसती, आणि आमची ज्यांसी गांठ पडती त्यांतून बहुत्येकांच्या उपद्रवास आह्मीपात्र आहों असें ते जाणतात, याजकरितां दांडग्यासारिखें वर्तणें आणि ज्यांस ते वस्तुतः भ्याले असतात त्यांच्या आंगावर तूटून पडायाचा आव घालणें हीच अत्यंत बचावाची गोष्ट असें त्यांस वाटतें. परंतु आपल्यारक्षणापुरतें सामर्थ्य आमच्याठायीं आहे असी जे जीव खातरी बाळगणारे असतात, ते इतरांच्याठायीं दुष्टबुद्धि असती असी शंका धरीत नाहींत, आणि आपल्याठायीं तसी बुद्धि किमपि बाळगीत नाहींत, तर प्रौढजी शांतावस्था तीतें धारण करितात.

असेंच तुला मनुष्यजातींत आढळेल. बलहीन, नीच, अल्पव्यक्ति, त्या शंकित, गुरगुरणाऱ्या, आणि स्वैच्छिक असतात. त्या आपल्यापेक्षां जे बुद्धीने व प्रतिष्ठेने थोर, व ज्यांचा दबदबा ते वागवितात, त्यांच्या नावें गवगवा करितात. आणि भित्रेपणामुळें दुसऱ्यास बोलावण्याच्याव धष्टाईचा डौल घालितात परंतु जे वास्तविक थोर आहेत ते शांत आणि उपद्रव न देणारे असतात, ते कोणत्याही अपकारास भीत नाहींत, आणि कोणताही अपकार करीत नाहींत. आमची सत्ता आमच्याकडेस घेण्याविषयीं जेव्हां प्रसंगानुरूप आह्मास जरूर दिसेल तेव्हां तसें करण्याचें सामर्थ्य आह्मास आहे असी खातरी ते आपल्या मनांत ठेवून जरी, अल्पस्वल्प दुसऱ्याने चढाव केला, तरीही तिकडे लक्ष न देतां होऊं देतात.

## हावान्ना एथील हाकिम.

दोघां देशांची लढाई लागली असतां परस्परांस जितका उपद्रव

देववेल तितकाउपद्रव देण्याविषयीं आपली सत्ता अहे असें प्रत्येकास वाटतें, ते एकमेकांच्या मुलकांत लढाई व लूट करायास फौज पाठवितात. ते लढाऊ गलबतें समुद्रांत जायाकरितां तयार करितात, आणि शत्रूकडचीं जीं गलबतें सांपडतील त्यांचा नाश करितात. याप्रमाणें पक्षाच्या अभिमान वागविणारांचे दुष्ट भाव उत्तेजित झाले असतां जो कोणी शत्रूसीं नीतीने अथवा ममतेने वागण्याविषयीं विचार करितो तोवास्तविक महात्मा पुरुष होय.

इंग्रीसन १७४६ सांत ब्रिटन देशाची स्पेन देशासीं लढाई चालली होती व परस्परांच्या बहुत गलबतांचा प्रत्येकजण नाश करीत होते. तेव्हां लंडनाच्या कोण्याएका व्यापाऱ्याचें इलिझाबेथ ह्मणून एक गलबत किमतवार मालानेभरलेलें सफर करीत असतां जमेकाव क्युबा यांच्यामधोमध येऊन त्यांत छिद्रांनी पाणीयेऊंलागलें. तेव्हां त्याजवरील मनुष्यांनी आपलाजीव वांचवायाकरितां तें गलबत हावान्नाचे बंदरींला विलें. तें स्पेन यांचे ताबेंतलें ह्मणून एथें आह्मी लढायींतल्या कैदीसारिखे होऊं व आमचें गलबत लुटीचा माल असें जाणून घेतलें जाईल, असा त्यांनी मनांस रुमार केला होता. मग त्यांतला मुख्य मालीम तें गलबत स्पानीश हाकीमाच्या स्वाधीन करायाकरितां व बंदिवानासारिखे माझे व माझ्या लोकांचे निष्ठुरपणे हाल करूंनये असी त्यास विनंतीकरायाकरितां किनाऱ्यास उतरला. तेव्हां याला मोठाचमत्कार वाटला, कांतर त्या हाकीमाने ते मनुष्य अथवा गलबत यांतून एकासही धरण्याविषयीं नाकार केला आणि तो ह्मणाला कीं तुह्मीजर दुसमानगिरीच्या बेताने

आला असतां तर तुमची आह्मास रास्त खुर मिळाली असती, परंतु तुह्मी एथें फकत कष्ट पावलेल्या खलाशांसारिखे आलां, त्यापेक्षां तुह्मास पीडा नकरितां तुमचें साह्य करण्यास मनुष्यपणा मला प्रवृत्त करितो. तुह्मी आमच्या बंदरीं तुमचें गलबत नीट करावें आणि तुह्मास जोरखर्च होईल त्याची फेड करायास जरूर असेल तोंपर्यंत काहीं व्यापार करावा. नंतर आमच्या गलबतांतून जसें एखादें जातें तसें तुह्मी स्वसंतोषें जावें, याविषयीं तुह्मास मोकळीक आहे.

त्या ब्रिटिश मालिमास सांगितल्याप्रमाणें त्यानें आपलें गलबत नीट केलें आणि तें हाकारायास तयार झालें तेव्हां त्या महात्म्या हाकिमानें हें बर्म्यूडाच्या पलिकडेस जाई तोंपर्यंत स्पेनदेशीच्या लढाऊ गलबतांपासून याचें रक्षण व्हावें असें कार्य व्हायाकरितां यास एक दस्तक दिलें. नंतर तें एलिझाबेथ गलबत स्वस्थपणे हाकारलें, तें थोडक्याच अठवड्यांत आपल्या मालाकरूधां देम्समदींत सलामत पोहचलें.

---

आपल्या शत्रूचा चेंदा करायास अत्यंत युक्त संधि ज्याचे स्वाधीन असतां जो थोर मन करून अवगणना करितो तो कोणी जयकर्ता होण्यास जन्मला आहे असें समजावें.

लावेरर कृत.

---

## शौर्य.

जो कोणी हिय्याकरून अरिष्टास सन्मुख होतो, तो शूर. आप

त्या बरोबरीचे जे इतर प्राणी त्यांला दुखापतीपासून अथवा मरणापासून वांचविणें, आपल्या जीवाचें अथवा मालाचें चोरापासून रक्षण करणें, आणि आपल्या स्वदेशावर शत्रूनें चढाव केला असतां त्याचा बचाव करणें इत्यादि एकाद्या उत्तम उद्देशाकरितां हिंम्याकरून अरिष्टासीं गांठ घालणें उचित आहे. वाईट उद्देशाकरितां धीट असणें यांत कांहीं योग्यता नाहीं. चोर कदाचित् धाडस असतो, एक देश दुसऱ्या देशावर उगीच अपकार करण्याच्या हेतूनें चढाव करील असतां कदाचित् धाडसपणा दाखवितो, परंतु ह्या असल्या गोष्टीविषयीं जो धाडसपणा तें शौर्य नव्हे. सेनापतीस शूर हें नांव योग्य नसतां त्यांस वारंवार शूर असें ह्मणण्याचा परिपाठ पडला आहे. ते कदाचित् युद्धांत यशस्वी झाले असतील परंतु त्यांनी जर उत्तम उद्देशाकरितां युद्ध केलें नसलें तर ते वास्तविक शूर नव्हत.

## ग्रेस् डार्लिंग्.

इंग्रजी सन १८३८ सांत भाद्रपदमासीं फार्फरशेर ह्मणून एक वाफेचें गलबत हलाबंदरांतून डंडी एथें जात होतें, तें नार्थंबर्लंडच्या बाऱ्यावर असतां त्यास कांहीं वादळानें गांठलें. तें गलबत खंबीर नव्हतें, व त्याचें वाफेच्या यंत्राचें काम फुटलें होतें; ह्मणून तें गलबत फर्नबेटांतील एका बेटाच्या पोयरीं ग्रेट हार्कर ह्मणून खडक आहेत त्यावर येऊन फुटलें. तेव्हां खलाशी व उतारू लोकांतून बहुतजण त्या गलबताच्या मजल्यावरून वाहून गेले आणि बुडून मेले. असल्या मोठ्या संकटाचे अ

वस्थेंत कोणासही निभावण्याची आशा नव्हती.

त्याकाळीं उत्तर सन्दर्लंडच्या आकाशदीपाच्या घरांत राहणाऱ्या
कुटुंबाचीं माणसें मोठ्यापहाटेस बाहेर पाहूं लागलीं, तंव तें गलबत खड
कावर असून त्याचा अगदी नाशव्हावा अस्या भयप्रद जबर समुद्राचे ला
टांचा त्याजवर मार चालला आहे असें दृष्टीस पडलें. त्याजवरून डार्लि
ग ह्मणूनजो आकाशदीपाच्या घराचा रखवालदार तो त्यांदुःखित उता
रूंच्या बचाव करावयाकरितां आपली होडी घेऊन आनंदाने गेलाअस
ता, परंतु त्यातस्या जबर समुद्रांतून आपली लहानसी होडी घेऊन जा
ण्याविषयीं तोनिराश झाला. शेवटीं, ग्रेस ह्मणून एक त्याची कन्या वी
सवर्षांच्या उमरेची होती तिने यत्नकरून पहावा असा त्यास उत्साह
दिलाआणिमी तुमच्या सोबतीस येऊन एक वल्हें मारितें असें बोलून दा
खविलें. नंतर तीं उभयतां जाऊन त्या गलबतासीं पोंहचलीं. तेव्हां नऊज
णानी आपल्याजीवांविषयीं त्याहोडीवर भरोसा ठेविला, आणि समुद्र
क्षुब्धझालाहोता तथापि अवघीमंडळी त्या आकाशदीपग्रहीं सलामत
पोंहचली. मग यां बचावलेल्या मनुष्यांस आवश्यक असी हरएक प्र
कारें यांवर तेथें त्यानी ममता केली. त्याफुटक्या गलबतावरून दुसऱ्या
कोणाचेंच रक्षण झालें नाहीं तस्मात् असा सिद्धांत करावाकीं जर ग्रेस
डार्लिंग इचें शौर्य नसतें, तर त्या नऊजणाचाही नाशझालाअसता. यां
रतक्यांआपल्या बरोबरीच्या जीवांकरितां प्रयत्न केल्याशिवाय यां
स आपल्याडोळ्यांदेखत बुडूं द्यावें त्यापेक्षां आपलाच जीव अरिष्टां
त घालावा असी ती उत्सुक झाली.

मगयातरुणस्त्रीचे उदारपणाचे वर्तणुकीने बहुत्येकांचीं लक्ष्यें
आकर्षित केलीं. काहींकाळपर्यंत तर तिची स्तुति प्रत्येकजणाच्या
मुखापासून होऊं लागली. तीची तसबीर व ती ज्या दर्शनीय कार्याच्या
ठायीं प्रवृत्त झाली होती त्याचें चित्र काढून घेण्याकरितां तिच्यादृया एका
तवस्तींत कारागिरांची दाटीजमूं लागली. सहाहजारांपेक्षां जाजती रु
पयांची रकम वरगणीने जमवून तिला बक्षीस केली. त्याप्रांतीचे जे
अत्यंत थोर गृहस्थ होते त्यांतून कित्येकांनी ज्यांत मान्यतेचा मनः
पूर्वक उच्चार होतो असीं तिला पत्रें लिहिलीं. कितिएक हजारवर्षांमागें जीं
कर्में घडलीं तीं इतकीं आश्चर्यकारक नसतां त्यांचें अजून स्मरण पड
तें त्यापेक्षां इच्या नावाचा व शौर्याचा लोकर विसर पडणार नाहीं असें संभ
वनीय होय. असें असतांही उत्तम मुलगी जसी धाडसी असे तसीच संको
चवृत्तिअसे म्हणून इचें असें बोलणें ऐकण्यांत येईकीं इतरांनी जर मा
झे वागणुकीविषयीं इतका बोभार केला नसता तर माझ्याहातून काहीं
असाधारण घडलें असें म्या कधीं मानिलें नसतें.

## एक्या गोंड्याचा मुलगा राम.

मान्चेस्तरचा डाक्टर एकेन पुढील गोष्ट त्याच्या स्वतांच्या पाह
ण्यांत घडली म्हणोन सांगतो.

या शहरांत एक रोजमजुरीचा कामकरी गोंडी होता, तो चांगला
कामकरणारा पण मोठा दारूबाज माणूस असे. तो जें मिळवी तें बहुधा
अवघें कलालाच्या दुकानांत खर्ची, आणि आपली बायको व मुलें यांस
पोसण्याकरितां पराकाष्ठेने जो उपाय करवेल तो करण्याकरितां यांच्यावर

च टाकी. दुर्दैवेंकरून ही असी अवस्था बहुतांची होती, आणि याजपेक्षां अ
तिद्वेष्य असे दुष्टकर्माचे प्रकार थोडके. त्याचा एक सर्वांहून मोठा मुलगा नस
ता तर त्याच्या कुटुंबास खायाचे फांके पडले असते. यास त्या बापाने आप
ल्या कामांत आपणास मदत करायास लहानपणापासून शिकविलें हो
तें. हा असा उद्योगी व सावधचित्त असे कीं तेराचवदा वर्षांचे वयांत अस
तां चांगलाच रोजमुरा मिळवूं लागला. त्यांतून हर एक पैसा हा आपल्या
बापाच्या हातापासून जोंपर्यंत दूर राखवेल तोंपर्यंत राखून आपल्या आ
ईजवळ आणून देई, आणि याचा पशुतुल्य बाप झिंगलेला होऊन घरीं
येई आणि अनिष्टकारक भाषणें आणि दुर्वचने बोलूं लागे आणि मारा
च्या भयाने याची आई व दुसरीं मुलें यांतून त्याच्याजवळ यावयास को
णाचा हिय्या होत नसे असी त्याची दुर्वृत्ति होई ह्मणजे ज्याचें नाव राम असा
हा चांगला मुलगा त्यास शांत करावयास व मुकाट्याने बिछान्यावर
न्यावयास त्याच्याजवळ राही. याजकरितां हा कुटुंबास आश्रय असें
या रामाची आई यास मानीतें वाजबी. ती याजवर ममतेने प्रीति करी.

दैवयोगेंकरून असें पडलें कीं एकादिवसीं हा राम डोकीवर चु
न्याचें ओझें घेऊन उंच शिडीवर चढत असतां आपला धर चुकून खालीं
इरांची वइमारतीच्या चा न्याचुन्याची रास होती त्यावर पडला. ते हां
जवळ उभे राहणारे त्वरेने याच्याजवळ आले आणि हा केवळ रक्ताने
भरला आहे आणि याची जांघ मोडून याच्या आंगाखालीं अगदी वांकू
न गेली आहे, असा त्यांस आढळला. मग त्यानी यास उठविले, यास
मूर्च्छना येऊन हा पडला होता त्यापासून सावध करायास त्यानी याचे तों

डावर पाणी शिंपडलें. हा बोलायासारिखा हुशार होतांच चहूंकडेस पाहून खेदकारक शब्दाने ओरडून ह्मणाला "अहःहः माझे बिचारे आईचें कसें होईल."

नंतर यास घरीं नेऊन शस्त्रवैद्य याची ती जांघ जिकडची तिकडेस बसवूं लागला, त्यावेळीं मी तेथें जवळ होतों. याची आई तर अर्धी वेडी होऊन याजवर जशी काय लटकून राहिली. तेव्हां राम ह्मणाला, "आई रडूं नको, मी काळें करून पुनः चांगला होईन." तो उपचार होई तोंपर्यंत आणखी एक शब्द अथवा कुंथणें, असें काहीं याजपासून निघालें नाहीं.

राम तर चिंध्या पांगरणारा मुलगा असे, त्यास वाचितां अथवा लिहितां येत नसे, असेंही असतां माझ्ये शूर मंडळीचे यादींत या रामाचें नाव राहिलें आहे.

---

## स्वदेशप्रीति.

आपण ज्या देशांत जन्मलों, व आपलें पालन पोषण झालें, त्या देशाची प्रीति करणें ही एक आपल्या स्वाभाविक वृत्तींतलीच वृत्ति होय. कोणी कसेही गंव्हार असोत अथवा त्यांचा तो देश इतर लोकांस कितीही तुच्छ वाटो, परंतु ही प्रीति प्रायः सर्व देशीं जन्मलेल्या मनुष्यांच्या मनांत वागती. ही वृत्ति विवेकाचे मर्यादेंत राही असी ठेविली असतां इचा उपयोग आहे. ही प्रत्येक देशींच्या लोकांच्या ठायीं आप आपल्या सर्व साधारण भूमीविषयीं आस्था उत्पन्न करिती, त्यांस त्या भूमीवर इतर देशचढक

रहूं लागले असतां त्यांजपासून तिचा बचाव करायास, तिचें साधारण कल्याण वृद्धिंगत करायास व तेथले जे कोणी त्यां अवघ्यांविषयीं आपल्या मनांत प्रीति वागवावयास प्रवृत्त करिती. यास उदाहरण. डच इतर कोणत्या देशापेक्षां अथवा लोकांपेक्षां हालांडावर व डच लोकांवर विशेष प्रीति करितो. शत्रूपणाचा घाला पडला असतां हालांडाचें रक्षण करायास तो आपला जीव अरिष्टांत घालील, हालाडांत उद्योगाची भरभराट व्हावी व आपल्या बरोबरीचीं आपल्या देशीचीं मनुष्यें त्यांस सर्व जें कांहीं उत्तम तें प्राप्त होतां आपण पहावें असें तो इच्छितो; तो तेथल्या राज्याविषयीं चांगला वळलेला असतो, कांतर तें त्याच्या देशीचें राज्य; नीति करून देणें, धर्माचा सांभाळ करणें व जनव्यवहाराचीं जीं रचलीं त्यांची योजना करणें, याविषयीं जे नियम ते त्यास आवडतात, कांतर ते त्याच्या देशींचे नियम — म्हणून तो आज्ञापालक प्रजा आणि स्वस्थचित्त नगरकरी असा होतो आणि तेथल्या लोकांचें ऐक्य व परस्परांविषयीं शुभ इच्छा इहींकरून त्या देशाचे व्यवहार वृद्धीस पावतात. असें परदेशीय राज्य व परदेशीय नियम यांच्या ताब्यांत हालांड असतें तर होऊं शकलें नसतें. तीं कसींहीं असोत, तीं ज्या देशाचीं तेथें तीं यथायोग्य होत.

परंतु स्वदेशप्रीति परिमितपणें करून असी उत्तम असतां तिचा अतिशय केला अथवा ती विवेकानें आचरिली नाहीं तर अनुचित आणि अपकारक होती. देशासंबंधानें जीं आपलीं व्यंगें, अथवा सुधारणूक ज्यांस पाहिजे अस्या जनव्यवहारांतल्या ज्या आपल्या चुक्या यांविषयीं आपल्यास ती आंधळें करी असें आपण करून घेऊं नये. आ

पणआपल्या देशावर प्रीति करितों ह्मणून अन्यदेशांचा व तेथल्या राहणारांचा द्वेष अथवा धिक्कार करूंनये; हें,माझ्यासमान मान्यता व सद्गुण दुसऱ्या कोण्या मनुष्यास नाहीं असें प्रत्येक मनुष्याने आपल्यास थोर मानिलेंअसतां जसें वाईट होतें, तसें होईल. गैरवाजबी आगळिकेपासून आपल्या देशाचा बचाव करण्याविषयीं सिध्द असण्यांतही आपण सावधगिरी ठेवावी, नाहींतर शेजारचे देश आपल्यास पुरतेपणीं संतापवीत नसतां त्यांजवर शस्त्रें धरावीं असाभाव कदाचित् आपल्याठायीं उत्पन्न होईल; कांतर युध्द हें एक घोर अनिष्ट होय, त्याचा आश्रय अत्यंत आवश्यकता असलीतर करावा नाहींतर कदापि करूंनये. कसबें व व्यापार होईअसें करून आपल्या देशाचें कल्याण वृद्धिंगत करण्याचा आपण यत्न करीतअसतां यांप्रकरणीं इतरदेशास अपाय केल्याने आपल्या देशाचें हित होईल असेंआपण कल्पूं देऊंनये. याविपरीत असें आहेकीं इतरसर्वदेशांची संवृध्दि झालीअसतां प्रत्येक देशाचें हित होतें; कांतर एखादा देश संवृध्द झालाअसतां इतरांकडेस जें विकायाचें असतें तें त्यांइतरांपासून विकत घ्यावयास समर्थ होतो. सारांश मनुष्यांच्या वर्तनाविषयींजेनियम तेदेशांविषयीं एकसारिखे लागूपडतात. आपल्या स्वार्थाचें सर्वसरळ उपायेंकरून संवर्द्धन करायास आपला यत्न चाले तेथपर्यंत आपण आपल्यावर प्रीति करावी, पण आपल्याबरोबरीचे जे प्राणी त्यांजवरही आपल्यास प्रीति केली पाहिजे व आपल्या शक्तीप्रमाणें त्यांचें सर्वप्रकारें बरें केलेंपाहिजे. तसेंच एखाद्या देशाने आपल्या स्वार्थाचें सर्व सरळ उपायेंकरून संवर्धन करायास आपला यत्न चाले तेथप

र्यंत आपल्यावर प्रीति करावी, परंतुत्याचेजे शेजारी त्यांजवरही त्यास प्रीति केलीपाहिजे, आणि आपल्याकडून घडायाजोगें असेल तसेंत्यांचें सर्वप्रकारें बरें केलेंपाहीजे, त्यांचें त्याने निरवालस वाईटकरूनये. असेंजें उभयप्रकरणीं समान वर्तन हेंउभयपक्षींच्यांस चांगलें आहे; कांतर जसेजसे आपले शेजारी समाधानी, सखी वचांगले होतात, तसेंतसें आपल्यास त्यामध्यें राहणें विशेष आनंदकारक, विशेष हितकारक होतें, आणि जसेजसे इतर देश सम्रद्ध, संतुष्ट, व. क्षोभरहित होतात, तसेंतसें आपल्या देशाची संमृद्धि व अक्षोभता होण्यास चांगलें होतें.

## थिमिस्टोक्लीस व लासिडिमोनच्चें अरमार.

थिमिष्टोक्लीस ह्मणून एक आथेन्सच्या सेनापति होता, तो चांगला शिपाई असे, परंतु सत्यनिष्ठ मनुष्यनसे. तोआपल्या देशाचे अपरिमित्त प्रीतिमुळें स्वदेशाचें शेजारी वप्रतिस्पर्धीजें लासिडिमोनचें संस्थान त्याचा नाश करण्याविषयीं उत्सुक होता. त्याने एकादिवसीं प्रसिद्धसभेंत आथेन्सच्यालोकांस विदितकेलेंकीं लासिडिमोनच्या लोकांवर तुमचें सुस्थिरपणे वर्चस्वहोण्याचा म्या एकबेत केला आहे परंतु तो मास्याने तुह्मास निवेदन करवत नाहीं, कांतर तो सिधीस जाण्याकरितां अत्यंत गुप्तपणें पार पडला पाहिजे. त्याने त्यांस सांगितलेंकीं तुह्मी एकमनुष्य नेमावा, त्यासमी तोबेत समजाऊन देईन, मगतोबेत तुह्मी सिद्ध करूंद्यावा किंवाकसें याची त्याने दर्याफ्त करावी. याकार्याकरितां त्या

नी ज्याच्या प्रमाणिकपणावर व शाहणपणावर त्यांचा अत्यंत भरोसा असा आरिस्टेडीस ह्मणून एकजण त्यांच्यामध्यें होता त्यास एकमतें मुकरर केला. तेव्हां थिमिस्टोक्लीसाने आरिस्टेडीसास एकीकडे नेऊन सांगितलें कीं, लासिडिमोन् व इतर ग्रीशियन् संस्थानें यांचें अरमार आतां एका शेजारच्या बंदरांत राहिलें आहे, तें जाळून टाकावें असा बेत म्या योजिला आहे. याउपायाने आथेन्स नगरी अवघ्या ग्रीस देशाची निर्विवादपणें स्वामिनी झाल्यावांचून राहणार नाहीं. नंतर आरिस्टेडिसाने सभेंत येऊन इतकेंच सांगितलें कीं आथेन्सच्या कल्याणाविषयीं थिमिस्टोक्लीसाचे युक्तीपेक्षां अधिक उपयोगी दुसरी युक्ति नाहीं परंतु तसीच तीहून अधिक गैरवाजबी कल्पनाही दुसरी काहीं नाहीं. तेव्हां त्यां लोकांनी दुसरा शब्द ऐकिल्याशिवाय थिमिस्टोक्लीसाने आपले योजनेपासून निवर्तावें असी झडकर आज्ञा केली.

राल्लिन् ह्मणून एक इतिहास ग्रंथकर्ता, आथेन्सकरांचे या आज्ञेविषयीं असें ह्मणतो कीं, " या घडलेल्या गोष्टीपेक्षां विशेष आनंदाश्चर्य करण्याजोगी दुसरी गोष्ट अवघ्या इतिहासग्रंथांत आपले दृष्टीस येईल किंवा नाहीं हें मला नकळे. नीतीचीं चांगलीं वाक्यें प्रतिपादायास पंडितांचें काहीं वेचत नाहीं; पण जें काहीं प्रमाणिक व रास्त त्यापेक्षां प्राप्ति व हित यांचे खातरीचें आपल्याजवळ कदापि बळ चालूं नये असा याप्रसंगीं निर्णय करायास त्या पंडितांची मंडळी नव्हती, तर ते सारे त्या देशाचे लोक होते, त्यांजवळ जें बोलणें केलें त्याविषयीं ते फार लाभ दृष्टि होते; आणि जें आपल्या संस्थानाच्या कल्याणाविषयीं अत्यंत थोरपणाचें

असी ज्यांची खात्री झालेली होती असें असतां तें नीतीस विरुद्ध अस्यात्या एकस्या कारणावरून त्यानी एकचित्त होऊन, व क्षणएक कांकूं न करितां त्याचा त्याग केला.

## क्यालेसएथील स्वदेशोपकारी पुरुष.

इंग्लांडच्या तिसऱ्या एडवर्डराजाने कालेस शहरस समारें एक वर्ष वेढलें, तेणेंकरून याचे फौजेस मोठें नुकसान झालें, त्यामुळें हा त्या शहरवाल्यांवर फार संतप्त झाला. मग खाण्याचे कमतीमुळें त्यांच्याने ज्याजती मुदत राहवेना असें झालें, तेव्हां हें स्थळ आह्मी सोडून तुमच्या हातीं द्यावें ह्मणून आमची इच्छा आहे असें त्यानी दर्शविलें. त्यावरून याने त्यांस असें कळविलें कीं तुह्मी आपले जीव अथवा आपली मिळकत यांवून एकाविषयीं कांहींएक कलमबंदी करून न घेतां दया करणें न करणें तें माझ्या कडेस अस्या भावाने आपल्यास निरवाळस माझ्या हातीं दिल्याशिवाय मी तुमचें कौलास येणें पत्कारणार नाहीं. या असे निष्ठुरते विषयीं याच्या सर्दारानी देखील हरकत केली, तेव्हां या पुढच्या मानाचे पेक्षां विशेष कृपा करण्या विषयीं हा एड्वर्ड कबूल होईना असें झालें. याने असें मागणें केलें कीं शहरांतील मुख्य गृहस्थांपैकीं सहाजणानी उघड्या डोकीनी, आणवाणी पायानी, खमीजीनशीं व गळ्यांत ओंयती फांसी देण्याची दोरी घालून व हातांत क्यालेस शहरची व किल्ला यांच्या किल्ल्या घेऊन माझ्या पुढें येऊन त्या किल्ल्या माझ्या स्वाधीन नम्रतेने कराव्या, आणि माझी मर्जी कसीही कठिण असली तथापि ती त्यांस हा मनुष्यानी आपला जीव देखील एकीकडेस न ठेवितां कबूल करावी आणि त्यानी तसें

केलेंअसतां त्यारयानरीने कालेसाच्या बाकीच्या शहरवाल्यांवर दया केलीजाईल असेंत्या कठोरचित्त जिंकणाऱ्याने अनमान करून वचन दिलें.

याअस्या अटी लिहून त्या शहरांत पाठविल्या, त्या, शहरवाल्यांची मंडळीमिळाली होती त्यांच्यापुढें वाचिल्या. तेव्हां त्या वर्तमानाच्या मागून सर्वसाधारण खेद उत्पन्न झाला, ती विपरीत गोष्ट कबूल करण्याचा प्रकार करायास उत्सुक असीं मनुष्यें सांपडायाचीजी अडचण तिचा विचार केलाअसतां त्या खेदाचें आश्चर्य वाटणार नाहीं. मग काहीं विचार झाल्यानंतर त्या नगरांतील अत्यंत धनाढ्य असाएक मुख्य गृहस्थ त्या मंडळीस संबोधनपूर्वक बोलिला.त्याचें नाव युस्तेस दीसेन्त्पिअर, स्वार्थ संबंधरहितजी स्वदेशोपकार बुद्धि ती मानायास योग्य होय असाजोंपर्यंत मनुष्यजातीच्याठायीं भाव आहे तोंपर्यंत त्या नावाच्या कदापि विसर पडूं नये. हा शौर्यशाली पुरुष ह्मणाला कीं क्रूर व नासाडी यांजपासून हें सुंदर नगर रक्षायाकरितां जोकोणी आपलें स्वतांचें रक्त,हीच किम्मतजरी पडली तरी ती देईल तरतो ईश्वरापासून व स्वदेशापासून चांगलेंपावायास निःसंशय योग्य होईल. मी अशयांतला एकजण आहें, मी क्यालेस नगरच्या निष्क्रय द्व्यार्थ आपलें शिर इंग्लंडच्या राजास अर्पणकरीन. त्या भाषणेंकरून अश्रु आणि उपकारज्ञतेचे उद्गार बाहेर येत असात्या मंडळींतून बहुत्येकांस द्रव आला. मग इतर पांच मुख्य गृहस्थांनी युस्तेस दिसेन्त्पिअर याचा थोर परोपकार निश्चयपाहून ईर्षा धरिली, आणि यानेजें आदराई संकट ओढून घेतलें

होतें त्याचासमभाग पावण्याकरितां आपलें अर्पण करून एडवर्डानें
ज्याविषयीं हुकूम केलाहोता तो दीनतेचा वेश त्वरेनें घेतला, पण गार्टर
चा ह्मणून एक झगा एडवर्डानें थोडक्यादिवसांमागें चालूकेला होता त्यापे
क्षां तोवेश अस्याकारणीं अंगिकारिलेला ह्मणून विशेष आदरणीय झा
ला. मग ते खमीसा घातलेले आणवाणीपायानीं व आपआपल्या मानेभों
वते फांसींद्यायाचे दोरीनशीं एडवर्डाच्या पुढें नेलें. ते आपल्या बरोबरी
च्या शहरवाल्यांस अपराध क्षमाहोण्याकरितां जो निश्चय ठरविला तोआ
ह्मीअसें जाणून आमचें कायकरणें तें करावें ह्मणोन त्याच्याजवळ ते क
बूल झाले. तेव्हां या राजानें त्यांकडेस कोपानेपाहून त्यांच्या हट्टानें जीवास
नुकसानें झालीं होतीं त्याजवरून त्यांची हेलना करून त्यांचा तत्कालींच
शिरच्छेद करण्याविषयीं आज्ञा केली. तेव्हां त्या वधाचें निवारण करायास
स्तरवाल्टर मानी, व इंग्लांडचे अत्यंत शूर असे मानकरी व योद्धे मध्येंपडले
व त्यांच्या जीवाकरितां प्रिन्सआफवेल्सजोराजपुत्र त्यानेदेखिल मध्यस्थी
केली, पण ती वृथा गेली.

त्यां दैवहीन मनुष्यांचा शेवटील आश्रय राणी फिलिप्पा झाली. एड्
वर्डास राजाच्या नात्यानें संतोषकारक आणि पतीच्यानात्यानें अगत्या
स्पद असे अवस्थेंत ती आपल्यापतीच्या लश्करांत नुक्तीच येऊन मिळा
ली होती. इंग्लांडांत इचा मुतालिकीचा अमल चालत असतां नेविल्सक्रा
स एथें इला मोठा जय मिळाला आणि इचे हिमायतीनें स्काट्लांडचा राजा
दुसरा डेविड हा कैद झाला. ही राणी यासमयीं गरोदरही होती असी आ
पल्या राजपतीपासून अत्यंत थोर मान्यता पावण्याविषयीं इची सर्वप्र

कारें सत्ता होती. आपल्याविनवणीवांचून एडुवर्डास द्रव येणार नाहीं असेंइने जेव्हांपाहिलें, तेव्हांइने आपले बैठकीवरून त्वरेने उठून राजा पुढें गुडघे टेंकिले आणि फार अश्रुयुक्तहोऊन ही बोलूं लागली कीं "अहोमाझेस्वामी आणिपती! आपले सेवेंत हजीर असावें ह्मणून बहुत अरिष्टांतून समुद्र ओलांडून मी एथें आल्यें असें असतां आपल्याजवळ एक वर मागण्याचा मला अधिकार नाहींकाय ? याजकरितां आपण यां सहां बंदिवानावर दयाकरावी, असी रत्तविलेला अरनाजो आपला उद्धारकर्ता त्याच्या गौरवार्थ आणि माझे प्रीत्यर्थ मला आपली प्रार्थना करूं द्यावी" तेव्हां एडुवर्डराजा राणीकडेस संशयपूर्वक पाहून काहींएक अवधीपर्यंत कांकूं करितो असा दिसला, पण शेवटीं असें बोलिला अगे बाई, मला असें वाटतें तूंजर त्यादिवसीं इतरठिकाणीं असतीस, तर चांगलें झालें असतें. पण तूं मागीतलेंल्या वराचा माझ्याने नकार कसा करवेल ? हेमनुष्य घेऊन तुझे मर्जीस येईल तसी यांची व्यवस्था कर."

मगत्या दयाळू राणीने आपला अर्ज कबूल झाला याचा हर्षमानून त्यां ग्रहस्थांचा आपमानकारक वेश बदलवून, त्यांस नवीन पांघुरणें, आणि नोबूल नाणें आहे त्यांतलीं सहासहा दरएकास तात्कालिक उपयोगार्थ देऊन, इंग्लिश सैन्यातून सलामत बाहेर पोंचवून, मोकळीक केली.

**समाप्त**

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुध्द | पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुध्द |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ४ | १ | त्यां | त्या | ९६ | ३ | संभापण | संभाषण |
| ८ | २१ | ती | तीं | ९८ | ७ | उधळत | उधळीत |
| ९ | ५ | प्रकारे | प्रकारें | ० | १० | किमतींचे | किमतीचें |
| ० | १६ | हीं | ही | ९९ | ११ | पेकाचा | पेक्याचा |
| १० | ५ | ज्या | ज्यां | १०० | १३ | गले | गेले |
| ११ | ५ | उपयोगीं | उपयोगी | १०१ | २१ | असत्ता | असतात |
| १३ | १४ | कारमार | कारभार | १०२ | १ | एका | एक |
| १५ | ११ | अपलें | आपलें | १०९ | २१ | याच्च | याचे |
| १६ | १० | देववशांत् | देववशात् | १११ | ४ | याचें | याचे |
| ० | १४ | इंद्रिय | हिंदु | ११९ | १५ | पहिल्याचा सारिखेंरवें | पहिल्याच सारिखें |
| १८ | २ | केले | केलें | १२२ | २१ | बत | बेत |
| २१ | १ | त्यासीं | त्यांसी | १२४ | ११ | किनाक्याचर | किनाऱ्यावर |
| २४ | ५ | मागण्याचे | मागण्याचें | १३६ | ५ | यांस | यास |
| ० | १० | एलमिली | एमिली | ० | १० | स्वानुभविकपणा | अंतरसाक्षित्व |
| २६ | ४ | स्मामी | स्वामी | १३७ | ६ | आनीतीने | अनीतीने |
| २८ | १६ | मेंदरी | मेंदरीं | १३८ | ४ | आढलतें | अढळतें |
| ० | १९ | रुची | रुचि | १४१ | ६ | द्वेपाची | द्वेषाची |
| २९ | २ | त्यांची | यांची | १५२ | १० | काहींसे | काहींसें |
| ३१ | २१ | कोंतवाल | कोतवाल | ० | १२ | असें | असे |
| ३४ | १९ | शोधात | शोधांत | ० | १८ | तसें | तसे |
| ३५ | १२ | एक | एका | ० | १९ | यांची | यांचीं |
| ३६ | ७ | जरीं | जरी | १७० | १ | मीपज़ो | मीज़ो |
| ३७ | १ | घेडून | घडून | ० | ८ | एक्य | ऐक्य |
| ३८ | २१ | टांकी | टाकी | १७४ | १८ | दिला | दिली |
| ४२ | १८ | स्वतन्त्रता | स्वतंत्रता | १७८ | ६ | असे | असें |
| ४८ | ४ | फडताळ्यातून | फडताळांतून | १८२ | ६ | असें | असीं |
| ५१ | ११ | पूवकअवलाकन | पूर्वकअवलोकन | १८२ | ७ | त्याचा | त्यांचा |
| ५३ | २ | योजाचयांस | योजावयास | १८५ | २१ | बालण्याचें | बोलण्याचें |
| ० | ५ | नांगली | चांगली | १८९ | ११ | पठणें | पढणें |
| ६५ | १० | कनिष्ट | कनिष्ठ | १९३ | ८ | तेतसमयीं | तेसमयीं |
| ६९ | १ | राहणार | राहवणार | १९४ | ६ | तो | तों |
| ७१ | १३ | प्रतीच्चा | प्रीतीचा | १९५ | ११ | माळ्याने | मोठ्याने |
| ७२ | ९ | परभित्त | परिमित | १९६ | ४ | सांग | तूं सांग |
| ७३ | ७ | आमगिनाक | आमर्गिनाक | ० | ८ | बदोबस्त | बंदोबस्त |
| ७५ | १४ | स्वस्थूल | स्थूल | १९७ | १६ | प्रमाणि | प्रमाणिक |
| ८१ | १० | उपभो | उपभोग | २०० | ६ | सरचालटर | सर्चलिटर |
| ८२ | ५ | बाहरे | बाहेर | २०३ | ३ | आली | आलीं |
| ० | १० | घपें आहे | घेपें आहे | २१० | १९ | हस | हंस |
| ८४ | ६ | रणक्का | धडधांकड | २१७ | ७ | रारवाबेल | रारवबेल |
| ८६ | १५ | विश्वासाने | विश्वाने | २२६ | १२ | मागितलेंल्या | मागितलेल्या |
| ९२ | १६ | लांबचेलांब | लांबचेलांब | | | | |
| ९४ | ९ | संम्प्रद्धि | समृद्धि | | | | |
| ० | १९ | आसल्या | असल्या | | | | |